C.No-3580
3066 1337
131

॥ श्रीशंकर ॥

# सार्थ श्रीचरकसंहिता.

## चिकित्सास्थान.

भाग २ रा.

[ १० ]

संपादक,

कै० आयुर्वेदमहोपाध्याय.

शंकर दाजी शास्त्री पदे, चिकित्सक.

---o---

प्रकाशक

यज्ञेश्वर गोपाळ दीक्षित बुकसेलर,

बुधवार पेठ, पुणें-सिटी.

सन १९१३.

किंमत २ रुपये.

131

LB:4:54
152E3.2

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्रीशंकर.

# सार्थ श्रीचरकसंहिता.

## चिकित्सास्थान.

### भाग दुसरा.

अध्याय ६ ते ११.

चिकित्सितं वह्निवेश स्वस्थातुरहितंप्रति ।
यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ॥–दृढबलः ।

संपादक,
कै० आयुर्वेदमहोपाध्याय शंकर दाजी शास्त्री पदे.

प्रकाशक,
यज्ञेश्वर गोपाळ दीक्षित बुकसेलर,
बुधवार पेठ, पुणें सिटी.

मुद्रक,
अच्युत चिंतामण भट.
'यशवंत' छापखाना, शनवार पेठ, पुणें.

आवृत्ति दुसरी.

सन १९१३.

किंमत २ रुपये.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# अनुक्रमणिका.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अध्याय ८ वा. राजयक्ष्म चिकित्सा.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अध्याय ११ विसर्पचिकित्सा.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

काशीनाथ... नागपूर

॥ श्रीशंकर ॥

# सार्थ श्रीचरकसंहिता.

## चिकित्सास्थान.

### भाग २ रा.

### अध्याय सहावा.

अथातः प्रमेहचिकित्सितं व्याख्यास्यामः।
इति ह स्माह भगवानात्रेयः॥ १ ॥

आतां आपण प्रमेहचिकित्साध्यायाची व्याख्या करूं. आत्रेय ऋषि असेंच सांगते झाले.

निर्मोहमानानुशयो निराशः पुनर्वसुर्ज्ञानतपोविशालः।
कालेऽग्निवेशाय सहेतुलिङ्गानुवाच मेहान् शमनञ्च तेषाम्॥ २ ॥
आस्यासुखं स्वप्नसुखं दधीनि ग्राम्योदकानूपरसाः पयांसि।
नवान्नपानं गुडवैकृतं च प्रमेहहेतुः कफकृच्च सर्वम्॥ ३ ॥

प्रमेहाचीं कारणें—निर्मोह, निरभिमान, रागद्वेषरहित, निरिच्छ आणि महाज्ञानी व तपस्वी असे जे आत्रेय ऋषि ते, अग्निवेशास त्याच्या प्रश्नावरून येणेंप्रमाणें प्रमेहाचीं कारणें, लक्षणें व चिकित्सा सांगते झाले. नेहमीं एका जागीं बसून राहणें, अकाळी ह्मणजे दिवसा, जेवल्यानंतर वगैरे किंवा अतिशय झोंप घेणें, दहीं, ग्राम्य—जलचर—व आनूप वर्गांतील जनावरांचे मांसरस व त्यांचें दूध, नवें धान्य, नवें पाणी, गुळाचे पदार्थ आणि कफ वाढविणाऱ्या एकंदर आहारविहारांचें अतिशय सेवन या कारणांनीं प्रमेहाची उत्पत्ति[1] होते.

---

१ या प्रसंगास अनुसरून प्रमेहाविषयीं सर्वसाधारण लोकांचे जे एक दोन घातक गैरसमज आहेत त्यांचा निर्देश करणें इष्ट वाटतें. व्यवहारांत सामान्यतया लोकांचा समज असा आढळून येतो कीं, फक्त दुष्ट स्त्रीशीं संभोग केल्यानेंच प्रमेह किंवा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मेदश्च मांसं च शरीरजश्च क्लेदं कफो बस्तिगतं प्रदूष्य ।
करोति मेहान्समुदीर्णमुष्णैस्तान्येव पित्तं परिदूष्य भूयः ॥ ४ ॥
क्षीणेषु दोषेष्ववकृष्य बस्तौ धातून्प्रमेहाननिलः करोति ।
दोषो हि बस्तौ समुपेत्य मूत्रं सन्दूष्य मेहान् जनयेद्यथा स्वम् ॥५॥

**सम्प्राप्ति**—वर सांगितलेल्या कारणांनीं दूषित झालेला कफ बस्तीच्या आश्रयानें मेद, मांसरस, क्लेद व शरीर यांस दूषित करून प्रमेह ( कफज ) उत्पन्न करितो. तसेंच उष्ण आहार-विहारांनीं प्रकुपित झालेलें

---

ज्यास प्राकृतांत परमा म्हणतात तो उत्पन्न होतो व त्यांत मूत्रद्वारानें पांढरा किंवा पिंवळा पू निघतो, लघ्वीच्या वेळीं तिडीक होते. प्रमेह वास्तविक किती व कोणत्या प्रकारच्या कारणांनीं होऊं शकतो हें वर दर्शविलेंच आहे; आणि त्याचीं लक्षणें पुढें सांगितलीं जातील त्यावरून वरील समज किती चुकीचे आहेत हें सहज कळून येईल. कित्येक भिडस्त मनुष्य उक्त कारणांपैकीं कोणत्याही एक किंवा अनेक कारणांनीं प्रमेह उत्पन्न झाला असतां, उपरोक्त गैरसमजामुळें आपण वैद्यास सांगितल्यानें आपल्या आचरणास व्यर्थ कलंक लागेल या मिथ्या भीतीनें तो रोग तसाच लपवून ठेवून त्यास यथेच्छ वाढूं देतात व या उपेक्षेनें तो शेवटीं मधुमेहासारख्या असाध्य स्वरूपावर गेला म्हणजे मग वैद्य किंवा डाक्टराकडे जातात. वाग्भटांनीं प्रमेहनिदानांत म्हटलेंच आहे कीं, 'काले नोपेक्षिताः सर्वे यद्यांतिमधुमेहताम्' कोणत्याही प्रकारचा प्रमेह असो, त्याची उपेक्षा केली असतां तो मधुमेहावर जातो. कारण सर्व प्रमेहांत मधुमेहाचें बीज अथवा तत्व विद्यमान असतें. पुढच्याच श्लोकांत प्रमेहाचें एकंदर प्रकार व त्यांचीं लक्षणें सांगितलीं जातील त्यावरून प्रमेहाचे सूक्ष्म स्वरूप अंशतः ध्यानांत येईल. लक्षणाच्या गैरसमजामुळें लोक फार अनर्थकारी परिणाम भोगीत असलेले आढळतात. सर्व प्रमेहांत जो अत्यंत असाध्य व दारुण असा मधुमेह त्यास सर्वसाधारण लोकांच्या लक्षणाप्रमाणें प्रमेहच म्हणतां येणार नाहीं. तसेंच इतर मेहाविषयींही समजावें. या चुकीच्या योगानें लोक रोग बराच वाढेपर्यंत तो प्रमेह आहे असें समजत नाहींत व शेवटीं तो भयंकर स्थितीत पोंचल्यावर चिकित्सा करूं लागतात. हल्लीं मधुमेह वगैरे असाध्य प्रमेहांचा जो विशेष प्रचार आढळतो त्याचें कारण हा गैरसमजच होय. प्रमेह हा रोग समजण्यास अतिसूक्ष्म असून परिणामीं फार भयंकर आहे. तो मेद, रस, मांस, रक्तादि धातु दूषित करीत असल्यामुळें व तेंच शरीरांत प्रधान असल्यामुळें ह्या रोगास शरीरांत चिरस्थायी होण्यास फार अडचण पडत नाहीं. म्हणून सर्व लोकांनीं या विषयासंबंधानें आपली यथार्थ समजूत करून घेणें अत्यंत इष्ट आहे. सर्व प्रमेहांचें सामान्य लक्षण वाग्भटांनीं 'प्रभूताविलमूत्रता' म्हणजे पुष्कळ व गढूळ लघ्वी होणें हें सांगितलें आहे. या विषयासंबंधीं सविस्तर प्रतिपादन आमच्या राजवैद्यांत 'मधुमेहनिदान' या विषयाखालीं पहा.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पित्त, पूर्वोक्त मेदोमांसादि धातूंस अत्यंत दूषित करून, प्रमेह उत्पन्न करितें. पित्त-कफ-मलें-मूत्र, हे दोष क्षीण झाले ह्मणजे वायु हा ओज, वसा, मज्जा व रस यांस मूत्राशयांत नेऊन, मूत्रमार्गांत आकर्षण करून त्या द्वारानें बाहेर पाडून ते क्षीण करितो. ह्मणजे मधुमेहादि वातजप्रमेह उत्पन्न होतात. उक्त तीन्ही प्रकारच्या प्रमेहांत प्रकुपित झालेला दोष बस्तींत जाऊन मूत्र दूषित करून आपापल्या लक्षणयुक्त प्रमेह करितो.

साध्याः कफोत्था दशपित्तजाः षड्‌ याप्या न साध्याःपवनाश्चतुष्काः समक्रियत्वाद्विषमक्रियत्वान्महात्ययत्वाच्च यथाक्रमन्ते ॥ ६ ॥

**साध्यासाध्य**—कफप्रकोपापासून दहा प्रकारचे प्रमेह उत्पन्न होतात व ते सुसाध्य असतात. कारण, त्यांत शरीर मेदोमांसादिकच दूषित झालेले असतात, आणि शिवाय त्यांत दोष ह्मणजे कफ व दूष्य ह्मणजे शरीराचा स्वेद, क्लेद-मेदादि, या दोहोंचें एकाच अपतर्पणरूप चिकित्सेनें शमन होतें. अन्य रीतीनें हेंच सांगावयाचें ह्मणजे, हेतु व व्याधि किंवा कारण व कार्य या दोहोंचें निवारण एकाच क्रियेनें होतें. पित्तजन्य सहा प्रकारचे प्रमेह याप्य आहेत. कारण एक तर त्यांत कफदोष क्षीण झालेला असतो आणि शरीर-क्लेदादिकांबरोबर रक्तही दूषित झालेलें असतें. दुसरें, यांत दोष व दूष्यांची अथवा कारण व कार्याची चिकित्सा परस्पर प्रतिकूल असते. ह्मणजे पित्ताचें शमन शीतमधुरादि द्रव्यांनीं होतें व प्रमेहावर रूक्ष तीक्ष्णादि क्रिया करावी लागते. ती पित्तचिकित्सेच्या प्रतिकूल होते. पित्तनाशक मधुरशीतादि द्रव्यें मेदास व तद्द्वारा प्रमेहास वाढवितात व मेदनाशक कटुकादि द्रव्यांनीं पित्ताचा प्रकोप होतो. ह्मणून पित्त व मेद या दोहोंची समानता कायम ठेवून चिकित्सा करावी लागते व तसें करणें कठिण असतें

२ या ठिकाणीं 'पित्त व कफ' हे दोनच दोष उद्दिष्ट असते तर 'क्षीणेषु दोषेषु असें पद न घालतां 'क्षीणयोर्दोषयोः' असा पदप्रयोग केला असता. भावप्रकाश व माधवकार यांनीं बहुवचन पाठच घेतला आहे. या वरून या ठिकाणीं दोष ह्मणजे पित्त, कफ, मल व मूत्र यांचें ग्रहण करणें संगत दिसतें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ह्मणून त्यास विषमचिकित्सा ह्मटलें आहे. वात दोषापासून चार प्रकारचे प्रमेह उत्पन्न होतात व ते सर्व असाध्य असतात. कारण त्यांत सर्व धातूंचा क्षय झालेला असतो व त्यांची चिकित्साही परस्परविरुद्ध असते. कारण वाताची चिकित्सा ह्मणजे स्निग्ध मधुरादि सन्तर्पणरूप असावयाची व ती प्रमेहाची वृद्धि करणारी असते. ह्मणून वातप्रमेह असाध्य ह्मटले आहेत.

कफः सपित्तः पवनश्च दोषा मेदोऽस्रशुक्राम्बुवसालसीकाः ।
मज्जा रसौजः पिशितञ्च दूष्यं प्रमेहिणां विंशतिरेव मेहाः ॥ ७ ॥

कफ-पित्त-वात हे तीन दोष आणि मेद, रक्त, वीर्य, स्वेद, चर्बी, लस, मज्जा, रस, ओज व मांस हीं दूष्यें, यांच्या संयोगभेदानें वीस प्रकारचे प्रमेह उत्पन्न होतात.

जलोपमं वेक्षुरसोपमं वा घनं घनं चोपरि विप्रसन्नम् ।
शुक्लं सशुक्रं शिशिरं शनैर्वा लालेव वा वालुकया युतं वा ॥ ८ ॥
विद्यात्प्रमेहान्कफजान्दशैतान् क्षारोपमङ्कालमथापि नीलम् ।
हारिद्रमाञ्जिष्ठमथापि रक्तमेतान् प्रमेहान्षडुषन्ति पित्तात् ॥ ९ ॥
मज्जौजसा वा वसयान्वितं वा लसीकया वा सततं विबद्धम् ।
चतुर्विधं मूत्रयतीव वाताच्छेषेषु धातुष्वपकर्षितेषु ॥ १० ॥

वीस प्रकारचे प्रमेह—पाण्यासारखा, उंसाच्या रसासारखा, खालीं दाट व वर पातळ असा ( फॉस्फटिक डिपाझिट ), पांढरा शुक्रमिश्रित ( Spermatorrhea स्पर्माटोरिया ), राहून राहून स्राव होतो असा, लाळेसारखा ( असालिक डिपाझिट ), व वालुकायुक्त ( यूरिक आसिड डिपाझिट ) असे दहा प्रकारचे प्रमेह कफापासून[1] उत्पन्न होतात.

---

[1] कफापासून दहा प्रमेह होतात, त्यांचीं नावें १ जल अथवा उदकमेह. २ इक्षुमेह. ३ घन अथवा सांद्रमेह. ४ सुरामेह. ५ शुक्रमेह. ६ शीतमेह. ७ लालामेह. ८ वालुका अथवा सिकतामेह. ९ शुक्लमेह. १० शनैर्मेह. जलमेह—यांत मूत्राचा वर्ण पाण्यासारखा स्वच्छ असून तें पुष्कळ, थंड, गन्धरहित असून किंचित् गढूळ व बुळबुळीत असतें. इक्षुमेहांत—उंसाच्या रसाप्रमाणें मूत्र अत्यंत मधुर असतें. घनमेहांत—मूत्र रात्रभर ठेविलें असतां दुसरे दिवशीं प्रातःकालीं दाट होतें. सुरामेहांत—मूत्र पात्रांत ठेविलें असतां सुरेप्रमाणें खालीं दाट व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

**पित्तापासून**[1]—क्षाराप्रमाणें, काळ्या रंगाचा, निळ्या रंगाचा, थंड, हळदीसारखा, मंजिष्ठाच्या काढ्यासारखा व रक्तासारखा असे सहा प्रकारचे प्रमेह होतात.

**वातापासून**[2] मज्जायुक्त, ओजयुक्त (एल्बूमनयुक्त), वसेनें युक्त अथवा लसीकायुक्त असे चार प्रकारचे प्रमेह होतात. इतर सर्व धातु क्षीण होऊन हा चार प्रकारचा प्रमेह वातप्रकोपानें होतो.

**वर्णं रसं स्पर्शमथापि गन्धं यथास्वदोषं भजते प्रमेहः ।**
**श्यावारुणो वातकृतः सशूलो मज्जादिषाड्गुण्यमुपैत्यसाध्यः ११**

ज्या दोषांपासून जो प्रमेह उत्पन्न झाला असेल त्या दोषांनुरूप त्यांत मूत्राचे भिन्नभिन्न रंग, रस, स्पर्श व वास हे असतात. वातापासून होणारे प्रमेह असाध्य असतात. त्यांत मूत्राचा वर्ण भुरकट अथवा पिंगट असून लघ्वीच्या वेळीं शूल होतो व पूर्वोक्त मज्जादिकांचें मिश्रण वगैरे सहा गुण त्यांत असतात.

---

वर स्वच्छ पातळ असतें. **शुक्रमेहांत**—मूत्र वीर्याच्या रंगाचे किंवा वीर्यमिश्रित असतें. **शीतमेहांत**—मूत्र फार थंड, मधुर व पुष्कळ असतें. **लालामेहांत**—मूत्र बुळबुळीत व लाळेसारखें ज्याचे तंतू सुटतात असें असतें. **वालुकामेहांत**—मूत्रांत वाळूसारखे कण असतात. **शुक्लमेहांत**—मूत्राचा रंग कालविलेल्या पिठाप्रमाणें पांढरा असून लघ्वीच्या वेळीं अंगावर शहारे येतात. **शनैर्मेहांत**—मूत्र राहून राहून थोडथोडें गळतें.

१ **पित्तप्रमेह** सहा प्रकारचे. **क्षारमेह**—यांत मूत्राचा रंग स्पर्श, गंध व रुचि क्षारोदकासारखी असते. २ **कालमेह**—यांत मूत्राचा रंग शाईसारखा काळा असतो. ३ **नीलमेह**—यांत मूत्राचा रंग, वास, रुचि व स्पर्श निळीसारखा असतो. ४ **हारिद्रमेह** यांत हळदीच्या रंगाचें तिखट व जळजळयुक्त मूत्र असतें. ५ **मंजिष्ठमेह**—यांत मंजिष्ठाच्या काढ्यासारखा मूत्राचा रंग असून त्यास हिरवट मांसासारखा वास येतो. ६ **रक्तमेह** यांत मूत्राचा वर्ण रक्तासारखा व गंध कच्चया मांसाप्रमाणें असून तें किंचित् खारट व ऊन ऊन असतें.

२ **वातप्रमेह** चार प्रकारचे १ **मज्जामेह**—यांत मूत्राचा वर्ण मज्जेसारखा असून मूत्र मज्जायुक्त असतें व तें वारंवार होतें. २ **ओजोमेह**—किंवा **मधुमेह**—यांत मूत्राचा रंग रुचि वगैरे मधासारखी असतात. ३ **वसामेह**—यांत चर्बी सारखें गंध-वर्णादियुक्त किंवा चर्बीनें युक्त असें मूत्र वारंवार होतें ४ **लसीकामेह**—यांत मत्त हत्तीप्रमाणें एकसारखी दाट व अडकत अडकत पुष्कळ लघ्वी होत असते व त्यांतून लसही जाते. यास **हस्तिमेह** असेंही ह्मणतात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्वेदोऽङ्गगन्धः शिथिलाङ्गता च शय्यासनस्वप्नसुखं रतिश्च ।
हृन्नेत्रजिह्वाश्रवणोपदेहो घनाङ्गता केशनखातिवृद्धिः ॥ १२ ॥
शीतप्रियत्वं गलतालुशोषो माधुर्यमास्ये करपाददाहः ।
भविष्यतो मेहगदस्य रूपं मूत्रेऽभिधावन्ति पिपीलिकाश्च ॥ १३ ॥

प्रमेहाचें पूर्वरूप—घाम येणें, अंगास दुर्गंध येणें, अंग शिथिल होणें, बिछाना, आसनें यांवर एकसारखें पडून रहाण्याची व दिवसा झोंपण्याची इच्छा होणें, हृदय, नेत्र, जीभ व कान यांतून मळ येणें किंवा यांवर चिकटा येणें, अंग घन होणें, केश व नखें अतिशय वाढणें, थंड पदार्थावर मन जाणें, घसा व टाळू यांस कोरड पडणें, तोंड गुळचट होणें, हात पाय यांची आग होणें व मूत्राला मुंग्या येणें हीं लक्षणें झालीं असतां त्या मनुष्यास पुढें प्रमेह होणार असें समजावें.

स्थूलः प्रमेही बलवानिहैकः कृशस्तथैकः परिदुर्बलश्च ।
सबृंहणं तत्र कृशस्य कार्यं संशोधनं दोषबलाधिकस्य ॥ १४ ॥

कोणी प्रमेहरोगी स्थूल व बलवान् असतो; आणि कोणी कृश व दुर्बल असतो. यामध्यें कृश व अशक्त रोग्यांस बृंहण अथवा तर्पण उपचार करावे आणि चांगला सशक्त व पुष्ट रोगी असून त्याचे दोषही जोरांत असल्यास त्याचें वमन विरेचनद्वारा शोधन करावें.

स्निग्धस्य योगा विविधाः प्रयोज्याः कल्पोपदिष्टा मलशोधनाय।
ऊर्ध्वं तथाऽधश्च मलेऽपनीते मेहेषु संतर्पणमेव कार्यम् ॥ १५ ॥
गुल्मः क्षयो मेहनबस्तिशूलं मूत्रग्रहश्चाप्यपतर्पणेन ।
प्रमेहिणः स्युः परितर्पणानि कार्याणि तस्मात्प्रसमीक्ष्य वह्निम् १६

शोधनविधि—ज्याचें शोधन करावयाचें असेल त्याचें प्रथम स्नेहन करून नंतर कल्पस्थानांत सांगितलेल्या निरनिराळ्या शोधन प्रयोगांचा उपयोग करावा. हें संशोधन उभयमार्गी असावें. ह्मणजे वमन व विरेचन या दोन्ही द्वारांनीं सर्व दोष काढून टाकावे. दोष निघून जाऊन शरीर शुद्ध झालें आणि प्रमेहाचा क्लेद शांत झाला ह्मणजे त्यास तर्पक अर्थात् जांगल प्राण्यांच्या मांसरसांचें भोजन द्यावें. आनूपादि प्राण्यांचें मांस मेदो-मूत्र व कफास वाढविणारें अर्थातच प्रमेहास वाढवि-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

णारें असल्यामुळें तें सर्वथा देऊं नये. याप्रमाणें तर्पण अथवा बृंहण न कारितां लंघन केल्यानें गुल्म, क्षय, मूत्रद्वार व मूत्राशयांत शूल आणि मूत्रग्रह हे उपद्रव होतात आणि शांत झालेला प्रमेहही यत्किञ्चित् कारण मिळालें असतां पुन्हां उद्भवण्याचा संभव असतो. ह्मणून ह्या अनुबंधापासून बचाव करण्याकारितां शोधनानंतर रोग्याच्या जठराग्नीच्या शक्तीच्या मानानें त्याचें तर्पण करावें.

संशोधनं नार्हति यः प्रमेही तस्य क्रिया संशमनी प्रयोज्या ।
मन्थाः कषाया यवचूर्णलेहाः प्रमेहशान्त्यै लघवश्च भक्ष्याः ॥१७॥
ये विष्किरा ये प्रतुदा विहङ्गास्तेषां रसैर्जाङ्गलजैर्मनोज्ञैः ।
यवौदनं रूक्षमथापि वाट्यं मद्यान्ससक्तूनपि चाप्यपूपान् ॥१८॥
मुद्गादियूषैरथ तिक्तशाकैः पुराणशाल्योदनमाददीत ।
दन्तीं गुर्दीतैलयुतं प्रमेही तथातसीसर्षपतैलयुक्तम् ॥ १९ ॥
सषष्टिकं स्यात्तृणधान्यमन्नं यवप्रधानस्तु भवेत्प्रमेही ।
यवस्य भक्ष्यान्विविधांस्तथाद्यात्कफप्रमेही मधुसंप्रयुक्तान् ॥ २० ॥
निशिस्थितानां त्रिफलाकषायैः स्युस्तर्पणाः क्षौद्रयुता यवानाम् ।
तान्सीधुयुक्तान्प्रपिबेत्प्रमेही प्रायोगिकान्मेहवधार्थमेव ॥ २१ ॥

जो प्रमेहरोगी वमन–विरेचन देण्यास अयोग्य असेल ( जशी वमनास गर्भिणी वगैरे व विरेचनास नवज्वरादि रोगी ) त्यास शोधन न देतां सर्व प्रकारच्या प्रमेहांत उक्त प्रमेहनाशक, शामक अथवा तर्पणरूपच चिकित्सा करावी. त्यास मंथ, कषाय, जवाच्या पिठाची लापशी, हलकें अन्न, विष्किर ह्मणजे लावा, कवडा, कोंबडा, तित्तिर वगैरे, आणि प्रतुद ह्मणजे ससाणा, घुबड, मोर वगैरे या वर्गांतील जनावरांच्या मांसरसाबरोबर, जवांचा भात, तूप वगैरे स्निग्ध पदार्थ न टाकितां खावा. भाजलेले जव खावे, मद्याबरोबर सातूचें पीठ खावें, सातूच्या पिठाच्या पुऱ्या किंवा घारगे करून खावे. मुगाच्या काटाबरोबर किंवा तिक्त वर्गांतील भाज्यांबरोबर दन्ती, हिंगणबेट, जवस व शिरसाचें तेल मिळवून जुन्या साळींचा भात जेवावा. साठेतांदुळ, देवभात, सांवे वगैरे धान्यांचा भात जेवावा. प्रमेहाच्या रोग्यानें होईल तितका खाण्यांत जवांचा जास्त उप-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

योग करावा. कफप्रमेही रोग्यानें जवाचे नानाप्रकारचे खाण्याचे पदार्थ बनवून त्यांत मध मिळवून ते खावे. जव रात्रभर त्रिफळ्याच्या काढ्यांत भिजत ठेवून दुसऱ्या दिवशीं सुकवून त्यांचा भात किंवा यथारुचि अन्य पदार्थ बनवून, त्यांत मध मिळवून तो सेवन करावा. किंवा त्याच जवांचा भात सीधु मद्याबरोबर मधासह खावा.

ये श्लेष्ममेहे विहिताः कषायास्तैर्भावितानाञ्च पृथग्यवानाम् ।
सक्तूनपूपान्सगुडान्सधानान्भक्ष्यास्तथान्यान्विविधांश्च खादेत्
खराश्वगोधेनुकसंभृतानां तथा यवानां विविधाश्च भक्ष्याः ।
देयास्तथा वेणुयवा यवानां कल्पेन गोधूममयाश्च भक्ष्याः ॥ २३ ॥
संशोधनोल्लेखनलंघनानि काले प्रयुक्तानि कफप्रमेहान् ।
जयन्ति पित्तप्रभवान्विरेकाः संतर्पणः संशमनो विधिश्च ॥ २४ ॥

पुढें कफप्रमेहावर जे काढे सांगितले आहेत, त्यांपैकीं प्रत्येक निरनिराळ्या काढ्यांत जव भिजत घालून, ते सुकवून त्यांचें पीठ व पुऱ्या करून त्या गुळाबरोबर खाव्या, किंवा जव भाजून खावे, किंवा त्यांचे मनास वाटतील ते पदार्थ बनवून खावे. गाढव व घोडा यांच्या लिदेंतून किंवा दुधाळ गायीच्या शेणांतून पडणाऱ्या जवांचे नानाप्रकारचे पदार्थ बनवून ते प्रमेहरोग्यास द्यावे. तसेंच वेणुजव ( वेळूंतील धान्य ) व गहूं यांसही उक्त काढ्यांच्या भावना देऊन त्यांचे निरनिराळे पदार्थ बनवून खावे. त्याचप्रमाणें, विरेचन, वमन व लंघन यांचाही त्या त्या योग्यकाळीं उपयोग केल्यानें कफप्रमेह नाहींसा होतो. तसेंच विरेचन संतर्पण व शमन यांचा यथायोग्य विधीनें प्रयोग केला असतां पित्तप्रमेह नाश पावतो.

दार्वीं सुराह्वां त्रिफलां समुस्तां कषायमुत्क्वाथ्य पिबेत्प्रमेही ।
क्षौद्रेण युक्तामथवा हरिद्रां पिबेद्रसेनामलकीफलानाम् ॥ २५ ॥
हरीतकी कट्फलमुस्तलोध्रं पाठाविडङ्गार्जुनधन्वनश्च ।
उभे हरिद्रे तगरं विडङ्गं कदम्बशालार्जुनदीप्यकाश्च ॥ २६ ॥
दार्वी विडंगं खदिरो धवश्च सुराह्वकुष्ठागुरुचन्दनानि ।
दार्व्यग्निमंथौ त्रिफला सपाठा पाठा च मूर्वा च तथा श्वदंष्ट्रा २७
यमान्युशीराण्यभया गुडूची चव्याभयाचित्रकसप्तपर्णाः ।
पादैः कषायाः कफमेहिनान्ते दशोपदिष्टा मधुसंप्रयुक्ताः ॥२८

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दारुहळद–देवदार त्रिफळा ( हिरडा-बेहडा-आंवळा ) व नागरमोथा यांचा किंवा नुस्त्या आंवळकठीचा काढा मध आणि हळदीची पूड घालून ध्यावा. क्काथवर्ग–१ बाळहिरडे–कायफळ–नागरमोथा–लोध्र, २ पहाडमूळ–वावडिंग–अर्जुनसादडा–धामण, ३ हळद–दारुहळद–तगर–वावडिंग, ४ कळंब–साग–अर्जुनसादडा–ओंवा, ५ दारुहळद–वावडिंग खैर –धावडा, ६ देवदार–कोष्ठ, कृष्णागुरु (अगर) चंदन. ७ दारुहळद-ऐरण-त्रिफळा–पहाडमूळ, ८ पहाडमूळ मोरवेल–गोखरूं, ९ ओंवा–वाळा–हिरडे –गुळवेल, १० चवक–हिरडे–चित्रक–सातवीण. हे वरील प्रत्येक चरणांत एकेक याप्रमाणें सांगितलेले दहा काढे कफमेहावर मध घालून द्यावे.

> उशीररोध्राञ्जनचन्दनानामुशीरमुस्तामलकाभयानाम् ।
> पटोलनिम्बामलकामृतानां मुस्ताभयापद्मकवृक्षकाणाम् ॥ २९ ॥
> रोध्राम्बुकालीयकधातकीनां निम्बार्जुनाम्रातनिशोत्पलानाम् ।
> शिरीषसर्जार्जुनकेसराणां प्रियंगुपद्मोत्पलकिंशुकानाम् ॥ ३० ॥
> अश्वत्थपाठासनवेतसानां कटंकटेर्युत्पलमुस्तकानाम् ।
> पैत्तेषु मेहेषु दशैव दृष्टाः पादैः कषाया मधुसम्प्रयुक्ताः ॥ ३१ ॥

पित्तमेहावरील काढे—वाळा–लोध्र–रसांजन–चंदन, २ वाळा–नागरमोथा, आंवळकठी, हिरडे, ३ कडूपडवळ–कडूनिंबाची साल–आंवळकठी–गुळवेल, ४ नागरमोथा–हिरडे–पद्मकाष्ठ–पांढरा कुडा, ५ लोध्र वाळा–कृष्णागुरु–किंवा पिंवळा चंदन, धायटीचीं फुलें, ६ कडूनिंब–अर्जुनसादडा–अंबाडाहळद, निळेंकमळ, ७ शिरस–राळ–अर्जुनसादडा नागकेसर, ८ गहुला–कमळ केसर–निळेंकमळ–पळस, ९ पिंपळ–पहाडमूळ–असाणा–वेत यांच्या साली १०, दारुहळद–निळें कमळ–नागरमोथा. हे प्रत्येक चरणांत एकेक याप्रमाणें सांगितलेले दहा काढे मध मिळवून पित्तजन्य प्रमेहावर द्यावे.

> सर्वेषु मेहेषु मतौ तु पूर्वौ कषाययोगौ विहितास्तु सर्वे ।
> मन्थस्य पाने यवभावनायां स्युर्भोजने पानविधौ पृथक् च ॥ ३२ ॥
> सिद्धानि तैलानि घृतानि चैव देयानि मेहेष्वनिलात्मकेषु ।
> मेदः कफश्चैव कषाययोगैः स्नेहैश्च वायुः शममेति तेषाम् ॥ ३३ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कम्पिल्लसप्तच्छदशालजानि वैभीतरोहीतककौटजानि ।
कपित्थपुष्पाणि च चूर्णितानि क्षौद्रेण लिह्यात्कफपित्तमेही ॥३४
पिबेद्रसेनामलकस्य वापि कल्कीकृतान्यक्षसमानि काले ।
जीर्णे च भुंजीत पुराणमन्नं मेही रसैर्जांगलजैर्मनोज्ञैः ॥ ३५ ॥

वर सांगितलेल्या एकंदर काढ्यांपैकीं पहिले जे दोन काढे आहेत ते, ह्मणजे दारुहळद–देवदारादि एक, आणि नुस्त्या आंवळकठीचा दुसरा, हे सर्व प्रकारच्या प्रमेहावर सारखे चालतात. मंथ करण्यास, जवांना भावना देण्यास, जेवणांत कालवणाच्या जागीं वापरण्यास व पिण्यास तर वरील सर्व काढ्यांपैकीं वाटेल तो उपयोगांत आणावा. वातप्रधान प्रमेहावर वरील काढ्यांत सिद्ध केलेल्या तेलांचा व तुपांचा उपयोग करावा ह्मणजे मेद व कफ यांचें शमन उक्त काढे करितात व वायूस त्यांतील स्नेह ह्मणजे तेल किंवा तूप हीं शमवितात. कायफळ–सातवीण–साळई बेहडा–रक्तरोहिडा–कुडा व कवठ यांच्या फुलांचें चूर्ण मधांत काल-वून कफ–पित्तप्रमेहावर चाटावयास द्यावें. किंवा सदरहू फुलें एक तोळा वांटून त्यांचा कल्क करून तो आंवळकठीच्या काढ्यांतून योग्य वेळीं प्यावा; आणि तो जिरला ह्मणजे त्यावर जुन्या तांदुळांचा भात जांगल प्राण्यांच्या सुरेखशा सुरुयावरोबर ( किंवा ज्या जांगल प्राण्यांचें मांस आपणास आवडत असेल अशा मांसाच्या सुरुयावरोबर ) जेवावा.

दृष्ट्वानुबन्धं पवनात्कफस्य पित्तस्य वा स्नेहविधिर्विकल्प्यः ।
तैलं कफे स्यात्स्वकषायसिद्धं पित्ते घृतं पित्तहरैः कषायैः ॥ ३६ ॥
त्रिकण्टकाश्मन्तकसोमवल्कैर्भल्लातकैः सातिविषैः सलोध्रैः ।
वचापटोलार्जुननिंबमुस्तैर्हरिद्रया पद्मकदीप्यकैश्च ॥ ३७ ॥
मंजिष्ठया वा गुरुचन्दनैश्च सर्वैः समस्तैः कफवातजेषु ।
मेहेषु तैलं विपचेद्घृतन्तु पैत्तेषु मिश्रं त्रिषु लक्षणेषु ॥ ३८ ॥
फलत्रिकं दारुनिशा विशाला मुस्ता च निःक्वाथ्य निशा सकल्का ।
पिबेत्कषायं मधुसम्प्रयुक्तं सर्वप्रमेहेषु समुद्धृतेषु ॥ ३९ ॥

कफजन्य किंवा पित्तजन्य प्रमेहांत वाताचा संबंध दिसून आल्यास ह्मणजे वात–कफजन्य व वात-पित्तजन्य अशा संसर्गज प्रमेहांत स्नेहविधि

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

योजावा. तो असा कीं, कफघ्न औषधांच्या काढ्यांनीं बनविलेलें तेल कफावर आणि पित्तहर काढ्यांनीं तयार केलेलें तूप पित्तावर द्यावें.

प्रमेहावर—गोक्षुरादि तेल—घृत—गोखरू, आपटा, रिठा, बिबा, अतिविष, लोध्र, वेखंड, कडू पडवळ, अर्जुनसादडा, कडूनिंब, नागरमोथा, हळद, पद्मकाष्ठ, ओंवा, मंजिष्ठ, कृष्णागुरु व चंदन या सर्व औषधांच्या काढ्यांत तेल सिद्ध करून तें कफ—वातजन्य प्रमेहावर द्यावें आणि याच काढ्यांत तूप सिद्ध करून तें वात—पित्तजन्य प्रमेहावर द्यावें. त्रिदोषजन्य प्रमेहावर मिश्र ह्मणजे तूप व तेल सदरहू काढ्यांतच सिद्ध करून त्यांचा उपयोग करावा. त्रिफळा, दारुहळद, कडूवृंदावन व नागरमोथा यांच्या काढ्यांत हळदीचा वाटलेला कल्क मिळवून मध घालून तो काढा सर्व प्रकारच्या वाढलेल्या प्रमेहांवर द्यावा.

लोध्रं शटीं पुष्करमूलमेलां मूर्वां विडंगत्रिफलां यमानीम् ।
चव्यं प्रियंगुं क्रमुकं विशालां किराततिक्तं कटुरोहिणीञ्च ॥ ४० ॥
भार्ङ्गीनतं चित्रकपिप्पलीनां मूलं सकुष्ठातिविषं सपाठम् ।
कलिंगकान्केशरमिंद्रसाह्वां नखं सपत्रं मरिचं प्लवञ्च ॥ ४१ ॥
द्रोणेऽम्भसः कर्षसमानि पक्त्वा पूते चतुर्भागजलावशेषे ।
रसेर्धभागं मधुनः प्रदाय पक्षं निधेयो घृतभाजनस्थः ॥ ४२ ॥
मध्वासवोऽयं कफपित्तमेहान् क्षिप्रं निहन्याद्द्विपलप्रयोगात् ।
पाण्ड्वामयार्शांस्यरुचिं ग्रहण्या दोषं किलासं विविधञ्च कुष्ठम् ४३

मध्वासव—लोध्र, कचोरा, पुष्करमूळ, वेलची, मोरवेल, वावडिंग, त्रिफळा, ओंवा, चवक, गहुला, सुपारी, कडूवृंदावनमूळ ( लहान ), किराईत, कुटकी, भारंगमूळ, तगर, चित्रक, पिंपळमूळ, कोष्ठ, अतिविष, पहाडमूळ, इंद्रजव, नागकेशर, घोडइंद्रायणमूळ (मोठें), नखला, तमालपत्र, मिरीं व नागरमोथा हीं सर्व द्रव्यें प्रत्येकीं एकेक तोळाभर घेऊन १६ शेर पाण्यांत शिजवावीं. चतुर्थांश ह्मणजे ४ शेर काढा राहिला ह्मणजे उतरून गाळून घ्यावा आणि त्यांत निम्यानें ह्मणजे २ शेर मध घालून तें सर्व मिश्रण तुपानें रावलेल्या भांड्यांत भरून एक पंधरवडापर्यंत बंद करून ठेवावें. यास मध्वासव ह्मणतात. हा दररोज ८ तोळे प्रमाणें सेवन

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

केला असतां कफ–पित्तप्रमेहास फार लवकर नाहींसा करितो. त्याचप्रमाणें हा पाण्डुरोग, मूळव्याध, अरुचि, संग्रहणी रोग, किलास व इतर नानाप्रकारचीं कुष्ठें यांवरही वस्ताद आहे.

क्वाथः स एवाष्टपले च दन्त्या भल्लातकानाञ्च चतुष्पलं स्यात् ।
सितोपला त्वष्टपला विशेषः क्षौद्रञ्च तावत्पृथगासवौ तौ ॥ ४४ ॥
सारोदकं चाथ कुशोदकं वा मधूदकं वा त्रिफलारसं वा ।
शीधुं पिबेद्वा निगदं प्रमेही माध्वीकमग्र्यं चिरसंस्थितं वा ॥ ४५ ॥
मांसानि शूल्यानि मृगद्विजानां खादेद्यवानां विविधांश्च भक्ष्यान् ।
संशोधनारिष्टकषायलेहैः संतर्पणज्ञः शमयेत्प्रमेहान् ॥ ४६ ॥
भृष्टान्यवान्भक्षयतः प्रयोगाच्छुष्कांश्च सक्तून्न भवन्ति मेहाः ।
श्वित्रञ्च कुष्ठञ्च कफं च कृच्छ्रं तथैव मुद्गामलकप्रयोगात् ॥ ४७ ॥

वरील मध्वासवाच्या काढ्यांतच ३२ तोळे दंतीमूळ, ३२ तोळे खडीसाखर व मध मध्वासवाइतकाच टाकून मध्वासवाप्रमाणें आसव बनवावें. तसेंच, त्याच काढ्यांत १६ तोळे बिबे, ३२ तोळे खडीसाखर व मध्वासवाइतका मध टाकून आसव बनवावें. दोन्ही आसवांचे गुण मध्वासवासारखेच आहेत. प्रमेह रोग्यानें असाणा, खैर वगैरेच्या साराचा ( चिकाचा ) काढा, दर्भमूळांचा काढा, मधपाणी, त्रिफळ्याचा काढा, उंसाच्या रसाचें जुनें मद्य किंवा मोहाची चांगली जुनी दारु सेवन करावी. तसेंच जांगल पशु व पक्षी यांचें लोखंडाच्या सळईवर भाजलेलें मांस ( ह्मणजे सींकचे, कबाब वगैरे ), जवांचे तयार केलेलें नाना प्रकारचे पदार्थ आणि कोष्ठशुद्धि करणारीं अरिष्टें, काढे, लेह वगैरे प्रयोगांनीं सन्तर्पण जाणणाऱ्या वैद्यानें प्रमेहाचें शमन करावें. भाजलेले जव, सुके सातु आणि मूग व आंवळे यांच्या प्रयोगानें प्रमेह, पांढरें कुष्ठ, रक्तपित्त, कफविकार व मूत्रकृच्छ्र हे विकार शमन पावतात.

संतर्पणोत्थेषु गदेषु योगा मेदस्विनां ये च मयोपदिष्टाः ।
विरूक्षणार्थं कफपित्तजेषु सिद्धाः प्रमेहेष्वपि ते प्रयोज्याः ॥ ४८ ॥
व्यायामयोगैर्विविधैः प्रगाढैरुद्वर्तनैः स्नानजलावसेकैः ।
सेव्यत्वगेलागुरुचंदनाद्यैर्विलेपनैश्चाशु न सन्ति मेहाः ॥ ४९ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सन्तर्पणापासून होणाऱ्या रोगांवर व मेदोरोगांवर जे रूक्षण प्रयोग आह्मीं मागें सांगितले आहेत ते सर्व कफ–पित्त प्रमेहांतही करावे. या रोगांवरही ते चांगले चालतात. नानाप्रकारचे शारीरिक श्रम, बाहवा–इंद्रजव वगैरे रूक्ष पदार्थांचें उटणें अंगास चोळणें, असाणा, त्रिवस वगैरेंच्या साली घालून तापविलेल्या पाण्याचें स्नान व जलसेचन; व वाळा, दालचिनी, वेलची, अगर चंदन वगैरे कफ—मेदनाशक द्रव्यांची उटी लावल्यानें प्रमेह लवकर नाहींसे होतात.

क्लेदश्च मेदश्च कफश्च वृद्धो नाशं प्रयाति प्रसमीक्ष्य तस्मात्।
वैद्येन पूर्वं कफपित्तजेषु मेहेषु कार्याण्यपतर्पणानि ॥ ५० ॥
या वातमेहान्प्रति पूर्वमुक्ता वातोल्बणानां विहिता क्रिया सा।
वायुर्हि मेहेष्वतिकर्षितानां कुप्यत्यसाध्यान्प्रति नास्ति चिन्ता ५१
यैर्हेतुभिर्ये प्रभवन्ति मेहास्तेषु प्रमेहेषु न ते निषेव्याः।
हेतोरसेवा विहिता यथैव जातस्य रोगस्य भवेच्चिकित्सा ॥ ५२ ॥
हारिद्रवर्णं रुधिरञ्च मूत्रं विना प्रमेहस्य हि पूर्वरूपैः।
यो मूत्रयेत्तन्नवदेत्प्रमेहं रक्तस्य पित्तस्य हि स प्रकोपः ॥ ५३ ॥
दृष्ट्वा प्रमेहं मधुरं सपिच्छं मधूपमं स्याद्द्विविधो विचारः।
क्षीणेषु दोषेष्वनिलात्मकः स्यात्संतर्पणाद्वा कफसंभवः स्यात् ॥
सपूर्वरूपाः कफपित्तमेहाः क्रमेण ये वातकृताश्च मेहाः।
साध्या न ते पित्तकृतास्तु याप्या साध्यास्तु मेदो यदि न प्रदुष्टम् ॥
जातः प्रमेही मधुमेहिना वा न साध्यरोगः स हि बीजदोषात्।
ये चापि केचित्कुलजा विकारा भवन्ति तांश्च प्रवदन्त्यसाध्यान् ॥
प्रमेहिणो याः पिडका मयोक्ता रोगाधिकारे पृथगेव सप्त।
ताः शल्यविद्भिः कुशलैश्चिकित्स्याः शस्त्रेण संशोधनरोपणैश्च ५७

अपतर्पणापासून, वाढलेला क्लेद, मेद व कफ नाश पावतात ह्मणून कफपित्तजन्य प्रमेहांवर वैद्यानें प्रथम अपतर्पण चिकित्सा करीत जावी. ज्या प्रमेहांत इतर दोषांपेक्षां वाताचा जोर अधिक असेल त्यांत पूर्वीं सांगितलेली वातप्रमेहावरची चिकित्सा करावी. प्रमेहांत अति अशक्त झालेल्या मनुष्याचा वायु फार कुपित होतो. असाध्य रोग्याविषयीं तर विचारच केलेला नाहीं.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रमेह उत्पन्न करणाऱ्या अनेक कारणांपैकीं जो प्रमेह ज्या रोग्यास ज्या कारणांनीं झाला असेल त्या रोग्यानें तीं कारणें, ते आहार–विहार वर्ज करावे. रोगाचें कारण वर्ज करणें ही त्याची एक चिकित्साच आहे. अति घाम येणें, अंगास घाण येणें, शरीर शिथिल होणें, एकसारखी झोंप येणें, इत्यादि प्रमेहाचीं या अध्यायाच्या आरंभीं सांगितलेलीं पूर्व रूपें न दिसतां, जर एखाद्यास हळदीसारखी पिवळी किंवा रक्तवर्ण अथवा रक्तमिश्रित लघ्वी होऊं लागली तर त्यास प्रमेह झाला असें समजूं नये; तर हा रक्तपित्ताचा प्रकोप आहे असें समजावें. एखाद्या रोग्याची लघ्वी मधुर, बुळबुळीत व मधासारखी दिसून आल्यास त्यावर दोन प्रकारच्या शंका उद्भवूं शकतात. एक अशी कीं हा कफादि दोष क्षीण होऊन वात वाढ-ल्यानें झालेला सन्तर्पणसाध्य प्रमेह आहे, किंवा अतिसंतर्पणानें वाढ-लेल्या कफापासून झालेला अपतर्पणानें बरा होणारा प्रमेह आहे. परंतु अशा प्रकारची शंका मंदबुद्धि वैद्यासच येईल. चाणाक्ष वैद्य तर कफमेह व वातमेह यांच्या निरनिराळ्या लक्षणांवरून तेव्हांच यथार्थ परीक्षा करून घेईल. अतिघाम, अंगास घाण इत्यादि पूर्वीं सांगितलेलीं एकंदर पूर्वरूपें ज्यांत नेहमीं कायम आहेत असे कफ–पित्तजन्य प्रमेह व क्रमानें उत्पन्न झालेले वातज प्रमेह असाध्य समजावे. पूर्वीं एकदां वातजन्य प्रमेह असाध्य असें सांगितलें असून पुन्हां या ठिकाणीं तेंच सांगण्याचा हेतु असा आहे कीं, पूर्वीं जें निरूपण केलें आहे तें प्रथमच वातापासून उत्पन्न झालेल्या ‘ वातज ’ प्रमेहांविषयीं आहे. आणि या ठिकाणीं, प्रथम प्रमेह कफापासून उत्पन्न झाला, पुढें तो पित्तमेह बनला आणि शेवटीं काला-न्तरानें त्यास वातप्रमेहाचें स्वरूप आलें अर्थात् तो आरंभीं कफप्रमेह असून क्रमानें वातप्रमेह बनला, अशा वातप्रमेहांविषयीं प्रतिपादन केलें आहे. कारण कदाचित् कोणीं असें समजूं नये कीं, हा मूळचा कफप्रमेह असल्यामुळें, साध्य आहे. पित्तजन्यप्रमेह, त्यांची चिकित्सा विषम अस-ल्यामुळें, याप्य आहेत अर्थात् ते साफ बरे होऊं शकत नाहींत, किन्तु औषध द्यावें तोंपर्यंत दबतात व तें सोडलें म्हणजे पुन्हां उद्भवतात असें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पूर्वीं सांगितलें आहे. परंतु त्यांत जर मेद फार बिघडला नसेल तर हे साध्य होऊं शकतात.

जन्मापासून असलेला प्रमेह किंवा प्रमेही बापापासून जन्मलेल्या मनुष्यास कालान्तरानें झालेला प्रमेह बरा होत नाहीं. कारण शरीरांभि जें वीर्य तें दूषित असल्यामुळें त्याचा परिणाम शरीरभर झालेला असतो. हा नियम एकट्या प्रमेहासच लागू आहे असें नाहीं. तर जे जे ह्मणून पितृपरंपरेनें—पिढीजाद चालत असलेले रोग आहेत ते सर्व असाध्य असें समजावें. निदानस्थानांत, प्रमेही रोग्यास होणाऱ्या ज्या सात प्रकारच्या फोडांचें वर्णन आह्मीं केलें आहे, त्यांची चिकित्सा कुशल शस्त्रवैद्यानें त्या चिरून त्यांचें शोधन करून ह्मणजे वाहूं देऊन व शेवटीं व्रण भरून काढून करावी.

> हेतुर्दोषा दूष्यं मेहानां साध्यतानुरूपञ्च ।
> मेही द्विविधस्त्रिविधं भिषग्जितं लक्षणं तस्य ॥ ५८ ॥
> आद्या यवान्नविकृतिर्मन्था मेहापहाः कषायाश्च ।
> तैलघृतलेहयोगा भक्ष्याः प्रवरासवः सिद्धा ॥ ५९ ॥
> व्यायामविधिर्विविधः स्नानान्युद्वर्तनानि गन्धाश्च ।
> मेहानां प्रशमार्थं चिकित्सिते दृष्टमेतावत् ॥ ६० ॥

प्रमेहाचीं कारणें, बिघडणारे दोष, त्यांच्या योगानें दूषित होणारे धातु, साध्यासाध्यादि विचार, पूर्वरूप, दोन प्रकारचे प्रमेही, तीन प्रकारची चिकित्सा, तिचें लक्षण, जवाच्या केलेल्या नानाप्रकारच्या पदार्थांचें प्रमेहावर उत्तम गुणकारित्व, प्रमेहनाशक मंथ, काढे, तेल, तूप, अवलेह, भक्ष्य पदार्थ, उत्तम आसवें, व्यायामविधि, स्नान, उटणें व लेप इतके विषय या प्रमेहचिकित्सित नांवाच्या अध्यायांत सांगितले आहेत.

इति षष्ठोऽध्यायः समाप्तः ॥ ६ ॥

---

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# अथ सप्तमोऽध्यायः



अथातः कुष्ठचिकित्सितं व्याख्यास्यामः ॥
इति ह स्माह भगवानात्रेयः ॥ १ ॥

आतां आपण कुष्ठचिकित्सित नांवाच्या अध्यायाची व्याख्या करूं. आत्रेय ऋषि असेंच सांगते झाले.

हेतुं लिङ्गं विविधं कुष्ठानामाश्रयं प्रशमनञ्च ।
शृण्वग्निवेश सम्यग्विशेषतः स्पर्शनघ्नानाम् ॥ २ ॥

हे अग्निवेश ! स्पर्शनेन्द्रिय त्वचेस बधिर करणाऱ्या कुष्ठ रोगाचीं कारणें, निरनिराळीं लक्षणें, त्यांचीं आश्रयस्थानें व चिकित्सा हीं मीं सविस्तर सांगतों. तूं सावधान होऊन ऐक.

विरोधीन्यन्नपानानि द्रवस्निग्धगुरूणि च ।
भजतामागतां छर्दिं वेगाँश्चान्यान्प्रतिघ्नताम् ॥ ३ ॥
व्यायाममतिसन्तापमतिभुक्त्वानिषेविणाम् ।
शीतोष्णलंघनाहारान्क्रमं मुक्त्वा निषेविणाम् ॥ ४ ॥
घर्मश्रमभयार्तानां द्रुतं शीतांबुसेविनाम् ।
अजीर्णाध्यशिनाञ्चैव पञ्चकर्मापचारिणाम् ॥ ५ ॥
नवान्नदधिमत्स्यातिलवणाम्लनिषेविणाम् ।
माषमूलकपिष्टान्नगुडक्षीरतिलाशिनाम् ॥ ६ ॥
व्यवायं चाप्यजीर्णेऽन्ने निद्रांश्च भजतां दिवा ।
विप्रान्गुरून्धर्षयतां पापं कर्म च कुर्वताम् ॥ ७ ॥

कुष्ठाचीं कारणें—पातळ, स्निग्ध व जड आणि परस्परविरुद्ध पदार्थ एकत्र मिळवून सतत सेवन करणें, वांति, लघ्वी, शौच वगैरे थांबविणें, जेवणानंतर लागलीच कसरत वगैरे परिश्रमाचीं कामें करणें व उन्हांत वगैरे फिरणें, थंड-गरम, उपास-जेवण इत्यादि परस्परविरुद्ध गोष्टी क्रम सोडून करणें ह्मणजे उपास किंवा हलकें भोजन करून त्यावर एकदम जड भोजन करणें, किंवा घाम वगैरे आला असतां त्यावर एकदम थंड पाण्याचें स्नान करणें इत्यादि, उन्हानें, श्रमानें, किंवा भयानें व्याकुळ

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

असतां त्यावर एकदम थंड पाण्यानें स्नान करणें, थंड पाणी पिणें, इ० अजीर्णावर जेवणें, वमनविरेचनादि पंचकर्मं बरोबर न होणें, नवें अन्न, दहीं, मासे, तीळ, खारट व आंबट पदार्थ यांचें अति सेवन; उडीद, मुळे, पिठाचे पदार्थ, गुळ, दूध व तीळ यांचें अत्यंत सेवन, अजीर्णावर स्त्रीसंग, दिवसा झोंप घेणें, ब्राह्मण व गुरुजनांचा अपमान करणें व इतर पापकर्मं करणें या कारणांनीं कुष्ठरोगाची उत्पत्ति होते.

वातादयस्त्रयो दुष्टास्त्वग्रक्तं मांसमम्बु च ।
दूषयन्ति स कुष्ठानां सप्तको द्रव्यसंग्रहः ॥ ८ ॥
अतः कुष्ठानि जायन्ते सप्त चैकादशैव च ।
न चैकदोषजं किञ्चित्कुष्ठं समुपलभ्यते ॥ ९ ॥

**कुष्ठाची सम्प्राप्ति**—उक्त कारणांनीं वात, पित्त, कफ हे तीन दोष दूषित होऊन ते त्वचा, रक्त, मांस, लस यांस दूषित करितात; अर्थात् उक्त सात द्रव्यांच्या बिघडण्यानें कुष्ठ उत्पन्न होतें. सर्व मिळून कुष्ठांच्या अठरा जाती आहेत. त्यांपैकीं सात महा कुष्ठें व अकरा क्षुद्र कुष्ठें आहेत. सर्व प्रकारच्या कुष्ठांत तिन्ही दोष कमीजास्त प्रमाणानें बिघडलेले असतात. एक दोषापासून कोणतेंच कुष्ठ उत्पन्न होत नाहीं. असें असून जीं विशिष्ट दोषपरत्वें निरनिराळीं नांवें दिलीं आहेत तीं जो दोष ज्यांत मुख्य असेल त्यावरून दिलेलीं आहेत.

स्पर्शाज्ञत्वमतिस्वेदो न वा वैवर्ण्यमुन्नतिः ।
कोष्ठानां लोमहर्षश्च कंडूस्तोदः श्रमः क्लमः ॥ १० ॥
व्रणानामधिकं शूलं शीघ्रोत्पत्तिश्चिरस्थितिः ।
दाहः सुप्ताङ्गता चेति कुष्ठलक्षणमग्रजम् ॥ ११ ॥

**पूर्वरूप**—त्वचा बधिर होणें; घाम अतिशय किंवा मुळींच न येणें, त्वचेचा वर्ण बदलणें, अंगावर दादी उठणें, शहारे येणें, खाज, टोंचणें, थकवा, अनुत्साह, व्रणांना ठणका लागणें, किंचित् खाजविण्यानें किंवा अशाच दुसऱ्या क्षुल्लक कारणानें लगेच क्षत बनणें आणि तें पुष्कळ दिवसपर्यंत कायम राहणें, अंगाचा दाह व अंग जड होऊन मुंग्या येणें हीं लक्षणें कुष्ठ होण्यापूर्वीं होतात.


CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अतऊर्ध्वमष्टादशानां कुष्ठानां कपालोदुम्बरमंडलर्ष्यजिह्वपुण्डरीकसिध्मकाकणकैककुष्ठचर्मकिटिभविपादिकालसकदद्रुचर्मदलपामाविस्फोटकशतारुर्विचर्चिकानां लक्षणान्युपदेक्ष्यामः ॥ १२ ॥

आतां १ कपाल, २ उदुंबर, ३ मंडल, ४ ऋष्यजिव्ह, ५ पुंडरीक, ६ सिध्म, ७ काकणक, ८ एककुष्ठ, ९ चर्म, १० कटिभ, ११ विपादिका, १२ अलसक, १३ दद्रु, १४ चर्मदल, १५ पामा, १६ विस्फोटक, १७ शतारु व १८ विचर्चिका या अठरा प्रकारच्या कुष्ठांचीं लक्षणें सांगतों—

कृष्णारुणकपालाभं यद्रूक्षं परुषं तनु ।
कापालं तोदबहुलं तत्कुष्ठं विषमं स्मृतम् ॥ १३ ॥
कण्डूविदाहरुग्रागपरीतं लामपिञ्जरम् ।
उदुम्बरफलाभासं कुष्ठमौदुम्बरं विदुः ॥ १४ ॥
श्वेतं रक्तं स्थिरं स्त्यानं स्निग्धमुत्सन्नमण्डलम् ।
कृच्छ्रमन्योन्यसंसक्तं कुष्ठं मण्डलमुच्यते ॥ १५ ॥
कर्कशं रक्तपर्यंतमंतःश्यावं सवेदनम् ।
यदृष्यजिह्वासंस्थानमृष्यजिह्वं तदुच्यते ॥ १६ ॥
सश्वेतं रक्तपर्यन्तं पुण्डरीकदलोपमम् ।
सोत्सेधश्च सदाहश्च पुण्डरीकं तदुच्यते ॥ १७ ॥
श्वेतं ताम्रं तनु च यद्रजोघृष्टं विमुञ्चति ।
आलाबुपुष्पवर्णन्तत्सिध्मं प्रायेण चोरसि ॥ १८ ॥
यत्काकणन्तिकावर्णमपाकं तीव्रवेदनम् ।
त्रिदोषलिङ्गं तत्कुष्टं काकणं नैव सिध्यति ॥ १९ ॥

सप्तमहाकुष्ठांचीं लक्षणें— १ काळसर-तांबूस, खापरासारखें, रूक्ष, खडदडीत व पातळ असून फार टोंचणारें असें जें असतें तें कापालकुष्ठ होय. याची चिकित्सा विषम असल्यामुळें हें दुःसाध्य समजावें. २ ज्यांत खाज, जळण, ठणका व लाली असून ज्यावर पिंगट रंगाचे रोम असतात व जें रंगानें उंबराच्या फळासारखें असतें तें उदुम्बरकुष्ठ समजावें. ३ जें कुष्ठ पांढरुक, तांबूस, दडस, ओलसर, तुळतुळीत, उभरलेलें व एकमेकांशीं मिळून गेलेलें असें असेल तें मण्डलकुष्ठ समजावें. हें कृच्छ्रसाध्य असतें. ४ खडदडीत, बाजूस लाल, मध्यें काळें, ठणकणारें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

व अस्वलाच्या जिभेसारख्या आकृतीचें जें कुष्ठ तें ऋष्यजिव्ह समजावें. ५ मध्यें पांढरें असून लाल घेराचें, पांढऱ्या कमळपत्राच्या आकृतीचें, उंचवट व दाहयुक्त असें जें कुष्ठ तें पुंडरीककुष्ठ समजावें. ६ जें कुष्ठ पांढरुक तांबूस रंगाचें असून त्याच्या वरची त्वचा फार पातळ असते व त्या ठिकाणीं चोळलें असतां त्वचेचें मळासारखें भुसकट निघतें व ज्याचा रंग दुध्याभोपळीच्या फुलासारखा असतो त्यास सिध्मकुष्ठ ह्मणतात. हें बहुतकरून छातीवर होतें. अन्यत्र क्वचित् होतें. यास मराठींत शिबें असें ह्मणतात. ७ जें कुष्ठ गुंजेसारखें मध्यभागीं लालभडक आणि बाजूंनीं काळें असून पिकत नाहीं व अतिशय ठणका लागतो त्यास काकणकुष्ठ ह्मणतात. हें त्रिदोषजन्य असून अगदीं असाध्य आहे.

अस्वेदनं महावास्तु यन्मत्स्यशकलोपमम् ।
तदेककुष्ठं चर्माख्यं बहलं हस्तिचर्मवत् ॥ २० ॥
श्यावं किणखरस्पर्शं परुषं किटिभं स्मृतम् ।
वैपादिकं करे पादे स्फोटनं तीव्रवेदनम् ॥ २१ ॥
सकण्डूकैः सरागैश्च गण्डैरलसकं स्मृतम् ।
सकण्डूरागपिडकं दद्रूमण्डलमुद्गतम् ॥ २२ ॥
रक्तं सकण्डु सस्फोटं सरुग्दलति चापि यत् ।
तच्चर्मदलमाख्यातं संस्पर्शासहमुच्यते ॥ २३ ॥
पामा श्वेतारुणाः श्यावाः पिडकाः कंडुला भृशम् ।
श्वेताः श्यावारुणाभासा विस्फोटाः स्युस्तनुत्वचः ॥ २४ ॥
रक्तं श्यावं सदाहार्तिं शतारुः स्याद्बहुव्रणम् ।
सकण्डूः पिडकाः श्यावा बहुस्रावा विचर्चिकाः ॥ २५ ॥

अकरा क्षुद्र कुष्ठें— १ ज्या कुष्ठास घाम येत नाहीं, ह्मणजे जें चिघळत नाहीं, ज्याचा घेर मोठा असतो व जें माशाच्या अंगावरील खवल्याच्या चक्राकार आकृतीचें व त्याप्रमाणें चमकणारें असतें तें चर्मकुष्ठ होय. २ हत्तीच्या चामडीप्रमाणें जें जाड खडदडीत असतें तें चर्मकुष्ठ समजावें. रंगानें काळसर, हात वगैरेस पडलेल्या घट्ट्याप्रमाणें खडदडीत व रांठ असें जें कुष्ठ त्यास किटिभ ह्मणतात. ४ ज्या कुष्ठांत हातपाय फाटून तीव्र

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ठणका लागतो त्यास वैपादिक कुष्ठ ह्मणतात. ५ जें कुष्ठ खाजणाऱ्या लाल रंगाच्या पुळ्यांनीं भरलेलें असतें तें अलसक समजावें. ६ जें कुष्ठ लाल रंगाचें असून ज्यांत खाज सुटते व पुळ्या असतात आणि जें मण्डलाकार असून उभरलेलें असतें त्यास दद्रुकुष्ठ ह्मणतात. ७ जें कुष्ठ लाल रंगाचें असून ज्यांत फोड आलेले असतात, खाज पडते, ठणका होतो, जें फाटतें व ज्यास स्पर्श सहन होत नाहीं, त्यास चर्मदल ह्मणतात. ८ पांढऱ्या—तांबूस व काळ्या रंगाच्या अत्यंत खाजणाऱ्या अशा ज्या पुळ्या त्यांस पामा ह्मणतात. (ही बहुतकरून कंबर, हात व कोंपरावर होते ईस मराठींत खरूज ह्मणतात). ९ पांढऱ्या—काळसर—तांबूस रंगाच्या व पातळ त्वचेच्या पुळ्यांनीं युक्त असें जें कुष्ठ त्यास विस्फोट ह्मणतात. १० लाल, काळ्या रंगाचें, दाहयुक्त, ठणकणारें व ज्यांत पुष्कळशीं क्षतें असतात असें जें कुष्ठ त्यास शतारु ह्मणतात. ११ ज्यांत काळ्या रंगाचे, खाजणारे व एकसारखे वाहून चिघळणारे फोड असतात त्यास विचर्चिका ह्मणतात.

> वातेधिकतरे कुष्ठं कापालं मण्डलं कफे ।
> पित्ते त्वौदुम्बरं विद्यात्काकणन्तु त्रिदोषजम् ॥ २६ ॥
> वातपित्ते श्लेष्मपित्ते वातश्लेष्मणि चाधिके ।
> ऋष्यजिह्वं पुण्डरीकं सिध्मकुष्ठञ्च जायते ॥ २७ ॥
> चर्माख्यमेककुष्ठञ्च किटिभं सविपादिकम् ॥
> कुष्ठं चालसकं ज्ञेयं प्रायो वातकफाधिकम् ॥ २८ ॥
> दद्रुश्चर्मदलं पामा विस्फोटाश्च शतारुषः ।
> पित्तश्लेष्माधिकाः प्रायः कफप्राया विचर्चिका ॥ २९ ॥

एकंदर कुष्ठें त्रिदोषजन्य आहेत असें पूर्वीं सांगितलें आहे, तरी त्यांत-त्यात्यांत कापालकुष्ठांत वातदोष प्रधान असतो. मण्डलकुष्ठांत कफाचें आधिक्य असतें, उदुंबर कुष्ठ पित्ताधिक्यानें होतें. काकणकुष्ठांत तर तिन्ही दोष सारखे बिघडलेले असतात. ऋष्यजिव्हांत वातपित्ताचा जोर असतो, पुण्डरीकांत कफपित्त प्रबल असतात आणि वातकफाच्या आधिक्यानें सिध्म कुष्ठ होतें. चर्मकुष्ठ, एककुष्ठ, किटिभ, बिपादिक व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अलसक यांत बहुतकरून वातकफाचें प्राधान्य असतें; आणि दद्रु, चर्मदल, पामा, विस्फोट, शतारु व विचर्चिका हीं कुष्ठें प्रायः पित्त–कफाच्या आधिक्यापासून होतात.

सर्वं त्रिदोषजं कुष्ठं दोषाणाञ्च बलाबलम् ।
यथास्वैर्लक्षणैर्बुध्वा कुष्ठानां क्रियते क्रिया ॥ ३० ॥
दोषस्य यस्य पश्येत्कुष्ठेषु विशेषलिंगमुद्रिक्तम् ।
तस्यैव शमं कुर्यात्ततः परं चानुबन्धस्य ॥ ३१ ॥
कुष्ठविशेषैर्दोषा दोषविशेषैः पुनश्च कुष्ठानि ।
ज्ञायन्ते तैर्हेतुर्हेतुस्तांश्च प्रकाशयति ॥ ३२ ॥

यद्यपि कुष्ठांत तीनही दोष कोपतात तथापि प्रत्येक दोषाच्या निरराळ्या लक्षणांवरून कोणता दोष प्रबल आहे व कोणता दुर्बल आहे हें जाणून तदनुसार चिकित्सा केली जाते. ह्मणजे ज्या कुष्ठांत ज्या विशिष्ट दोषांचीं लक्षणें जोरदार दिसतील त्या दोषाची चिकित्सा प्रथम करून नंतर जो त्याचा संसर्गी दुर्बल दोष असेल त्याच्या चिकित्सेकडे वळावें. कुष्ठांच्या निरनिराळ्या लक्षणांवरून तें कोणत्या दोषाच्या प्रकोपापासून झालें आहे हें जाणलें जातें; व दोषांच्या निरनिराळ्या लक्षणांवरून हें कोणत्या प्रकारचें कुष्ठ आहे हें जाणलें जातें. ह्मणजे कुष्ठाच्या लक्षणांवरून त्याचें कारण व कारणांवरून कुष्ठाची जात जाणावयाची.

रौक्ष्यं शोषस्तोदः शूलं सङ्कोचनं तथायासः ।
पारुष्यं खरभावो हर्षः श्यावारुणत्वञ्च ॥ ३३ ॥
कुष्ठेषु वातलिंगं दाहो रागः परिस्रवः पाकः ।
विस्रो गन्धः क्लेदस्थांगपतनञ्च पित्तकृतम् ॥ ३४ ॥
श्वैत्यं शैत्यं कण्डूः स्थैर्यं सोत्सेधगौरवस्नेहाः ।
कुष्ठेषु तु कफलिंगं जन्तुभिरभिभक्षणं क्लेदः ॥ ३५ ॥
सर्वैरेतैर्लिङ्गैर्युक्तं मतिमान्विवर्जयेद्बलम् ।
तृष्णादाहपरीतं शान्ताग्निं जन्तुभिर्जग्धम् ॥ ३६ ॥
वातकफप्रबलं यद्यदेकदोषोल्बणं न तत्कृच्छ्रम् ।
कफपित्तवातपित्तप्रबलानि तु कृच्छ्रकुष्ठानि ॥ ३७ ॥

**दोषलक्षणें व साध्यासाध्यविचार**—रूक्षता, शुष्कपणा, टोंचण, ठणका, आखडणें, आयास, दडसपणा, खरखरीतपणा, शहारे येणें व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

काळसर–तांबूस रंग हीं लक्षणें वातप्रधान कुष्ठांत होतात. दाह, लाली, वाहणें, पिकणें, हिरवट मांसासारखी घाण, चिघळणें व अवयव गळून पडणें हीं पित्ताधिक कुष्ठांचीं लक्षणें होत. पांढरेपणा, थंडपणा, खाज, कठिणपणा, उंचवटपणा, जाड्य, चिकटपणा, किडे पडणें व ओलसरपणा असणें हीं कफाधिक्याचीं लक्षणें समजावीं. ज्या कुष्ठांत वरील तिन्ही दोषांचीं लक्षणें हजर आहेत, रोगी निःशक्त झालेला आहे, तहान अतिशय लागत आहे, दाह होत आहे, अग्नि मंद झालेला आहे व कुष्ठांत किडे पडले आहेत, अशा कुष्ठाची बुद्धिमान् वैद्यानें मुळींच चिकित्सा करूं नये. वातकफाच्या जोडीनें किंवा एकेक दोषाधिक्यानें झालेलें कुष्ठ सुसाध्य आहे. आणि कफपित्त व वातपित्त या द्वंद्वांनीं झालेलीं कुष्ठें कृच्छ्रसाध्य जाणावीं.

वातोत्तरेषु सर्पिर्वमनं श्लेष्मोत्तरेषु कुष्ठेषु ।
पित्तोत्तरेषु मोक्षो रक्तस्य विरेचनं चाग्र्यम् ॥ ३८ ॥
वमनविरेचनयोगाः कल्पोक्ताः कुष्ठिनां प्रयोक्तव्याः ।
प्रच्छन्नमल्पकुष्ठे महति च शस्तं शिरोव्यधनम् ॥ ३९ ॥
बहुदोषः संशोध्यः कुष्ठी बहुशोनुरक्षता प्राणान् ।
दोषे ह्यतिमात्रहृते वायुर्हन्याद्बलमाशु ॥ ४० ॥
स्नेहस्य पानमिष्टं शुद्धे कोष्ठे प्रवाहिते रुधिरे ।
वायुर्हि शुद्धकोष्ठं कुष्ठिनमबलं विशति शीघ्रम् ॥ ४१ ॥

**चिकित्सेची सरणी**—वाताधिक कुष्ठांत प्रथम घृतपान करवावें. कफाधिक कुष्ठांत वांति करवावी आणि पित्तप्रधान कुष्ठांत रक्त काढवून जुलाब द्यावा. कुष्ठरोग्यास वमन–विरेचन द्यावयाचें तें कल्पस्थानांत सांगितलेल्या प्रयोगांप्रमाणें द्यावें; आणि रक्त काढावयाचें तें क्षुद्र कुष्ठांत तुंबडी वगैरे लावून काढावें आणि महाकुष्ठांत शिरा तोडून काढावें. रोग्याच्या शरीरांत दोषांचा संचय फार असल्यास त्याचें, वमन–विरेचनादि द्वारा दरवेळीं थोडथोडें असें बरेच वेळां मिळून संशोधन करावें. अर्थात् एकदमच फार जोरदार विरेचनादिक देऊन त्याचा कोठा खालीं करूं नये. एकदमच दोष फार निघून गेल्यास त्या योगानें रोगी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अशक्त होऊन त्यास वायु तत्काल मारील. रोग्याचें आंतून शोधन होऊन कोठा साफ झाला व बाहेरून रक्त काढून टाकिलें ह्मणजे त्यास स्नेह पाजणें इष्ट आहे. कारण तसें न केल्यास त्या शुद्ध कोठ्याच्या व अशक्त झालेल्या रोग्यास वायु तत्काल पछाडून टाकील.

दोषोत्क्लिष्टे हृदये वाम्यः कुष्ठेषु चोर्ध्वभागेषु ।
कुटजफलमदनमधुकैः सपटोलैर्निम्बरसयुक्तैः ॥ ४२ ॥
शीतरसः पक्वरसो मधुनि मधुकश्च वमनानि ।
कुष्ठेषु त्रिवृद्दंती त्रिफला च विरेचने शस्ता ॥ ४३ ॥
सौवीरकं तुषोदकमालोडनमासवाँस्तु शीध्वादीन् ।
शंसन्त्यधोहराणां यथाविरेकः क्रमश्चेष्टः ॥ ४४ ॥

दोष चाळवून छातींत जमा झाले असतां आणि कुष्ठ शरीराच्या वरच्या भागांत झालें असतां, इंद्रजव, गेळफळ, ज्येष्ठीमध व कडू पडवळ यांचा कल्क कडू लिंबाच्या काढ्यांतून देऊन वांति करवावी. तसेंच उंसाचा रस कढवून किंवा न कढवून केलेलें मद्य, मध व ज्येष्ठीमध यांचें वमन द्यावें. निशोत्तर, दंतीमूळ व त्रिफळा हीं औषधें कुष्ठरोगांत विरेचनास प्रशस्त आहेत. विरेचन औषधें द्यावयाचीं तीं सौवीरक तुषोदक, आसव, शीधु वगैरे अनुपानांतून द्यावीं. विरेचन दिल्यानंतर पेयादि क्रम यथायोग्य पाळावा.

दार्वीबृहतीसेव्यैः पटोलपिचुमन्दमदनकृतमालैः ।
सस्नेहैरास्थाप्यः कुष्ठी सकलिंगयवमुस्तैः ॥ ४५ ॥
वातोल्बणं विरिक्तं निरूढमनुवासनार्हमालक्ष्य ।
फलमधुकनिम्बकुटजैः सपटोलैः साधयेत्स्नेहम् ॥ ४६ ॥
दन्तीमधुकसैन्धवफणिज्जकाः पिप्पलीकरञ्जफलम् ।
नस्यं स्यात्सविडंगं कृमिकुष्ठकफप्रदोषघ्नम् ॥ ४७ ॥
वैरेचनिकैर्धूमैः श्लोकस्थानेरितैश्च शाम्यन्ति ।
कृमयः कुष्ठकिलासाः प्रयोजितैरुत्तमाङ्गस्थाः ॥ ४८ ॥

दारुहळद, डोरलीमूळ, वाळा, कडू पडवळ, कडू लिंबाची साल, गेळफळ, बाहवा, इंद्रजव व नागरमोथा, यांचे काढ्यांत दोषपरत्वें तेल किंवा तूप मिळवून त्याचा आस्थापन बस्ती द्यावा. वर सांगितल्याप्रमाणें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विरेचन व आस्थापन बस्ती दिल्यानंतर जर वाताचा जोर कायम असून अनुवासन देण्याची जरूर न दिसेल तर गेळफळ, ज्येष्ठीमध, कडू निंब, कुड्याची साल व कडू पडवळ यांनीं तूप किंवा तेल सिद्ध करून त्याचा अनुवासन बस्ती द्यावा. दंतीमूळ, ज्येष्ठीमध, सैंधव, पांढरा मरवा, पिंपळी करंजाची बी व वावडिंग यांचें चूर्ण करून तें नाकांत ओढल्यानें (नस्य केल्यानें) मस्तकांतील किडे, कुष्ठ व कफदोष नाहींसे होतात. सूत्रस्थानांत सांगितलेल्या वैरेचनिक धुऱ्या दिल्यानें मस्तकांतील किडे, कुष्ठ व श्वेतकुष्ठ हीं नाहींशीं होतात.

स्थिरकठिनमण्डलानां स्विन्नानां प्रस्तरप्रणाडीभिः।
कूर्चैर्विघट्टितानां रक्तोत्क्लेशोऽपनेतव्यः॥ ४९॥
आनूपवारिजानां मांसानां पोटलैः सुखोष्णैश्च।
स्विन्नोत्सन्नं विलिखेत्कुष्ठं तीक्ष्णेन शस्त्रेण॥ ५०॥
रुधिरागमार्थमथवा शृंगालाबूभिराहरेद्रक्तम्।
प्रच्छितमल्पं कुष्ठं विरेचयेद्वा जलौकाभिः॥ ५१॥
ये लेपाः कुष्ठानां युज्यन्ते निर्हृतास्रदोषाणाम्।
संशोधिताशयानां सद्यः सिद्धिर्भवेत्तेषाम्॥ ५२॥

कुष्ठांचीं जाड—दडस चकदळें ( मंडलें ) सूत्रस्थानाच्या स्वेदाध्यायांत सांगितलेल्या प्रस्तर व नाडीस्वेद विधीनें स्विन्न करून ह्मणजे घाम आणून, नंतर लोहकूर्चांनीं खरवडून त्यांत सांकळलेलें रक्त काढून टाकावें किंवा पाणथळ देशांतील अथवा जलचर प्राण्यांच्या सोसण्याजोग्या गरम मांसाची पोटली करून त्यानें तीं चकदळें शेकून वर उभरलीं ह्मणजे तीक्ष्ण शस्त्रानें खरवडून रक्त काढावें. किंवा शिंग अथवा तुंबडी लावून रक्त काढावें. लहानसें कुष्ठ असलें तर जळवा लावून रक्त काढावें. ज्यांचें दूषित रक्त वरील उपायांनीं काढून टाकिलें आहे व वमनविरेचनांनीं आंतून कोठा शुद्ध केला आहे, अशा रोग्यांच्या कुष्ठांवर कुष्टनाशक औषधांचा लेप केल्यानें तीं लवकर बरीं होतात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

येषु न शस्त्रं क्रमते स्पर्शेन्द्रियनाशनानि यानि स्युः ।
तेषु निपात्यः क्षारो रक्तं दोषं च निःस्राव्यम् ॥ ५३ ॥
पाषाणकठिनपरुषे सुप्ते कुष्ठे स्थिरे पुराणे च ।
पीतागदस्य कार्यो विषैः प्रदेहोऽगदैश्चानु ॥ ५४ ॥
स्तब्धातिसुप्तसुप्तान्यस्वेदनकण्डुलानि कुष्ठानि ।
कूर्चैर्दन्तीत्रिफलाकरवीरकरञ्जनिम्बकुटजानाम् ॥ ५५ ॥
जात्यर्कनिम्बजैर्वा पत्रैः शस्त्रैः समुद्रफेनैर्वा ।
घृष्टानि गोमयैर्वा ततः प्रलेपैः प्रदेह्यानि ॥ ५६ ॥

ज्या स्पर्शनेन्द्रिय ह्मणजे त्वचानाशक कुष्ठांवर शस्त्रोपाय चालत नाहीं त्या कुष्ठांतील रक्त व दोष क्षारद्वारा काढून टाकावे. दगडाप्रमाणें कठिण, खरखरीत, बधिर, जाड व जुन्या अशा कुष्ठांवर विषहर औषधें पोटांत घेऊन वर विषारी औषधांचा लेप द्यावा व त्यांचें काम झालें ह्मणजे पुन्हां विषनाशक औषधाचा लेप द्यावा. ताठरलेलीं, अति बधिर, कोरडीं व खाजणारीं अशीं कुष्ठें दंती, त्रिफळा ( झाडें ), कण्हेर, करंज, कडूलिंब व कुडयाच्या लांकडाच्या कुंच्यानें, जाई, रुई व कडूलिंब यांच्या पानांनीं, शस्त्रांनीं, समुद्रफेणानें किंवा सुक्या गोंवरीनें घांसून मग त्यांवर लेप द्यावे.

मारुतकफकुष्ठघ्नं कर्मोक्तं पित्तकुष्ठिनां कार्यम् ॥
कफपित्तरक्तहरणं तिक्तकषायैः प्रशमनश्च ॥ ५७ ॥
सर्पींषि तिक्तकानि च यच्चान्यद्रक्तपित्तनुत्कर्म ।
बाह्याभ्यन्तरमग्र्यं तत्कार्यं पित्तकुष्ठेषु ॥ ५८ ॥
दोषाधिक्यविभागादित्येतत्कर्म कुष्ठनुत्प्रोक्तम् ।
वक्ष्यामि कुष्ठशमनं प्रायस्त्वग्दोषसामान्यात् ॥ ५९ ॥

येथपर्यंत वातकफजन्य कुष्ठाची चिकित्सा सांगितली. आतां पित्तजन्य कुष्ठांत कफ, पित्त व रक्त काढून टाकून तिक्त वर्गांतील औषधांचे काढे व तिक्तघृतें व रक्तपित्तनाशक इतर अन्तर्बाह्य उपाय करावे. येथपर्यंत ही दोषपरत्वें निरनिराळ्या कुष्ठांची चिकित्सा सांगितली. आतां यावत्कुष्ठांत त्वचेचा बिघाड मुख्य असतो अशा दृष्टीनें सर्व सामान्य कुष्ठांवर उपयोगी पडणारी चिकित्सा सांगतों.


CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दार्वीं रसांजनं वा गोमूत्रेण प्रबाधते कुष्ठम् ।
अभया प्रयोजिता वा मासं सव्योषसगुडतिला ॥ ६० ॥
मूलं पटोलस्य तथा गवाक्ष्याः पृथक्पलांशं त्रिफला त्रिवृच्च ।
स्यात्त्रायमाणा कटुरोहिणी च भागार्द्धिका नागरपादयुक्ता ६१
पलन्तथैकं सहचूर्णितानां जले शृतं दोषहरं पिबेच्च ।
जीर्णे रसे धन्वमृगद्विजानां पुराणशाल्योदनमाददीत ॥ ६२ ॥
कुष्ठानि शोफग्रहणीप्रदोषमर्शांसि कृच्छ्राणि हलीमकञ्च ।
षड्रात्रयोगेन निहन्ति चैव हृद्वस्तिशूलं विषमज्वरञ्च ॥ ६३ ॥

**सर्वकुष्ठनाशक योग**—दारुहळद किंवा रसांजन गोमूत्रांतून घेतलें असतां कुष्ठ नाहींसें होतें व सुंठ, मिरें, पिंपळी, गूळ व तीळ यांसह हिरड्याचें चूर्ण महिनाभर सेवन केलें असतां कुष्ठ बरें होतें. कडू पडवळाचें मूळ व कंवडळमूळ, त्रिफळा व निशोत्तर हीं प्रत्येकीं ४।४ तोळे, त्रायमाण व कुटकी प्रत्येकीं दोन दोन तोळे आणि सुंठ १ तोळा ह्या सर्व औषधांचें एकत्र चूर्ण करून त्यांतून एक तोळा चूर्ण पाण्यांत कढवून प्यावें, ह्मणजे सर्व दोष निघून जातो. औषध जिरल्यावर जांगल पशु—पक्ष्यांच्या मांसरसाबरोबर जुन्या तांदुळांचा भात जेवावा. याप्रमाणें हा प्रयोग सतत सहा दिवसपर्यंत केल्यानें कुष्ठ, सूज, संग्रहणी, मूळव्याध, मूत्रकृच्छ्र, हलीमक, श्वास, छातींतलें दुखणें, बस्तिशूल व विषमज्वर नाश पावतात.

मुस्तं व्योषं त्रिफला मञ्जिष्ठा दारु पंचमूले द्वे ।
सप्तच्छदनिंबत्वक्सविशालश्चित्रको मूर्वा ॥ ६४ ॥
चूर्णं तर्पणभागैर्नवभिः संयोजितं समध्वाज्यम् ।
श्रेष्ठं कुष्ठनिबर्हणमेतत्प्रायोगिकं भक्ष्यम् ॥ ६५ ॥
श्वयथुं सपाण्डुरोगं श्वित्रं ग्रहणीप्रदोषमर्शांसि ।
ब्रध्नभगन्दरपिडकाकण्डूकोठांश्च विनिहन्ति ॥ ६६ ॥

नागरमोथा, सुंठ, मिरीं, पिंपळी, त्रिफळा, मंजिष्ठ, देवदार, रानगांजा, रानभाल, रिंगणी, डोरली, गोखरू, बेल, ऐरण, टेंटू, शिवण व पाडळ या दहा वनस्पतींचीं मुळें, सातवीण, कडू निंबाची साल, इंद्रायणमूळ, चित्रक व मोरवेल या सर्वांचें समभाग चूर्ण करून त्यांत त्याच्या नऊ

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हिस्से सातूचें पीठ मिळवून मध व तूप घालून सतत भक्षण करावें. हा उत्तम कुष्ठनाशक प्रयोग आहे. इतकेंच नव्हे तर हा सूज, पांडुरोग, श्वेतकुष्ठ, संग्रहणी, मूळव्याध, व्रण, भगंदर, पुटकुळ्या, खाज व शीतपित्त यांचाही नाश करितो.

त्रिफलातिविषाकटुकानिम्बकलिंगकवचापटोलानाम् ।
मागधिकारजनीद्वयपद्मकमूर्वाविशालानाम् ॥ ६७ ॥
भूनिम्बपलाशानां दद्याद्विपलं ततस्त्रिवृद्द्विगुणा ।
तस्याश्च पुनर्ब्राह्मी तच्चूर्णं सुप्तिनुत्परमम् ॥ ६८ ॥

सुप्तिकुष्ठावर चूर्ण—त्रिफळा, अतिविष, कुटकी, कडूनिंब, इंद्रजव, वेखंड, कडू पडवळ, पिंपळी, हळद, दारुहळद, पद्मकाष्ठ, मोरवेल, इंद्रायणमूळ, किराईत व पळसाचें मूळ किंवा साल हीं सर्व औषधें प्रत्येकीं ८।८ तोळे, याच्या दुप्पट निशोत्तर व निशोत्तराच्या दुप्पट ब्राह्मी ( कित्येकांच्या मतें या ठिकाणीं ब्राह्मीचा अर्थ भारंगमूळ करावा ) या सर्वांचें चूर्ण ( मध व तुपांतून ) द्यावें. हें बधिरकुष्ठ घालविणारें उत्कृष्ट औषध आहे.

नवनीतकप्रयोगो रसेन जात्याः समाक्षिकः परमः ।
सप्तदशकुष्ठघाती माक्षिकधातुश्च मूत्रेण ॥ ६९ ॥
गन्धकयोगसुवर्णमाक्षिकयोगादेव (?) ।
सर्वव्याधिविनाशनमद्यात्कुष्ठी रसञ्च निगृहीतम् ॥ ७० ॥
वज्रं शिलाजतुसहितं सहितं वा योगराजेन ।
सर्वव्याधिहरणार्थमद्यात्कुष्ठी निगृह्य नित्यञ्च ॥ ७१ ॥

लोणी व रक्त्याबोळ मध घालून आणि माक्षिकभस्म गोमूत्राबरोबर घेतलें असतां सतराही कुष्ठांचा नाश करितें. शुद्धगंधक, सुवर्णमाक्षिकभस्म किंवा शुद्ध केलेला पारा कुष्ठी मनुष्यानें सर्वरोगशमनार्थ सेवन करावा. शिलाजिताशीं किंवा योगराज ( गुग्गुळा ) सहित हिऱ्याचें भस्म नियमपूर्वक सेवन करावें.

खदिरसुरदारुसारं श्रपयित्वा तद्रसेन तोयार्थः ।
क्षौद्रप्रस्थे कार्यः कार्येते चाष्टपलिके च ॥ ७२ ॥

---

हे श्लोक सर्व प्रतींत आढळत नाहींत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ततश्चायश्चूर्णानामष्टपलं प्रक्षिपेत्तथा भसितम्।
त्रिफलैले त्वङ्मरिचं पत्रं कनकञ्च कर्षांशम् ॥ ७३ ॥
मत्स्यण्डिका मधुसमा तन्मांसमायसे भाण्डे।
मध्वासवमाचरतः कुष्ठकिलासे शमं यातः ॥ ७४ ॥

मध्वासव—खैराचा व देवदाराचा सार प्रत्येकीं ३२-३२ तोळे घेऊन त्यांचा काढा करावा; आणि त्यांत १२० तोळे मध, लोहभस्म ३२ तोळे, त्रिफळा, वेलची, दाचालिनी, काळीं मिरें, तमालपत्र व पिंवळ्या घोतऱ्याचें बीं हीं प्रत्येकीं एकेक तोळा आणि खडीसाखर १२० तोळे याप्रमाणें हीं सर्व द्रव्यें मिळवून तो काढा लोखंडाच्या भांड्यांत भरून महिनाभर पुरून ठेवावा. ह्मणजे हा मध्वासव तयार झाला. हा घेतल्यापासून कुष्ठ व किलास हीं नाहींशीं होतात.

खदिरकषायद्रोणं कुम्भे घृतभाविते समारोप्य।
द्रव्याणि चूर्णितानि देयानि त्वष्टपलिकानि ॥ ७५ ॥
त्रिफला व्योषविडंगं रजनीमुस्ताटरूषकेंद्रयवा।
सौवर्णं त्वक्छिन्ना मासं निदधीत धान्यराशौ च ॥ ७६ ॥
प्रातः प्रातः पिबेत्ततो युक्त्या मासेन महाकुष्ठं हन्त्येवाल्पंतु।
पक्षेणार्शः श्वासभगंदरकासकिलासप्रमेहशोषाँश्च।
ना भवति कनकवर्णः पीत्वारिष्टं कनकबिन्दुम् ॥ ७७ ॥

कनकबिन्द्वरिष्ट—तुपानें रावलेल्या मडक्यांत खैरसाराचा ३२ शेर काढा करून त्यांत त्रिफळा, सुंठ, मिरें, पिंपळी, वावडिंग, हळद, नागरमोथा, अडूळसा, इंद्रजव, पिंवळ्या धोतऱ्याचें बीं, दालचिनी व गुळवेल या प्रत्येकाचें ३२ तोळे चूर्ण घालून तें मडकें धान्याच्या राशींत एक महिनाभर पुरून ठेवावें, ह्मणजे हें कनकबिन्द्वरिष्ट तयार झालें. हें दररोज सकाळीं योग्य प्रमाणांत घेतलें असतां सात महाकुष्ठें एक महिन्यांत बरीं होतात; आणि अकरा क्षुद्र कुष्ठें तर एक पंधरवड्यांतच जातात. तसेंच मूळव्याध, दमा, भगंदर, खोकला, कोड, प्रमेह व क्षय हे रोगही याचे योगानें नाहींसे होऊन रोग्याच्या शरीराची कांति सोन्याप्रमाणें होते.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कुष्ठेष्वनिलकफकृतेष्वेवं पेयस्तथापि पित्तेषु ।
कृतमालक्काथश्चाप्येष विशेषात्कफकृतेषु ॥ ७८ ॥
त्रिफलासवः सगौडः सचित्रकः श्वित्ररोगकुष्ठघ्नः ।
क्रमुकदशमूलदन्तीवरांगमधुयोगसंयुक्तः ॥ ७९ ॥

वरील अरिष्ट वात-कफजन्य कुष्ठांवर द्यावें. तसेंच वरील अरिष्टांत खैराच्या जागीं बाहवा घालून पित्तजन्यकुष्ठांवर द्यावें. गूळ, चित्रक, सुपारी, दशमुळें, दंतीमूळ, दालचिनी व मध यांनीं युक्त असा त्रिफळ्याचा आसव घेतला असतां तो श्वित्र व कुष्ठ नाहींसे करितो.

लघूनि चान्नानि हितानि विद्यात्कुष्ठेषु शाकानि च तिक्तकानि ।
भल्लातकैश्च त्रिफलैः सनिम्बैर्युक्तानि चान्नानि घृतानि चैव ॥ ८० ॥
पुराणधान्यान्यथ जाङ्गलानि मांसानि मुद्गाश्च पटोलयुक्ताः ।
शस्ता न गुर्वम्लपयोदधीनि नानूपमत्स्या न गुडास्तिलाश्च ॥ ८१ ॥

पथ्यापथ्यविचारः—कुष्ठरोगास हलकीं धान्यें, कडू रसाच्या भाज्या भिलावे, त्रिफळा, कडूनिंब यांच्या संस्कारांनीं बनविलेले खाण्याचे पदार्थ व घृतें, जुनीं धान्यें, जांगल जनावरांचें मांस आणि कडू पडवळ मिश्रित मूग हे जिन्नस पथ्य आणि जड व आंबट पदार्थ दूध, दहीं, पाणथळ जनावरांचें मांस, मासे, गूळ व तीळ हे पदार्थ अपथ्य समजावे.

एला कुष्ठं दार्वी शतपुष्पा चित्रकं विडङ्गञ्च ।
कुष्ठालेपनमिष्टं रसाञ्जनञ्चाभया चैव ॥ ८२ ॥
चित्रकमेलां बिम्बीं वृषकं त्रिवृदर्कनागरकम् ।
चूर्णीकृतमष्टाहं भावयितव्यं पलाशस्य ॥ ८३ ॥
क्षारेण गवां मूत्रे स्रुतेन तेनास्य मंडलान्याशु ।
भिद्यन्तं विलयन्ति च लिप्तान्यर्काभितप्तानि ॥ ८४ ॥
मांसी मरिचं लवणं रजनी तगरं सुधा च गृहधूमः ।
मूत्रं पित्तं क्षारः पालाशः कुष्ठनुल्लेपः ॥ ८५ ॥
त्रपुसीसमयश्चूर्णं मण्डलनुत्फल्गुचित्रकं बृहती ।
गोधारसः सलवण दारु च मूत्रञ्च मण्डलनुत् ॥ ८६ ॥
कदलीपलाशपाटलिनिचुलक्षाराम्भसा प्रसन्नेन ।
मांसेषू तोयकार्यं कार्यं पिष्टे च किण्वे च ॥ ८७ ॥
तैर्मोदकः सुजातः किण्वैर्जनितप्रलेपनं शस्तम् ।
मण्डलकुष्ठविनाशनमातपसंस्थे कृमिघ्नञ्च ॥ ८८ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मुस्तं मदनं त्रिफला करञ्ज आरग्वधं कलिङ्गयवाः
दार्वी ससप्तपर्णा स्नानं सिद्धार्थकं नाम् ॥ ८९ ॥
एष कषायो वमनं विरेचनं वर्णकरस्तथोद्धर्षः ।
त्वग्दोषकुष्ठशोफप्रबाधनः पांडुरोगघ्नः ॥ ९० ॥
कुष्ठं करञ्जबीजान्येडगजः कुष्ठसूदनो लेपः ।
प्रपुनाडबीजसैन्धवरसांजनकपित्थरोध्राश्च ॥ ९१ ॥
करवीरमुलकल्कः कूटजकरञ्जात्फलं त्वचो दार्व्याः ।
सुमनः प्रवालयुक्तो लेपाः कुष्ठापहः सिद्धः ॥ ९२ ॥
लोध्रस्य धातकीनां वत्सकबीजस्य नक्तमालस्य ।
कल्कश्च मालतानां कुष्ठेषूद्धर्तनालेपः ॥ ९३ ॥
शैरीषी त्वक्पुष्पं कार्पास्या राजवृक्षपत्राणि ।
पिष्टा च काकमाची चतुर्विधः कुष्ठहा लेपः ॥ ९४ ॥

**कुष्ठांवर लेपादिः**—वेलची, कोष्ट, दारुहळद, बडिशोप, चित्रक, वावडिंग, रसांजन व हिरडे यांचा कुष्ठांवर लेप करावा. चित्रक, वेलची, तोंडली, अडुळसा, निशोत्तर, रुई व सुंठ यांचें चूर्ण करून तें गोमूत्रांत पळसाचा क्षार टाकून त्यांत आठ दिवस भिजत ठेवावें व नवव्या दिवशीं त्याचा लेप लावून उन्हांत बसावें. ह्मणजे कुष्ठाचीं चकदळें तत्काल फुटून बसून जातात. जटामांसी, काळीं मिरें, सैंधव, हळद, तगर, तिधारी निवडुंग, घेरोसा, गोमूत्र, गोरोचन व पळसाचा क्षार यांचा लेप दिल्यानेंही कुष्ठ बरें होतें. कथिल–शिसें–लोखंड–यांचें चूर्ण, बोखाडा, ( काळा उंबर ) चित्रक व डोरली यांच्या लेपानें कुष्ठांचीं चकदळें बरीं होतात. तांबड्या लाजाळूचा रस, सैंधव, देवदार व गोमूत्र यांच्या लेपानेंही कुष्ठ बरें होतें. केळ, पळस, पाडळ व वेत यांच्या क्षारांच्या निवळींत मांस शिजवावें. नंतर त्यांत तांदुळ वांटून घ्यावें. त्याचप्रमाणें सुराबीज वाटावें. नंतर त्याचा गोळासा होईल; त्यांतून सुराबीज घेऊन वरील क्षाराच्या निवळींत मिळवून त्याचा लेप द्यावा. या योगानें मंडलकुष्ठाचा नाश होतो आणि हा लेप लावून उन्हांत बसलें असतां कुष्ठव्रणांतील किडे मरतात. नागरमोथा, गेळफळ, त्रिफळा, करंजाच्या बिया, बाहवा, इंद्रजव, दारुहळद, सातवीण व पांढ्या शिरसा हीं द्रव्यें टाकून तापविलेल्या पाण्यानें स्नान घालावें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्याचप्रमाणें हीं औषधें पोटांत घेतलीं असतां वमन व विरेचन होतें. तसेंच हीं वांटून अंगास चोळली असतां त्वचेचे रोग, कुष्ठ, सूज व पांडुरोग नाहींसे होऊन रोग्याची वर्णवृद्धि होते. कोष्ठ, करंजाच्या बिया व टाकळ्याचें बीं, हीं वांटून त्यांचा लेप दिला असतां कुष्ठ बरें होतें. टाकळ्याचें बीं, सैंधव, रसांजन, कवठ, लोध्र, पांढऱ्या कण्हेरीचें मूळ, इंद्रजव, करंजाच्या बिया, दालचिनी, दारुहळद व जाईचीं पानें या सर्व औषधांचा लेप केल्यानें कुष्ठ नाश पावतें. लोध्र, धायटीचीं फुलें, इंद्रजव, करंज व जाईचा पाला यांचा कल्क करून त्याचें उटणें व लेप लावल्यानें कुष्ठ नाहींसें होतें. १ शिरसाची साल, २ कापशीचें फूल, ३ बाहव्याचा पाला व ४ कांगोणीचा कल्क हे चार प्रकारचे लेप कुष्ठनाशक आहेत.

> दार्व्या रसाञ्जनस्य च निम्बपटोलस्य खदिरसारस्य ।
> आरग्वधवृक्षकयोस्त्रिफलायाः सप्तपर्णस्य ॥ ९५ ॥
> इति षट् कषाययोगा निर्दिष्टः सप्तमश्च तिनिशस्य ॥
> स्नाने पाने च मतास्तथाष्टमश्चाश्वमारस्य ॥ ९६ ॥
> आलेपनं प्रघर्षणमवचूर्णनमेत एव च कषाया ।
> तैलघृतपाकयोगे चेष्यन्ते कुष्ठशान्त्यर्थम् ॥ ९७ ॥

**कषायाष्टकः**—१ दारुहळद–रसांजन, २ कडूनिंब–कडुपडवळ, ३ खैराचा सार, ४ बाहवा–कुड्याची साल, ५ त्रिफळा, ६ सातवीण, ७ तिवस आणि ८ वा पांढऱ्या कण्हेरीच्या मुळ्यांचा, या आठ काढ्यांचा स्नान, पिणें, लेप, उटणें व अंगास चोळणें या कामीं उपयोग करावा. तसेंच याच काढ्यांत तेल व तूप सिद्ध करून तें कुष्ठावर योजावें.

> त्रिफलानिम्बपटोलं मंजिष्ठा रोहीणी वचा रजनी ।
> एष कषायोभ्यस्तो हिनस्ति कफपित्तं कुष्ठम् ॥ ९८ ॥
> एतैरेव च सर्पिः सिद्धं वातोल्बणं जयति कुष्ठम् ।
> एष च कल्पो दृष्टः खदिरासनदारुनिम्बानाम् ॥ ९९ ॥
> कुष्ठार्कतुत्थकट्फलमूलकबीजानि रोहिणी कटुका ।
> कुटजफलोत्पलमुस्तं बृहतीकरवीरकाशीसम् ॥ १०० ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

एडगजनिम्बपाठा दुरालभा चित्रको विडंगश्च ।
तिक्तेक्ष्वाकूबीजं कम्पिल्लकसर्षपवचा दार्वी ॥ १०१ ॥
एतैस्तैलं सिद्धं कुष्ठघ्नं योग एष वा लेपः ।
उद्वर्तनं प्रघर्षणमवचूर्णनमेष एवेष्टः ॥ १०२ ॥

घृततैल प्रयोगः—त्रिफळा, कडूलिंबसाल, कडू पडवळ, मंजिष्ठ, कुटकी, वेखंड व हळद यांचा काढा सतत सेवन केला असतां कफ-पित्त कुष्ठ जातें. याच औषधांच्या काढ्यांत केलेलें तूप सेवन केल्यानें वातप्रधानकुष्ठ नाहींसें होतें. असाच खैरसाल, असाणासाल, देवदार व कडूनिंबाची साल यांचा प्रयोग केल्यानेंही वातजन्य कुष्ठ बरें होतें. कोष्ठ, रुई, मोरचूत, कायफळ, मुळ्याचें बीं, कुटकी, इंद्रजव, निळें-कमळ, नागरमोथा, डोरलीमूळ, कण्हेरीचें मूळ, हिराकस, टाकळ्याचें बीं, कडूनिंब, पहाडमूळ, धमासा, चित्रक, वावडिंग, कडू दुध्याच्या बिया कपिला, शिरसा, वेखंड व दारुहळद या औषधांनीं तयार केलेलें तेल चोळलें असतां कुष्ठनाशक आहे. याच औषधांचा उपयोग लेप, उटणें, घांसणें, चोळणें अशा कामींही करावा.

श्वेतकरवीरकरसो गोमूत्रं चित्रको विडंगश्च ।
कुष्ठेषु तैलयोगः सिद्धोयं सम्मतो भिषजाम् ॥ १०३ ॥

श्वेतकरविरादि तेल—पांढऱ्या कण्हरीचें मूळ, गोमूत्र, चित्रक व वावडिंग या औषधांनीं सिद्ध केलेलें तेल कुष्ठांवर खात्रीचें आहे असें वैद्यलोक मानितात.

श्वेतकरवीरपल्लवमूलत्वक् वत्सकविडंगाश्च ।
कुष्ठार्कमूलसर्षपशिग्रुत्वग्रोहिणीकटुका ॥ १०४ ॥
एतैस्तैलं साध्यं कल्कैः पादांशिकैर्गवां मूत्रम् ।
दत्वा तैलचतुर्गुणमभ्यंगाः कुष्ठकण्डूघ्नः ॥ १०५ ॥

श्वेतकरवीरपत्रादि तैल—पांढऱ्या कण्हेरीचीं पानें, मुळें व साल, कुड्याची साल, वावडिंग, कोष्ठ, रुईचें मूळ, शिरसा, शेवग्याची साल व कुटकी या सर्व औषधांचा वांटून गोळा करून त्यांत त्याच्या चौपट

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तेल व तेलाच्या चौपट गोमूत्र मिळवून तें तेल तयार करावें. या तेलाची अंगास मालिश केल्यानें कुष्ठ व कण्डू हीं नाहींशीं होतात.

तिक्तेक्ष्वाकुबीजं द्वे तुत्थे रोचना हरिद्रे द्वे ।
बृहतीफलमेरण्डः सविशालश्चित्रको मूर्वा ॥ १०६ ॥
काशीसहिंगुशिग्रुत्र्यूषणसुरदारुतुम्बुरुविडङ्गम् ।
लाङ्गलकं कुटजत्वक् कटुकाख्या रोहिणी चैव ॥ १०७ ॥
सर्षपकल्कैरेतैर्मूत्रे चतुर्गुणे साध्यम् ।
कण्डूकुष्ठविनाशनमभ्यङ्गान्मारुतकफघ्नं तैलम् ॥ १०८ ॥

**तिक्तेक्ष्वाकु तेलः**—कडू दुधाच्या बिया, मोरचूद, कलखापरी, गोरोचन, हळद, दारूहळद, डोरलीमूळ, गेळफळ, एरंडमूळ, इंद्रायण-मूळ, चित्रक, मोरवेल, हिराकस, हिंग, शेवग्याची साल, सुंठ, मिरीं, पिंपळी, देवदार, चिरफळ, वावडिंग, कळलावी, कुड्याची साल, कुटकी व पांढऱ्या शिरसा या सर्व औषधांचा कल्क करून त्याच्या चौपट तेल व तेलाचें चौपट गोमूत्र एकत्र करून तेल तयार करावें. हें अंगास चोळल्यानें कंडू, कुष्ठ आणि वातकफविकार नाश पावतात.

कनकक्षीरी शैला भार्ङ्गीदन्ती फलानि मूलञ्च ।
जातीफलानि प्रवालसर्षपलशुनविडंगं करंजत्वक् ॥ १०९ ॥
सप्तच्छदार्कपल्लवमूलत्वङ्गनिम्बचित्रकास्फोताः ।
गुंजैरण्डबृहतीमूलकसुरसार्जकफलानि ॥ ११० ॥
कुष्ठं पाठा मुस्तं तुम्बुरुमूर्वावचाः सषड्ग्रन्थाः ।
एडगजकुटजशिग्रुत्र्यूषणभल्लातकक्षवकाः ॥ १११ ॥
हरितालमवाक्पुष्पी तुत्थं कम्पिल्लकोमृतासङ्गः ।
सौराष्ट्री काशीसं दार्वी त्वक्सर्जिकालवणम् ॥ ११२ ॥
कल्कैरेतैस्तैलं करवीरकमूलपल्लवकषाये ।
सार्षपमथवातैलं गोमूत्रचतुर्गुणं साध्यम् ॥ ११३ ॥
स्थाप्यं कटुकालाबुनि सिद्धं तेनास्यमण्डलान्याशु ।
भिन्द्याद्भिषगभ्यङ्गात्कृमींश्च कण्डूञ्च विनिहन्यात् ॥ ११४ ॥

**कनकक्षीरी तैलः**—पिसोळा ( पिंवळा कांटेधोतरा ), शिलाजित, भारंगमूळ, जेपाळ, दंतीमूळ, जायफळ, जाईचीं कोंवळी पानें, शिरसा, लसूण, वावडिंग, करंजसाल, सातवीण, रुईचीं पानें, मुळें व साल, कडूनिंब,


CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चित्रक, काळी गोकर्णी, गुंज, एरंडमूळ, डोरलीमूळ, मुळा, तुळस, आजवला, गेळफळ, कोष्ठ, पहाडमूळ, नागरमोथा, चिरफळ, मोरवेल, वेखंड, पिंपळमूळ, किंवा मोठा करंज, टाकळ्याचें बीं, कुड्याची साल, सुंठ, मिरें, पिंपळी, भिलावे, नाकशिंकणी, हरताळ, मोहरी, मोरचूद, कपिला, कलखापरी, सोरटी माती, हिराकस, दारुहळद, दालचिनी व सज्जीखार यांचा कल्क आणि पांढऱ्या कण्हेरीच्या मुळ्या व पानांचा काढा एकत्र करून त्यांत त्याच्या चौपट शिरसेल किंवा तिळाचें तेल आणि तेलाच्या चौपट गोमूत्र सर्व एकत्र मिळवून तेल तयार झालें ह्मणजे तें कडू दुध्या पोखरून त्यांत भरून ठेवावें. या तेलाची अंगास मालिश केल्यानें कुष्ठाचीं चकदळें फार लवकर फुटतात आणि त्यांत किडे असल्यास ते मरून कंडू लगेच बंद होते.

कुष्ठन्तमालपत्रं मरिचं समनःशिलं सकासीसम् ।
तैलेन युक्तमुचितं सप्ताहं भाजने ताम्रे ॥ ११५ ॥
तेनालिप्तं सिध्मं सप्ताहाद्व्येति तिष्ठतो घर्मे ।
मासान्नवं किलासं स्नानं मुक्त्वा विशुद्धतनोः ॥ ११६ ॥

सिध्मलेप—कोष्ठ, तमालपत्र, काळीं मिरें, मनशीळ व हिराकस यांचें चूर्ण करून तें तेलांत कालवून तांब्याच्या भांड्यांत सात दिवसपर्यंत ठेवावें. नंतर शिब्यावर त्याचा लेप करून उन्हांत बसावें म्हणजे तें सात दिवसांतच नाहींसें होतें. नवें कोड एक महिन्यांत जातें. या औषधाचा उपयोग करीत असतां स्नान वर्ज्य करावें. स्नानावांचून इतर उपायांनीं शरीर शुद्ध ठेवावें.

सर्षपकरञ्जकोषातकीनान्तैलान्यथेङ्गुदीनाञ्च ।
कुष्ठेषु हितान्याहुस्तैलं यच्चापि खदिरस्य ॥ ११७ ॥

पांढऱ्या शिरसा, करंजाच्या बिया, कडू दोडकें, हिंगणबेटाचीं फळें व खैरसार या निरनिराळ्या औषधांनीं बनविलेलीं तेलेंही कुष्ठांवर चांगली चालतात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जीवन्ती मञ्जिष्ठा दार्वी कम्पिल्लकस्तथा तुत्थम् ।
एषघृततैलपाकाः सिद्धः सिद्धे च सर्जरसः ॥ ११८ ॥
क्षेप्यः समधूच्छिष्टो विपादिका नश्यति ह्यक्ता ।
चर्मैककुष्ठकिटिभंकुष्ठं शम्यत्यलसकञ्च ॥ ११९ ॥

**विपादिका कुष्ठावर तैलघृतः**—जीवंती, मंजिष्ठ, दारुहळद, कपिला व मोरचूत यांचा कल्क करून तो चौपट तूप–तेलांत मिळवून तें तूप–तेल सिद्ध करावें. कढून तयार झालें म्हणजे त्यांत राळ आणि मेण घालून तें सर्व मिश्रण एकजीव करावें. यापासून विपादिका ( हातपाय फाटणें वगैरे ) चर्मकुष्ठ, एककुष्ठ, किटिभ व अलसक हीं बरीं होतात.

किण्वं वराहरुधिरं पृथ्वीका सैंधवञ्च लेपःस्यात् ।
लेपो योज्यः कुस्तुम्बुरूणि कुष्ठञ्च मण्डलनुत् ॥ १२० ॥

**मंडलकुष्ठावर लेप**—१ सुराबीज, डुकराचें रक्त, काळें जिरें व सैंधव यांचा किंवा धने व कोष्ठ, यांचा लेप दिल्यानें मंडलकुष्ठ नाश पावतें.

पूतीकदारुजटिला पक्वसुरा क्षौद्रमुद्गपर्ण्यौ च ।
लेपः सकाकनासो मण्डलकुष्ठापहः सिद्धः ॥ १२१ ॥

**मंडलकुष्ठावर दुसरा लेप**—घाणेरा करंज, देवदार, जटामांसी, मद्य, मध, रानमूग व थोर पांढरी कावळी यांचा लेप मंडलकुष्ठावर रामबाण आहे.

चित्रकशोभांजनकौ गुडूच्यपामार्गदेवदारूणि ।
खदिरो धवश्च लेपः श्यामा दन्ती द्रवन्ती च ॥ १२२ ॥
लाक्षारसांजनैला पुनर्नवाचेति कुष्ठिनां लेपाः ।
दधिमण्डयुताः सर्वे देयाष्षण्मारुतकफघ्नाः ॥ १२३ ॥

**लेपषट्कः**—१ चित्रक व शेवग्याची साल; २ गुंळवेल, अघाडा व देवदार; ३ खैर, धावडा; ४ काळें निशोत्तर, दंतीमूळ व द्रवंती ५ लाख, रसांजन व वेलची आणि ६ पुनर्नवा हे अंक घालून दर्शविलेले सहा लेप दह्यांच्या निवळींतून लाविलें असतां वातकफजन्य कुष्ठाचा नाश करितात.

एडगजकुष्ठसैन्धवसौवीरकसर्षपैः कृमिघ्नैश्च ।
कृमिकुष्ठमण्डलाख्यं दद्रुकुष्ठञ्च शममुपैति ॥ १२४ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

एडगजादि लेप—टाकळ्याचें बीं, कोष्ठ, सैंधव, धान्याम्ल, शिरसा व वावडिंग यांच्या लेपानें कुष्ठांतील किडे, मंडलकुष्ठ, व दद्रुकुष्ठ ( गजकर्ण, नायटे, इसब वगैरे ) हीं नाहींशीं होतात.

एडगजः सर्जरसो मूलकबीजञ्च सिध्मकुष्ठानाम् ।
कांजिकयुक्तन्तु पृथङ्मतमिदमुद्वर्तनं लेपः ॥ १२५ ॥

सिध्मकुष्ठावर एडगजादि लेपः—टाकळ्याचें बीं, राळ व मुळ्याचें बीं यांपैकीं एकेक कांजींत कालवून उटणें लावल्यानें व लेप केल्यानें सिध्मकुष्ठें बरीं होतात.

वासा त्रिफला पाने स्नाने चोद्वर्तने प्रलेपे च ।
बृहती सेव्यपटोलाः सशारिवा रोहिणी चैव ॥ १२६ ॥
खदिरावघातककुभा रोहितककुटजधवनिम्बाः ।
सप्तच्छदकरवीराः शस्यन्ते स्नानपानेषु ॥ १२७ ॥

स्नानपानोपयोगी कल्पः—अडूळसा, त्रिफळा आणि डोरलीमूळ, वाळा, कडूपडळ, उपलसरी व कुटकी या औषधांचा स्नानाच्या व पिण्याच्या पाण्यांत, उटण्यांत, आणि लेप लावण्यांत उपयोग करावा. खैर, अर्जुनसादडा, रक्तरोहिडा, कुडयाची साल, धावडा, कडूनिंबाची साल; सातवीण व पांढऱ्या कण्हेरींचीं मुळें हीं स्नानाच्या व प्यावयाच्या पाण्यांत वापरावीं.

जववाप्यलोहकेशरपत्रप्लवचन्दनमृणलानि ।
भागोत्तराणि सिद्धं प्रलेपनं पित्तकफकुष्ठे ॥ १२८ ॥
यष्ट्याव्हलोध्रपद्मकपटोलपिचुमन्दचन्दनरसाश्च ।
स्नाने पाने च हिताः सुशीतलाः पित्तकुष्ठिभ्यः ॥ १२९ ॥
आलेपनं प्रियंगुर्हरेणुका वत्सकस्य च फलानि ।
सातिविषाच ससेव्या सचन्दना रोहिणी कटुका ॥ १३० ॥
तिक्तघृतैर्धौतघृतैरभ्यङ्गो दह्यमानकुष्ठेषु ।
तैलैश्चंदनमधुकप्रपौण्डरीकोत्पलयुतैश्च ॥ १३१ ॥

अभ्यंगः—वाळा, कोष्ठ, लोहाचा भुसा, नागकेसर, तमालपत्र, नागरमोथा, चंदन व कमळाचें देंठ हीं सर्व औषधें पहिलें एकभाग, दुसरें दोन भाग आणि तिसरें तीन भाग अशा वाढत्या प्रमाणांत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

घेऊन त्यांचा पित्तकफकुष्ठांवर लेप लावावा. ज्येष्ठीमध, लोध्र, पद्मकाष्ठ, कडूपडवळ, कडूलिंब व चंदन यांचा काढा थंड करून त्यानें पित्तकुष्ठ-रोग्यास स्नान घालावें व हाच काढा पाण्याच्या ऐवजीं प्यावयासही द्यावा. आणि गहुला, रेणुकबीज, इंद्रजव, अतिविष, वाळा, चंदन व कुटकी या सर्व औषधांचा लेप करावा. जळजळणाऱ्या कुष्ठावर तिक्त (कडू) गणांतील औषधांनीं तयार केलेल्या घृतांनीं (या नांवाची) किंवा शंभर अथवा हजार वेळां धुतलेल्या तुपांनीं किंवा चंदन, ज्येष्ठी-मध, पुंडरीक, काष्ठ व निळें कमळ यांनीं सिद्ध केलेल्या तेलाची मालिश करावी.

क्लेदे प्रपतति चाङ्गे दाहे विस्फोटके सचमर्दले।
शीताः प्रदेहसेका व्यधनाविरेकौ घृतन्तिक्तम् ॥ १३२ ॥
खदिरघृतं निम्बघृतं दार्वीघृतमुत्तमं पटोलघृतम्।
कुष्ठेषु रक्तपित्तप्रबलेषु भिषग्जितं सिद्धम् ॥ १३३ ॥
त्रिफलात्वचोऽर्धपालिकाः पटोलपत्रञ्च कार्षिकाः शेषाः।
कटुरोहिणी सनिम्बा यष्ट्याह्वा त्रायमाणा च ॥ १३४ ॥
एष कषायः साध्यो दत्वा द्विपलं मसूराणाम् ।
सलिलाढकेष्टभागे शेषे पूतो रसो ग्राह्यः ॥ १३५ ॥
ते च कषायाष्टपले चतुष्पलं सर्पिषश्च पक्तव्यम् ।
यावत्स्यादष्टपल शेषं पेयं ततः कोष्णम् ॥ १३६ ॥
तद्धतपित्तकुष्ठं वीसर्पं वातशोणितप्रबलम् ।
ज्वरदाहगुल्मविद्रधिविभ्रमविस्फोटकाह्णन्ति ॥ १३७ ॥

कुष्ट फार वाहून चिघळत असेल व अंगाचा दाह होत असेल, अशा विस्फोटक व चर्मदल कुष्ठांत लेप व शिडकाव करणें, शिरा तोडून रक्त काढणें, विरेचन, तिक्तघृत, खदिरघृत, निम्बघृत, दार्वीघृत व पटोलघृत यांचा उपयोग करावा. ज्यांत रक्तपित्त प्रबल आहे अशा कुष्ठांतही उक्त घृतें उत्तम गुणकारी आहेत. हिरडेदळ; वेहडेदळ, आंवळ-कठी व कडूपडवळ प्रत्येकीं २-२ तोळे, कुटकी, कडूनिंब, ज्येष्ठीमध व त्रायमाण प्रत्येकीं १-१ तोळा आणि मसुरा ८ तोळे याप्रमाणें या सर्व औषधांचा ४८० तोळे पाण्यांत काढा करावा. अष्टमांश उरला म्हणजे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

उतरून गाळून घ्यावा. यांतून ३२ तोळे काढा घेऊन त्यांत १६ तोळे तूप मिळवून तें मिश्रण ३२ तोळे राहीपर्यंत कढवावे. तयार झालें म्हणजे उतरून कोमट असतां घ्यावें. यापासून वातपित्तकुष्ठ, विसर्प, जबरदस्त वातरक्त, ज्वर, दाह, गुल्म, विद्रधि, भ्रम व विस्फोटक हे रोग नाहींसे होतात.

निम्बपटोलं दार्वीं दुरालभां तिक्तरोहिणीं त्रिफलाम् ।
कुर्यादर्धपलांशं पर्पटकं त्रायमाणाञ्च ॥ १३८ ॥
सलिलाढकसिद्धानां रसेऽष्टभागे स्थिते क्षिपेत्पूते ।
चन्दनकिराततिक्तकमागधिकात्रायमाणांच ॥ १३९ ॥
मुस्तं वत्सकबीजं कल्कीकृत्यार्धकार्षिकान्भागान् ।
नवसर्पिषश्च षटपलमेतत्सिद्धं घृतं पेयम् ॥ १४० ॥
कुष्ठज्वरगुल्मार्शो ग्रहणीपाण्डूवामयश्वयंथुहारि ।
वीसर्पपिडकपामाकण्डूमदगण्डनुत्तिक्तम् ॥ १४१ ॥

तिक्तषट्पलघृतः—कडूनिंबाची साल, कडूपडवळ, दारुहळद, धमासा, कुटकी, त्रिफळा, पित्तपापडा व त्रायमण हीं सर्व औषधें प्रत्येकीं दोन दोन तोळे घेऊन तीं चार शेर पाण्यांत उकळावीं. अष्टमांश काढा राहिला म्हणजे उतरून गाळून घ्यावा आणि त्यांत चंदन, कडूकिराईत पिंपळी, त्रायमाण, नागरमोथा व इंद्रजव यांचा प्रत्येकीं अर्धा अर्धा तोळा कल्क मिळवावा. शेवटीं त्यांत २४ तोळे ताजें तूप मिळवून तें तयार करावें. हें तिक्तघृत पोटांत सेवन केल्यानें कुष्ठ, ज्वर, गुल्म, मूळव्याध, संग्रहणी, पांडुरोग, सूज, विसर्प, फोड, खरूज, खाज, उन्माद व गळवें वगैरे रोग नाहींसे होतात.

सप्तच्छदं प्रतिविषां शम्याकं तिक्तरोहिणीं पाठाम् ।
मुस्तमुशीरं त्रिफलां पटोलपिचुमर्दपर्पटकम् ॥ १४२ ॥
धन्वयवासं चन्दनमुपकुल्यां पद्मकं रजन्यौ च ।
षड्ग्रन्थां सविशालां शतावरीं शारिवे चोभे ॥ १४३ ॥
वत्सकबीजं वासां मूर्वाममृतं किराततिक्तञ्च ।
कल्कान्कुर्यान्मतिमान्यष्ट्याह्वां त्रायमाणाञ्च ॥ १४४ ॥
कल्कस्य चतुर्भागे जलमष्टगुणं रसोऽमृतफलानां ।
द्विगुणो घृतात्प्रदेयस्तत्सर्पिः पाययेसिद्धम् ॥ १४५ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कुष्ठानि रक्तपित्तप्रबलान्यर्शांसि रक्तवाहीनि ।
विसर्पमम्लपित्तं वातासृक्पांडुरोगञ्च ॥ १४६ ॥
विस्फोटकान्सपामाउन्मादं कामलां ज्वरं कण्डूम ।
हृद्रोगं गुल्मपिडका असृग्दरं गण्डमालाञ्च ॥ १४७ ॥
हन्यादेतत्सर्पिः पीतं काले यथाबलं सद्यः ।
योगशतैरप्यजितान्महाविकारान्महातिक्तम् ॥ १४८ ॥

**महातिक्तघृतः**—सातविणीची साल, अतिविष, बाहवा, कुटकी, पहाडमूळ, नागरमोथा, वाळा, त्रिफळा, कडूपडवळ, कडूनिंब, पित्तपापडा, धमासा, चंदन, पिंपळी, पद्मकाष्ठ, हळद, दारुहळद, वेखंड, कडू इंद्रायणमूळ, शतावरी, काळी व पांढरी उपळसरी, अडूळसा, मोरवेल, गुळवेल, कडूकिराईत, ज्येष्ठमध व त्रायमाण या सर्वांचा कल्क करून तो त्याच्या चौपट तूप, तुपाच्या आठपट पाणी आणि दुप्पट आंवळ्याचा रस यांत मिळवून तें तूप सिद्ध करून प्यावें. हें महातिक्तघृत योग्यकाळीं शक्त्यनुरूप सेवन केलें असतां रक्तपित्तप्रधानकुष्ठें, रक्ती मूळव्याध, विसर्प, अम्लपित्त, वातरक्त, पांडुरोग, विस्फोटक, खरूज, उन्माद, कावीळ, ताप, कण्डू, हृद्रोग, गुल्म, फोड, रक्तप्रदर, गण्डमाला आदि शेंकडों औषधांस न जुमानलेले मोठमोठे रोग बरे करितें.

दोषे हृतेऽपनीते रक्ते बाह्यन्तरे कृते शमने ।
स्नेहे च कालयुक्ते न कुष्ठमनुवर्तते साध्यम् ॥ १४९ ॥
खदिरस्य तुलाः पञ्च शिंशपासनयोस्तुले ।
तुलार्धाः सर्व एवैते करञ्जारिष्टवेतसाः ॥ १५० ॥
पर्पटः कुटजश्चैव वृषः कृमिहरस्तथा ।
हारिद्रो कृतमालश्च गुडुची त्रिफला त्रिवृत् ॥ १५१ ॥
सप्तपर्णश्च सक्षुण्णो दशद्रोणेषु वारिणः ।
धात्रीरसञ्च तुल्यांशं सर्पिषश्चाढकं पचेत् ॥ ५२ ॥
अष्टभागावशेषन्तु कषायमवतारयेत् ।
महातिक्तककल्कैस्तु यथोक्तैः पलसम्मितैः ॥ १५३ ॥
निहन्ति सर्वं कुष्ठांनि पानाभ्यंगनिषेवणात् ।
महाखदिरमित्येतत्परं कुष्ठविकारनुत् ॥ १५४ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

**महाखदिरघृत:**—वमनविरेचनादिकांच्या द्वारा वातादि दोष काढून टाकले, आणि शिरा चिरून किंवा तुंबडी वगैरे लावून दूषित रक्त काढून टाकलें, आंतून बाहेरून संशमन चिकित्सा केली आणि योग्यकाळीं स्नेहन केलें अर्थात् कुष्ठनाशक घृत व तेल वगैरेंचा उपयोग केला असतां साध्य कुष्ठ पिच्छा करीत नाहीं. ह्मणजे आरंभींच वेळेवर उक्त प्रकारचे सर्व उपचार केल्यानें साध्य असलेलीं कुष्ठें लवकर बरीं होतात. खैरसाल २००० तोळे, शिसवाची व असाण्याची साल प्रत्येकीं चार चारशें तोळे आणि करंज, कडूलिंब व वेत यांची साल, पित्तपापडा, कुड्याची साल, अडूळसा, वावडिंग, कळंबाची साल, बाहवा, गुळवेल, त्रिफळा, निशोत्तर व सातविणीची साल हीं प्रत्येकीं दोनदोनशे तोळे याप्रमाणें हीं सर्व औषधें घेऊन कुटून १६० शेर पाण्यांत उकळावीं. अष्टमांश काढा राहिला ह्मणजे उतरून गाळून घेऊन त्यांत तितकाच आंवळ्यांचा रस ( अथवा काढा ), चार शेर तूप व वर सांगितलेल्या महातिक्तघृतांतील सर्व औषधांचा प्रत्येकीं ४।४ तोळे कल्क मिळवून तें तूप सिद्ध करावें. यास महाखादिर घृत ह्मणतात. हें पोटांत घेतल्यानें व अंगास चोळल्यानें सर्व प्रकारचीं कुष्ठें नाहींशीं होतात. हें कुष्ठांवर रामबाण औषध आहे.

> प्रपतत्सु लसीकाप्रस्रुतेषु गात्रेषु जन्तुजग्धेषु ।
> मूत्रं निम्बविडङ्गे स्नानं पानं प्रदेहश्च ॥ १५५ ॥
> वृषकुटजसप्तपर्णाः करवीरकरंजनिम्बखदिराश्च ।
> स्नाने पाने लेपे क्रिमिकुष्ठनुदः सगोमूत्राः ॥ १५६ ॥
> पानाहारविधाने प्रसेचने धूपने प्रदेहे च ।
> क्रिमिनाशनं विडङ्गं विशिष्यते कुष्ठहृत्खादिरः ॥ १५७ ॥

**क्रिमिकुष्ठनाशक प्रयोग**—कुष्ठांतून अतिशय लस वाहत असून, त्यांत किडे पडून ते अंग खात असल्यास गोमूत्र, कडूनिंबाची साल व वावडिंग यांच्या काढ्यानें स्नान करावें; यांचाच काढा प्यावयास द्यावा; हींच औषधें वांटून यांचा कुष्ठावर लेप लावावा. तसेंच अडूळसा, कुड्याचें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

साल, कण्हेरीची मुळी, घाणेऱ्या करंजाची साल, कडूलिंबाची साल या औषधांचा गोमूत्रांसह स्नानांत, पिण्यांत व लेपाच्या कामीं उपयोग करावा. किंवा खाणें, पिणें, धुणें, धुरी, लेप वगैरे सर्व कामांत वावडिंगाचा उपयोग करावा ह्मणजे यापासून किडे मरतात. खैर हा कुष्ठनाशक द्रव्यांत श्रेष्ठ आहे.

एडगजः सविडंगो मूलान्यारग्वधस्य कुष्ठानाम् ।
उद्दालनं श्वदन्ता गोश्वचराहोष्ट्रदन्ताश्च ॥ १५८ ॥
एडगजः सविडंगो रजनीद्वयराजवृक्षमूलञ्च ।
कुष्ठोद्दालनमग्र्यं सपिप्पलीपाकलं योज्यम् ॥ १५९ ॥

टाकळ्याचें बीं, वावडिंग, बाहव्याचें मूळ, कोष्ठ, कुत्र्याचा दांत व उंटाचा दांत यांचा चुरा करून कुष्ठावर लेप द्यावा. किंवा टाकळ्याचें बीं, वावडिंग, हळद, दारुहळद, बाहव्याचें मूळ, पिंपळी व कोष्ठ यांचा लेप कुष्ठावर उत्तम आहे.

श्वित्राणां प्रशमार्थं प्रयोक्तव्यं सर्वतो विशुद्धानाम् ।
श्वित्रे स्रंसनमग्र्यं मलपूरस इष्यते सगुडः ॥१६० ॥
तं पीत्वा सुस्निग्धो यथाबलं सूर्यपादसन्तापम् ।
सेवेत विरिक्तश्च त्र्यहं पिपासुः पिबेत्पेयाम् ॥ १६१ ॥
श्वित्रेऽगे ये स्फोटा जायन्ते कण्टकेनतान्भिन्द्यात् ।
स्फोटेषु विस्रुतेषु प्रातः प्रातः पिबेत्पक्रम् ॥ १६२ ॥
मलयूलसनाप्रियंगु शतपुष्पां चाम्भसा समुत्क्वाथ्य ।
पालाशं वा क्षारं यथाबलं फाणितोपेतम् ॥ १६३ ॥
यच्चान्यत्कुष्ठघ्नं श्वित्राणां सर्वमेव तच्छस्तम् ।
खदिरोदकसंयुक्तं खदिरोदकपानमग्र्यम् ॥१६४ ॥
सुमनःशिलं विडंगं कासीसं रोचनां कनकपुष्पीम् ।
श्वित्राणां प्रशमार्थं ससैन्धवं लेपनं दद्यात् ॥ १६५ ॥
कदलीक्षारयुतं वा खदिरास्थिदग्धं गवां सलिलमुक्तम् ।
हस्तिमदाध्युषितं वा मालत्याः क्षारकक्षारम् ॥ १६६ ॥

श्वेतकुष्ठचिकित्साः—पांढऱ्या कोडाच्या रोग्यास प्रथम विरेचन देऊन त्याचें उत्तम प्रकारें शोधन करावें. विरेचनाकरितां तिधारी निवडुं-

 CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गासह बांवच्यांचा काढा द्यावा. हा काढा पिऊन अंगास कुष्ठनाशक तेल किंवा तुपाची मालिश करून सोसेल इतका वेळ उन्हांत बसावें. जुलाब झाल्यानंतर तीन दिवसपर्यंत तहान लागली असतां पाणी न पितां पेज पिऊन रहावें. पांढऱ्या कोडाच्या जागेवर ज्या पुळ्यां उत्पन्न होतात त्या काट्यांनें फोडून आंतील लस वगैरे वाहूं द्यावी. नंतर तीन दिवसपर्यंत दररोज सकाळीं बांवच्या ( किंवा काळा उंबर ), असाणा, गहुला व बडीशोप यांचा काढा घ्यावा. किंवा आपल्या शक्त्यनुरूप पळसाचा क्षार काकवींतून घ्यावा. शिवाय जे जे इतर कुष्ठनाशक प्रयोग सांगितले आहेत त्यांचाही पांढऱ्या कोडावर उपयोग करावा. खैरसाराचा काढा स्वतंत्रपणें किंवा दुसऱ्या पेय पदार्थांत मिळवून प्यावा. खैरसाल श्वित्ररोगावर उत्तम औषधि आहे. मनशीळ, वावडिंग, हिराकस, गोरोचन, कण्हेरीची मुळी, सैंधव यांचा लेप दिल्यानें पांढरें कुष्ट नाहींसें होतें. किंवा केळीचा क्षार अथवा खैराचा सार याचा गोमूत्रांतून लेप लावावा किंवा जाईच्या क्षाराचा हत्तीच्या मदांतून लेप करावा.

नीलोत्पलं सकुष्ठं ससैन्धवं हस्तिमूत्रपिष्टं वा ।
मूलकबीजावल्गुजलेपः पिष्टो गवां मूत्रे ॥ १६७ ॥
काकोदुम्बरिकावासा वल्गुजचित्रकौ गवां मूत्रे ।
पिष्टा मनःशिला वा संयुक्ता बर्हिपित्तेन ॥ १६८ ॥

---

१ पांढरें कोड उठण्यापूर्वी कधीं कधीं त्या जागीं मसुरांएवढया बारीक पुळ्या येतात त्यांस अतिशय खाज सुटते व कधीं कधीं त्यांतून रक्त वाहतें. पुढें या पुळ्या फुटून त्या जागीं कोड उठतें असें पाहण्यांत येतें.

२ या ठिकाणी मुळांत ' गवांरुधिरम् ' म्हणजे गोरक्त असा पाठ आहे. कांहीं जणांचें असें मत आहे कीं गोरुधिर म्हणजे गोरोचन असा अर्थ करावा. परंतु गोरोचनाला गोरुधिर असा पर्याय दिलेला कोठें आढळण्यांत आला नाहीं गोरुधिर घ्यावें तर तें रक्तपित्त उत्पन्न करणारें असल्यामुळें कुष्ठांत त्याचा उपयोग असंगत दिसतो म्हणून आम्ही ' गवां रुधिरम् ' हा पाठ ' गवां सलिलम् ' असा बदलून त्याचा गोमूत्र असा अर्थ केला आहे. गोमूत्राचा प्रयोग कुष्ठांत जागोजागीं सांगितला आहे. शिवाय याच प्रकरणांत पुढें हत्तीच्या मुताचाही प्रयोग सांगितला आहे. म्हणून आम्ही धरलेला पाठ युक्तियुक्त दिसतो.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

किलासहन्ता मूलान्यवल्गुजानि लाक्षा च ।
गोपित्तमञ्जने द्वे पिपल्यः काललोहरजः ॥ १६९ ॥

**श्वेतकुष्टावर लेपः**—निळें कमळ, कोष्ठ, सैंधव यांचें चूर्ण हत्तीच्या मुतांत कालवून त्याचा लेप द्यावा. किंवा मुळ्याचें बीं व बांवच्याचें बीं यांचा मूत्रांतून लेप द्यावा. काळ्या उंबराची साल, अडूळसा, बांवच्याचें बीं व चित्रक यांचा गोमूत्रांतून लेप द्यावा किंवा मनशीळ व मोराचें पित्त गोमूत्रांतून द्यावें. बांवचीचीं मुळें, लाख, गोरोचन, स्रोतोंजन, रसाञ्जन, पिंपळी व कांतलोहाचा भुसा या सर्वांचें चूर्ण करून ( गोमूत्रांतून ) लेप दिला असतां श्वेतकुष्ठ नाहींसें होतें.

शुद्ध्या शोणितमोक्षैर्विरूक्षणै भक्षणैश्च सक्तुनाम् ।
श्वित्रं कस्यचिदेव प्रशाम्यति क्षीणपापस्य ॥ १७० ॥

संशोधन, रक्त काढणें, विरूक्षण व सत्तू खाणें या उपायांनीं, ज्याच्या पापाचा क्षय झाला आहे अशा एखाद्याच भाग्यशाली मनुष्याचें श्वेतकुष्ठ बरें होतें.

दारुणं चारुणं श्वित्रं किलासं नामभिस्त्रिभिः ।
विज्ञेय त्रिविधं तच्च त्रिदोषं प्रायशश्चतत् ॥ १७१ ॥
दोषे रक्ताश्रिते रक्तं ताम्रं मांससमाश्रिते ।
भेदः श्वेत श्रितं श्वित्रं गुरुतश्चोत्तरोत्तरम् ॥ १७२ ॥
यत्परस्परतोऽभिन्नं बहु यद्रक्तलोमवत् ।
यच्चवर्षगणोत्पन्नं तच्छ्वित्रं नैव सिध्यति ॥ १७३ ॥

दारुण, अरुण व किलास अशीं श्वेतकुष्ठाचीं तीन नांवें आहेत. हें बहुशः त्रिदोषजन्य असतें. याचे तीन प्रकार आहेत. रक्ताश्रित दोषांपासून तें उत्पन्न झालें असतां त्याचा रंग तांबडा असतो. मांसाश्रित दोषांपासून झालें असतां तें तांब्यासारखें तांबूस असतें. आणि मेदोधात्वाश्रित दोषांपासून झालें असतां पांढरें असतें. हें उत्तरोत्तर दुसाध्य आहे, म्हणजे रक्ताश्रित दोषांपासून झालेल्या वातप्रधान कोडापेक्षां, मांसाश्रित दोषांपासून झालेलें पित्तप्रधान कोड अधिक दुसाध्य आणि त्याच्याहीपेक्षां मेदधात्वाश्रित दोषापासून झालेलें कफप्रधान कोड अधिक दुश्चिकित्स्य असें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

समजावें. जें पांढरे कोड एकाशीं एक लागलेलें, दाट, तांबड्या रोमांनीं युक्त, व एक वर्षापेक्षां जुने असेल तें असाध्य समजावें.

वचाँस्यतथ्यानि कृतघ्नभावो निन्दा सुराणां गुरुधर्षणञ्च।
पापक्रिया पूर्वकृतञ्चकर्म हेतुः किलासस्य विरोधि चान्नम् ॥१७४

खोटें बोलणें, कृतघ्नपणा, देवाची निंदा, वडील माणसांचा अपमान, पापकर्म, पूर्वजन्मार्जित कर्म व परस्परविरुद्धधर्मी अन्न एकत्र मिळवून खाणें इतक्या कारणांनीं पांढरें कोड उत्पन्न होतें.

हेतुर्द्रव्यं लिंगं समासतो दोषनिर्देशात्।
साध्यासाध्यं कृच्छ्रं कुष्ठापहाश्च ये योगाः ॥ १७५ ॥
सिद्धाः किलासहेतुर्लिंगं गुरुलाघवं शान्तिः।
इति संग्रहः प्रणीतो महर्षिणा कुष्ठनाशनऽध्याये।
स्मृतिबुद्धिवर्धनार्थं शिष्याय हुताशवेशाय ॥ १७६ ॥

कुष्ठांचीं कारणें, सामान्य लक्षणें व दोषपरत्वें निरनिराळीं लक्षणें, साध्याध्यविचार, कुष्ठनाशक सिद्ध प्रयोग पांढऱ्या कोडांचीं कारणें, लक्षणें, गौरवलाघव व चिकित्सा इतके विषय या कुष्ठचिकित्साध्यायांत महर्षि आत्रेयांनीं आपला शिष्य अग्निवेश यास त्याची स्मृति व बुद्धि वाढावी एतदर्थ निरूपण करून सांगितले.

सप्तमोऽध्यायः समाप्त.

---

## अथाष्टमोऽध्यायः

अथातो राजयक्ष्मचिकिस्थितं व्याख्यास्यामः।
इति ह स्माह भगवानात्रेयः ॥ १ ॥

आतां आपण राजयक्ष्माचिकित्सा निरूपण करूं. आत्रेय ऋषि असेंच सांगते झाले.

दिवौकसां कथयतामृषिभिर्वै श्रुता कथा।
कामव्यसनसंयुक्ता पौराणिशशिनम्प्रति ॥ २ ॥
रोहिण्यामतिसक्तस्य शरीरं नानुरक्षतः।
आजगामाल्पतामिन्दोर्देहः स्नेहपरिक्षयात् ॥ ३ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दुहितॄणामसम्भोगाच्छेषाणाञ्च प्रजापतेः।
क्रोधो निःश्वासरूपेण मूर्तिमान्निःसृतो मुखात् ॥ ४॥
प्रजापतेर्हि दुहितुरष्टाविंशतिमंशुभान्।
भार्यार्थे प्रतिजग्राह न च सर्वास्ववर्तत ॥ ५॥
गुरुणा तमवध्यातं भार्यास्वसमवर्तिनम्।
रजोऽन्धमबलं दीनं यक्ष्मा शशिनमाविशत् ॥ ६ ॥
सोऽभिभूतोऽतिगुरुणा गुरुक्रोधेन निष्प्रभ।
देवदेवर्षिसहितो जगाम शरणं गुरुम् ॥ ७॥
अथ चन्द्रमसः शुद्धां मतिं बुद्धा प्रजापतिः।
प्रसादं कृतवान्सोमस्ततोऽश्विभ्यां चिकित्सितः ॥ ८ ॥
स विमुक्तग्रहश्चन्द्रो विरराज विशेषतः।
तेजसा वर्धितोऽश्विभ्यां शुद्धं सत्त्वमवाप च ॥ ९ ॥

क्षयरोगाच्या मूळ उत्पत्तीसंबंधीं पुढील कथा प्राचीनकाळीं ऋषींनीं देवाकडून ऐकिली होती. एके काळीं चंद्र रोहिणीच्या ठायीं इतका अत्यंत कामासक्त झाला कीं, आपल्या आरोग्याकडे मुळींच लक्ष्य न देतां कामेच्छा यथेष्ट पूर्ण करूं लागला. त्या योगानें त्याच्या शरीरांतील जो स्निग्धपणा, जें ओज, तें क्षीण होऊन त्याचें शरीर कृश झालें. एकीकडे हीं दशा होऊन त्याचाच परिणाम दुसरीकडे असा झाला कीं, चंद्र रोहीणीचे ठायीं अति असक्त असल्यामुळें त्याच्या दुसऱ्या बायका दक्षाच्याच मुली होत्या, त्यांना संभोगसुख मिळेनासें झालें. त्यांच्या बापास अत्यंत क्रोध येऊन तो त्याच्या श्वासाबरोबर मूर्तिमंत बाहेर पडला. चंद्रानें दक्षप्रजापतीच्या अठ्ठावीस मुलींशीं लग्न केलें होतें. परंतु त्या सर्वांशीं तो सारखा वागेना. ही गोष्ट दक्षास समजून त्यानें उत्पन्न केलेला मूर्तिमंत क्रोधरूपी रोग त्याच्या आज्ञेनें त्या कामांध निःशक्त व दीन झालेल्या चंद्राच्या शरीरांत प्रवेश करिता झाला. सासऱ्याच्या या प्रचंड रोगानें चंद्र एकदम निस्तेज पडला. त्या प्रसंगीं देव व देवर्षि यांस बरोबर घेऊन चंद्र सासऱ्यास शरण गेला, दक्ष जावयाची शुद्ध बुद्धि पाहून प्रसन्न झाला आणि त्यानें अश्विनीकुमारांस त्याची चिकित्सा करावयास सांगितली. त्यांनीं उत्तम चिकित्सा करून चंद्रास रोगमुक्त केलें; इतकेंच नव्हे तर त्याचें तेज व शोभा हींही अधिक वाढवून त्यास सत्वगुणी केला.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

क्रोधो यक्ष्मा ज्वरो रोग एकोऽर्थो दुःखसंज्ञितः।
यस्मात्सराज्ञः प्रागासीद्राजयक्ष्मा ततोमतः॥१०॥
स यक्ष्मा हुंकृतोऽश्विभ्यां मानुषं लोकमागतः।
लब्ध्वा चतुर्विधं हेतुं समाविशति मानवान्॥ ११॥
अयथाबलमारम्भं वेगसन्धारणं क्षयम्।
यक्ष्माणः कारणं विद्याच्चतुर्थं विषमाशनम्॥ १२॥

क्रोध, यक्ष्मा, ज्वर, रोग, दुःख हे सर्व एकाच अर्थाचे वाचक शब्द आहेत. हा रोग प्रथम नक्षत्रांचा व ब्राह्मणांचा राजा ( ' सोमोऽस्माकं ब्राह्मणानां राजा ' जो चंद्र त्यास झाला असल्यामुळें यास राजयक्ष्मा असें नांव पडलें आहे. हा क्षयरोग अश्विनी कुमारांच्या हुंकारानें ह्मणजे घुरकण्यानें देवलोकांतून मनुष्यलोकांत आला आहे. हा चार प्रकारच्या कारणांनीं मनुष्यास होतो. तीं चार प्रकारचीं कारणें येणेंप्रमाणें--१ आपल्या शक्तीच्या बाहेरचीं शारीरिक किंवा मानसिक कामें करणें, २ मल-मूत्र अधोवायु इत्यादिक थांबविणे, ३ शरीरांतील धातु क्षीण होणें आणि ४ अकाळीं कमी किंवा जास्त खाणें अथवा अन्य भाषेंत सांगितलेल्या विधीच्या विरुद्ध भोजन करणें.

युद्धाध्ययनभाराध्वलंघनप्लवनादिभिः।
पतनैरभिघातैर्वा साहसैर्वा तथाऽपरैः॥ १३॥
अयथाबलमारम्भैर्जन्तोरुरसि विक्षते।
वायुः प्रकुपितो दोषावुदीर्योभौ विधावति॥ १४॥
स शिरस्थः शिरःशूलं करोति गलमाश्रितः।
कण्ठोध्वंसञ्च कासञ्च स्वरभेदमरोचकम्॥ १५॥
पार्श्वशूलञ्च पार्श्वस्थो वर्चोभेदं गुदे स्थितः।
जृम्भां ज्वरञ्च सन्धिस्थ उरस्थश्चोरजोरुजम्॥ १६॥
क्षणनाच्चोरसो रक्तं कासमानः कफानुगम्।
जर्जरेणोरसा कृच्छ्रमुरःशूली निरस्यति॥ १७॥
इति साहसिको यक्ष्मा रूपैरेतैःप्रपद्यते।
एकादशभिरात्मज्ञो भजेत्तस्मान्न साहसम्॥ १८॥

युद्ध, अध्ययन, फार मोठा बोजा वाहणें, अतिशय रस्ता चालणें, अति उपास, अति पोहणें, पडणें, जखम लागणें किंवा याशिवाय दुसरीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आपल्या अवसानाबाहेर श्रमाचीं कामें केल्यानें छातींत क्षत पडून वायु प्रकुपित होऊन तो पित्त व कफ यांस वाढवून शरीरांत सर्वत्र मोठ्या जोरानें संचार करितो. तो मस्तकांत असला ह्मणजे डोकें दुखतें; गळ्यांत असला ह्मणजे घसा पडतो, खोकला येतो, आवाज घोगरा होतो व तोंडाची रुचि नाहींशी होते; दोष कुशींत असला ह्मणजे बरगड्या दुखतात, गुदद्वारीं असला ह्मणजे जांभया येतात, ताप येतो, आणि छातींत असला ह्मणजे त्यापासून खोकला आला असतां कफाबरोबर मागून रक्त पडतें आणि छाती जर्जर झालेली असली ह्मणजे छातींत दुखतें व बोलावयास फार कष्ट पडतात. साहसाचीं कामें केल्यापासून उत्पन्न होणाऱ्या क्षयांत वरील अकरा लक्षणें होतात. यांजकडे लक्ष्य देऊन बुद्धिमान् मनुष्यानें कधीं साहस करूं नये.

ह्रीमत्वाद्वा घृणित्वाद्वा भयाद्वा वेगमागतम् ।
वातमूत्रपुरीषाणां निगृह्णाति यदा नरः ॥ १९ ॥

तदा वेगप्रतीघातात्कफपित्ते समीरयन् ।
ऊर्ध्वं तिर्यगधः कुर्याद्विकारान्कुपितोऽनिलः ॥ २० ॥

प्रतिश्यायश्च कासश्च स्वरभेदमरोचकम् ।
पार्श्वशूलं शिरःशूलं ज्वरमंसावमर्दनम् ॥ २१ ॥

अङ्गमर्दं मुहुश्छर्दिर्वर्चोभेदं त्रिलक्षणम् ।
रूपाण्येकादशैतानि यक्ष्मा यैरुच्यते महान् ॥ २२ ॥

लाजेनें, कंटाळा आल्यामुळें किंवा; भयामुळें अधोवायु—मल व मूत्र यांचे आलेले वेग थांबविल्यानें, ते परत उलटून वायूस प्रकुपित करितात. तो कुपित झालेला वायु कफ व पित्त यांस उदीर्ण करून वर, तिरपा व खालीं अनेक प्रकारानें यथेच्छ संचार करून पुढील विकार उत्पन्न करितो. पडसें, खोकला, आवाज बसणें, अरुचि, बरगड्यांत दुखणें, मस्तकशूळ, ताप, खांदे दुखणें, अंग मोडणें, वरचेवर ओकारी आणि मलभेद हीं अकरा लक्षणें वेगसंधारणजन्य क्षयांत होतात. या लक्षणांमुळेंच क्षयास एक मोठा रोग असें मानलें आहे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हर्षोत्कण्ठाभयत्रासक्रोधशोकातिकर्षणात् ।
व्यवायानशनाभ्याञ्च शुक्रमोजश्च हीयते ॥ २३ ॥
ततःस्नेहक्षयाद्वायुर्वृद्धो दोषानुदीरयन् ।
प्रतिश्यायं ज्वरं कासमङ्गमर्दं शिरोरुजम् ॥ २४ ॥
श्वासं विड्भेदमरुचिं पार्श्वशूलं स्वरक्षयम् ।
करोति चांससन्तापमेकादशमिहांगहृत् ॥ २५ ॥
लिंगान्यावेदयन्त्येतान्येकादश महागदम् ।
सम्प्राप्तं राजयक्ष्माणं क्षयात्प्राणक्षयप्रदम् ॥ २६ ॥

हर्ष, उत्कण्ठा, भीति, त्रास, राग, शोक यांच्या योगानें अत्यंत खचला गेल्यानें किंवा अति स्त्रीसंग अथवा अति उपासाच्या योगानें वीर्य व ओज या धातूंचा क्षय होतो. हे धातु क्षीण झाले ह्मणजे अर्थात्च शरीरांतील स्निग्धपणाही कमी झाला. स्निग्धपणा गेला कीं वायु सहजच वाढतो आणि पित्त व कफ यांस वाढवून पडसें, ताप, खोकला, अंग वळणें मस्तकशूल, दमा, मलभेद, अरुचि, बरगड्या दुखणें, आवाज बसणें व खांदे दुखणें हे अकरा विकार उत्पन्न करितो. हीं अकरा लक्षणें धातुक्षयापासून उत्पन्न झालेल्या राजयक्ष्म्यांत होतात. हा प्राणनाश करणारा आहे.

विविधान्यन्नपानानि वैषम्येण समश्नतः ।
जनयन्त्यामयान्घोरान्विषमान्मारुतादयः ॥ २७ ॥
स्रोतांसि रुधिरादीनां वैषम्याद्विषमं गताः ।
रुद्धा रोगाय कल्पन्ते पुष्यन्ति न च धातवः ॥ २८ ॥
प्रतिश्यायं प्रसेकञ्च कासं छर्दिररोचकम् ।
ज्वरमंसाभितापञ्च छर्दनं रुधिरस्य च ॥ २९ ॥
पार्श्वशूलं शिरःशूलं स्वरभेदमथापि वा ।
कफपित्तानिलकृतं लिंगं विद्याद्यथाक्रमम् ॥ ३० ॥
इति व्याधिसमूहस्य रोगराजस्य हेतुजम् ।
रूपमेकादशविधं हेतुश्चोक्तश्चतुर्विधः ॥ ३१ ॥

नानाप्रकारचीं खाद्यपेयें विषम रीतीनें सेवन केल्यानें वातादि दोष कुपित होऊन ते रक्तादि धातु वाहून नेणाऱ्या नळांचे मार्ग बंद करून नानाप्रकारचे भयंकर रोग उत्पन्न करितात. स्रोतोमार्ग बंद झाल्यानें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रक्तादि धातूंस पोषणही मिळेनासें होतें. पडसें, लाळ वगैरे वाहणें, खोकला, उलटी व अरुचि हे विकार कफदोषांच्या प्रकोपानें होतात. ताप, खांदे दुखणें व रक्ताची उलटी हे पित्तप्रकोपानें होतात. आणि बरगड्या दुखणें, डोकें दुखणें व आवाज फाटणें हे विकार वाताच्या प्रकोपापासून होतात. याप्रमाणें अनेक प्रकारच्या रोगांनीं घेरलेला असा जो रोगमहाराज क्षय त्याचीं अकरा प्रकारचीं लक्षणें व चार प्रकारचीं कारणें सांगितलीं.

पूर्वरूपं प्रतिश्यायो दौर्बल्यं दोषदर्शनं।
अदोषेष्वपि भावेषु काये बीभत्सदर्शनम् ॥ ३२ ॥
घृणित्वमश्नतश्चापि बलमांसपरिक्षयः ।
स्त्रीमद्यमांसप्रियता प्रियता चावगुण्ठने ॥ ३३ ॥
मक्षिकाघुणकेशानां तृणानां पतनानि च ।
प्रायोऽन्नपाने केशानां नखानां चाभिवर्धनम् ॥ ३४ ॥
पतत्त्रिभिः पतंगैश्च श्वापदैश्चाभिधर्षणम् ।
स्वप्ने केशास्थिराशीनां भस्मनश्चाधिरोहणम् ॥ ३५ ॥
जलाशयानां शैलानां वनानां ज्योतिषामपि ।
शुष्यतां क्षीयमाणानां पततां यच्च दर्शनम् ॥ ३६ ॥
प्राग्रूपं बहुरूपस्य तज्ज्ञेयं राजयक्ष्मणः ।
रूपं तस्य यथोद्देशं परं शृणु सभेषजम् ॥ ३७ ॥

राजयक्ष्म्याचें पूर्वरूपः—पडसें, अशक्तता, दोषदृष्टि ह्मणजे चांगली गोष्ट वाईट दिसूं लागणें, शरीर चांगलें असतां विद्रूप दिसूं लागणें, सगळ्या गोष्टींचा कंटाळा येणें, आहार चांगला करीत असूनही शक्ति व शरीर क्षीण होत जाणें, स्त्रियांवर फार मन जाणें, मद्य—मांसाची फार आवड होणें, अंग नेहमीं झांकून ठेवण्याची इच्छा होणें, खाण्या-पिण्याच्या जिनसांत बहुशः माशा, घुण, केस, गवताच्या काड्या वगैरे पडणें, केस व नखें फार वाढणें, स्वप्नांत पक्षी, पतंग, श्वापदें इत्यादिकांस पाहून भयाभीत होणें; केंस, हाडें किंवा धुळीच्या राशीवर चढणें; जलाशय, पर्वत, अरण्य किंवा तारे नक्षत्रें वगैरे सुकत चाललेलीं, क्षीण होत असलेलीं किंवा पडत असलेलीं दृष्टि पडणें, हीं सर्व अनेक क्षणयुक्त


CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

क्षयाचीं पूर्वलक्षणें होत. हीं झालीं असतां पुढें क्षय होऊं पहात आहे असें समजावें. आतां यापुढें त्याचीं लक्षणें व चिकित्सा सांगतों ती ऐक.

यथा स्वेनोष्मणा पाकं शारीरा यान्ति धातवः ।
स्रोतसा च यथास्वेन धातुः पुष्यति धातुना ॥ ३८ ॥
स्रोतसां सन्निरोधाश्च रक्तादीनाञ्च संक्षयात् ।
धातूष्मणां चापचयाद्राजयक्ष्मा प्रवर्तते ॥ ३९ ॥
तस्मिन्काले पचत्यग्निर्यदन्नं कोष्ठमाश्रितम् ।
मलीभवति तत्प्रायः कल्पते किञ्चिदोजसे ॥ ४० ॥
तस्मात्पूरीषं संरक्ष्यं विशेषाद्राजयक्ष्मिणः ।
सर्वधातुक्षयार्तस्य बलं तस्य हि विड्बलम् ॥ ४१ ॥
रसःस्रोतस्सु रुद्धेषु स्वस्थानस्थो विवर्धते ।
स ऊर्ध्वं कासवेगेन बहुरूपः प्रवर्तते ॥ ४२ ॥
जायन्ते व्याधयश्चातः षडेकादशधा पुनः
येषां संघातयोगेन राजयक्ष्मेति कल्प्यते ॥ ४३ ॥
कासोऽसतापो वैस्वर्यं ज्वरः पार्श्वशिरोरुजौ ।
शोणितश्लेष्मणोच्छर्दिः श्वासः कोष्ठामयोऽरुचिः ॥ ४४ ॥
रूपाण्येकादशैतानि यक्ष्मिणः षडिमानि वा ।
कासो ज्वरः पार्श्वशूलं स्वरवर्चोगदोऽरुचिः ॥ ४५ ॥
सर्वैरर्धैस्त्रिभिर्वापि लिंगैर्मांसबलक्षये ।
युक्तो वर्ज्यश्चिकित्स्यस्तु सर्वरूपोऽप्यतोऽन्यथा ॥ ४६ ॥
घ्राणमूले स्थितः श्लेष्मा रुधिरं पित्तमेव वा ।
मारुताध्मातशिरसो मारुतं श्यायते प्रति ॥ ४७ ॥
प्रतिश्यायस्ततो घोरो जायते देहकर्षणः ।
तस्य रूपं शिरःशूलं गौरवं घ्राणविप्लवः ॥ ४८ ॥
ज्वरः कासः कफोत्क्लेशः स्वरभेदोऽरुचिः क्लमः ।
इंन्द्रियाणामसामर्थ्यं यक्ष्मा चातःप्रवर्तते ॥ ४९ ॥
पिच्छिलं बहलं विस्रं हरितं श्वेतपीतकम् ।
कासमानो रसं यक्ष्मी निष्ठीवति कफानुगम् ॥ ५० ॥
अंसपार्श्वाभितापश्च तापः पादकरस्य च ।
ज्वरः सर्वांगगश्चेति लक्षणं राजयक्ष्मणः ॥ ५१ ॥

शरीरांतील रसादि धातु आपापल्या उष्णतेनें परिपक्क होत असतात. आणि ते ते धातु वाहून नेणाऱ्या निरनिराळ्या नळांच्या द्वारा त्या त्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

धातूचें पोषण होतें. (याविषयीं सविस्तर प्रतिपादन सूत्रस्थानाच्या अन्नपानविधि नावांच्या अध्यायांत केलें आहे ह्मणून येथें विस्तार करीत नाहीं.) अशी शरीरपोषणाची व्यवस्था आहे. त्यापैकीं प्रथम, धातूंची उष्णता कमी झाली ह्मणजे ते पक्वच होत नाहींत. पुढें स्रोतोमार्ग दोषांनीं बंद करून टाकल्यामुळें रक्तादि धातूंस त्याची पोषणसामग्री मिळेनाशी होते. धातूंस पोषण मिळालें नाहीं ह्मणजे अर्थातच त्यांचा क्षय होतो. त्यास आपण राजयक्ष्मा किंवा क्षय ह्मणतों. अशा स्थितींत क्षयी मनुष्य जें अन्न खातो त्यांपैकीं बहुतेक भागाचा अग्नीच्या योगानें मळ बनतो व उगीच थोड्याशा भागाचें ओज बनतें. क्षयरोग्याच्या शरीरांत रक्तादि धातु मुळींच बनत नाहींत असें असून तो एक एक दोन दोन वर्षेंपर्यंत देखील जगतो. याचें कारण हेंच आहे कीं, त्याच्या अन्नाचा जो मळ बनतो तोच त्याच्या शरीराचें अवष्टंभन करून तें कसें तरी जिवंत ठेवितो. तात्पर्य काय, क्षयरोग्याचे सर्व धातु क्षय पावलेले असतात आणि त्याच्या जीविताचा सर्व निर्भर कायतो फक्त मलावर असतो. त्या मळाचाही क्षय झाला ह्मणजे रोग्याचें आयुष्य संपलें असें समजावें. क्षय रोग्याचा मळ इतक्या महत्वाचा आहे ह्मणून मुद्दाम तो रक्षण करण्याची विशेष खबरदारी घेतली पाहिजे. क्षयरोग्यास अतिसार झाला ह्मणजे त्याचें आयुष्य संपलें असें समजावें. स्रोतोमार्ग बंद झाल्यामुळें धातूंस पोषण मिळत नाहीं; याचा अर्थ असा कीं, ते धातु चांगल्या पुष्ट स्थितींत राहण्यास त्यांस मागाहून अन्नरसापासून क्रमानें बनत आलेल्या धातूंचा जितका पुरवठा लागतो तितका बनतही नाहीं व तो बनला तरी त्याचे जाण्याचे मार्ग बंद असल्यामुळें तो पुढें पोहोंचूंही शकत नाहीं. त्यामुळें ते अगदीं क्षीण होऊन जातात. परंतु जसें एखाद्या कोऱ्या मडक्यांत पाणी भरून ठेविलें असतां त्यांतून थेंब थेंब गळत असतें व त्यापासून एखादी जिन्नस कशी तरी जिवंत व ओली ठेवावयाची असल्यास तेवढें करतां येतें. परंतु त्यापासून एखाद्या झाडाचें पोषण करावयाचें ह्मटल्यास तें होणें शक्य नाहीं. तसेंच अन्नापासून

SRI JAGADGURU VISHWARADHYA
JNANA SIMHASAN JNANAMANDIR
LIBRARY
Jangamawadi Math, Varanasi
CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बनलेल्या रसाचे कांहीं थेंब त्या चोंदलेल्या नळाच्या कोनाकोपऱ्यां-तून प्रवेश करून शरीर जीवंत राहण्यालायक ओलावा त्या त्या धातूंस देतात. ह्मणजे धातूंची स्थिति कायम ठेवतात. त्यांचे पोषण होत नाहीं. रोज १ शेर अन्न खाणाऱ्या मनुष्यास नवटांक दिल्यानें कांहीं दिवसपर्यंत तो कसा तरी जीव धरून राहील. परंतु त्याचें पोषण होणार नाहीं. हुबेहुब हाच दृष्टांत धातूंस लागतो. अन्नरसाचें पुढें क्रमानें रक्तादि धातूंत रूपांतर व्हावयाचें तें स्रोतोमार्ग बंद असल्यामुळें न होतां रस आपल्या स्थानींच अतिशय वाढून खोकल्याच्या झटक्याबरोबर वर येतो. व याशिवाय अनेक रूपांनीं बाहेर पडतो. याच्या योगानें पुढील सहा किंवा अकरा प्रकारचे रोग उत्पन्न होतात व याच्या योगानेंच, राजयक्ष्मा ही संज्ञा झाली आहे. खोकला, खांदे दुखणें, आवाज बसणें, ताप, कुशींत व मस्तकांत पीडा होणें, रक्त व कफाची उलटी, दमा, उदररोग व अरुचि हे अकरा प्रकार, आणि खोकला, ताप, बरगड्या दुखणें, आवाज बसणें, मलभेद व अरुचि हे सहा प्रकार समजावे. उक्त अकराही विकार ज्या क्षयरोग्यास झाले आहेत, ज्यास सहा झाले आहेत किंवा ज्यास फक्त तीनच झाले आहेत, त्याची जर शक्ति व मांस हीं क्षीण झालीं असतील तर तो रोगी असाध्य समजून सोडून द्यावा, आणि त्याच्या उलट असून जरी उक्त सर्व लक्षणें झालीं असलीं तरी तो साध्य समजावा. याचा भावार्थ असा कीं, क्षयरोगाचें बरें होणें न होणें हें मुख्यत्वेंकरून त्याच्या शरीर व शक्तीवर अवलंबून आहे. क्षय जरी आपल्या अगदीं पूर्ण जोरांत आला असला तरी रोगी चांगला पुष्ट व सशक्त असल्यामुळें तो रोग व औषधें हीं सहन करून, त्यांचा परि-णाम होईपर्यंत शरीर कायम राखून बरा होतो. आणि याच्याच उलट रोग अगदीं साधारण स्वरूपांत आहे, परंतु अंगांत शक्ति व मांस मुळींच नसल्यानें तो तसल्या साधारण रोगासही सहन करूं शकत नाहीं. औषधेंही त्यास सहन होत नाहींत, आणि औषधें आपलीं कामें करण्यापूर्वींच रोग्याचा देहान्त होतो, या कारणास्तव क्षयरोग्याच्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चिकित्सेंत रोग्याची शक्ति फार महत्वाची आहे. कफ, रक्त किंवा पित्त नासिकामूळाशीं जमून राहिलें असतां मस्तकांत शिरणाऱ्या वायूचा त्यास धक्का पोंचून तें वातावर आदळतें. त्या योगानें भयंकर शरीरास क्लेश देणारें असें पडसें होतें व त्यांत डोकें दुखणें, तें जड होणें, नाक बंद होणें, ताप, खोकला, कफ सुटणें, आवाज बसणें, अरुचि, थकवा वाटणें व इंद्रिय शिथिल होणें, हीं लक्षणें होतात. या पडशापासूनच पुढें वाढत वाढत क्षय उत्पन्न होतो. क्षयरोगी खोकूं लागला म्हणजे त्याच्या तोंडांतून बुळबुळीत, दाट, दुर्गंधियुक्त, हिरवा व पांढरा-पिंवळा असा एक प्रकारचा रस कफाबरोबर पडतो, खांदे व बरगड्या दुखतात, हाता-पायांची आग होते व सर्वांगांत ताप असतो. हीं क्षयाचीं लक्षणें होत.

वातात्पित्तात्कफाद्रक्तात्कासवेगात्सपीनसात् ।
स्वरभेदोभवेद्वाताद्रूक्षः क्षामश्चलः स्वरः ॥ ५२ ॥
तालुकण्ठपरिप्लोषः पित्ताद्वक्तुमसूयते ।
कफान्मन्दो विबद्धश्च स्वरः खुरखुरायते ॥ ५३ ॥
सद्योरक्तविबन्धत्वास्वरः कृच्छ्रात्प्रवर्तते ।
कासातिवेगात्करुणः पीनसात्कफवातिकः ॥ ५४ ॥
पार्श्वशूलं त्वनियतं संकोचायामलक्षणम् ।
शिरःशूलं ससन्तापं यक्ष्मिणः स्यात्सगौरवम् ॥ ५५ ॥

वात, पित्त, कफ यांच्या प्रकोपानें, रक्त विबंधानें, खोकण्यानें व पडशानें इतक्या कारणांनीं स्वरभेद उत्पन्न होतो. वातजन्य स्वरभेदांत आवाज कर्कश अशक्त व कांपरा असतो. पित्तजन्य स्वरभेदांत टाळू व घशांत दाह होतो, आणि बोलण्याचा कंटाळा येतो. कफजन्य स्वर-भेदांत आवाज अगदीं बसलेला असतो. बोलतांना अडखळतो व घशांत खुरखुरतें ( खुरखुर असा अस्पष्ट ध्वनि होत असतां ). रक्तविबंधापासून झालेल्या स्वरभेदांत बोलतांना कष्ट होतात. फार खोकल्यापासून झालेल्या स्वरभेदांत आवाज अगदीं दुर्बल असतो; आणि पडशापासून झालेल्या स्वरभेदांत वातजन्य व कफजन्य स्वरभेदाचीं मिश्रित लक्षणें होतात. क्षयरोग्याच्या कुशींतील दुखणें संकोच-आयामरूप असतें. म्हणजे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कोणी ओढून धरल्याप्रमाणें किंवा दाबल्याप्रमाणें वाटतें व यांत राहून राहून चमका मारतात. डोकें दुखतें त्यांत आग होते व तें जड होतें.

> अति खिन्ने शरीरेतुयक्ष्मिणो विषमाशनात् ।
> कण्ठात्प्रवर्तते रक्तं श्लेष्मा चोत्क्लिष्टसञ्चितः ॥ ५६ ॥
> रक्तं विबद्धमार्गत्वान्मांसादीनानुपद्यते ।
> आमाशयस्थमुत्क्लिष्टं बहुत्वात्कण्ठमेति वा ॥ ५७ ॥

विषम भोजनापासून झालेल्या क्षयांत रोग्याचें शरीर अगदीं थकलें ह्मणजे त्याच्या घशांतून रक्त व चाळवून जमा झालेला कफ पडूं लागतो. कारण स्रोतोमार्ग बंद असल्यामुळें रक्त मांसांत जाऊन मिळूं शकत नाहीं. त्यामुळें तें आमाशयांतच चाळवलेलें असतें व पुढें त्याचा उपयोग होत नसल्या कारणानें फार जमा होऊन घशांत येतें.

> वातश्लेष्मविबन्धत्वादुरसः श्वासमृच्छति ।
> दोषैरुपहते चाग्नौ सपिच्छमतिसार्यते ॥ ५८ ॥
> पृथग्दोषैः समस्तैर्वा जिह्वाहृदयसंश्रितैः ।
> जायतेऽरुचिराहा रेदुष्टैरर्थैश्च मानसैः ॥ ५९ ॥
> कषायतिक्तमधुरैर्विद्यान्मुखरसैः क्रमात् ।
> वाताद्यैररुचिं जातां मानसीं दोषदर्शनात् ॥ ६० ॥
> अरोचकात्कासवेगाद्दोषोत्क्लेशाद्भयादपि ।
> छर्दिर्या सा विकाराणामन्येषामप्युपद्रवः ॥ ६१ ॥
> सर्वस्त्रिदोषजो यक्ष्मा दोषाणान्तु बलाबलम् ।
> परीक्ष्यावस्थितं वैद्यः शोषिणं समुपाचरेत् ॥ ६२ ॥

क्षयरोग्याची छाती वात व कफाच्या योगानें दाटलेली असल्यामुळें त्यास दम लागतो आणि अग्नि दोषांच्या योगानें दबला गेल्यामुळें बुळबुळीत ( आमयुक्त ) मळाचे जुलाव होतात. वात, पित्त व कफ तीन दोष निरनिराळे किंवा सर्व एकत्र मिळून जीभ व हृदय यांच्या ठायीं बसल्यानें अन्नावर अरुचि उत्पन्न होते. तशीच मनाचा दुष्ट—अप्रिय पदार्थांशीं संयोग होऊन त्याचा संताप झाल्यानें अरुचि उत्पन्न होते. वातजन्य अरुचींत तोंडाची रुचि तुरट असते, पित्तजन्य अरुचींत तोंड गुळ-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मट होतें. अरुचि खोकल्याचा झटका, दोष चाळवणें व भय या कारणां-पासून वांत्या होतात. इतर विकारांतही उपद्रवरूपानें वांति होते. क्षय तेथून सर्व त्रिदोषजन्य असतात. तरी त्यांतल्या त्यांत दोषाचे बलाबल पाहून त्याप्रमाणें वैद्यानें रोग्याची चिकित्सा करावी.

प्रतिश्याये शिरःशूले कासे श्वासे स्वरक्षये ।
पार्श्वशूले च विविधा क्रिया साधारणी शृणु ॥ ६३ ॥
पीनसे स्वेदमभ्यंगं धूममालेपनानि च ।
परिषेकावगाहाँश्च यावकं वाट्यमेव च ॥ ६४ ॥
लवणाम्लकटूष्णांश्च रसान्स्नेहोपसंहितान् ।
लावतित्तिरिदक्षाणां वर्तकानाञ्च कल्पयेत् ॥ ६५ ॥
सपिप्पलीकं सयवं सकुलत्थं सनागरम् ।
दाडिमामलकोपेतं स्निग्धमाजं रसं पिबेत् ।
तेन षड्विनिवर्तन्ते विकाराः पीनसादयः ॥ ६६ ॥
मूलकानां कुलत्थानां यूषैर्वा सूपकल्पितैः ।
यवगोधूमशाल्यन्नैर्यथासात्म्यमुपाचरेत् ॥ ६७ ॥

आतां पडसें, डोकें दुखणें, खोकला, दमा, आवाज बसणें व बर-गड्या दुखणें या सहा विकारांवर सामान्य चिकित्सा सांगतों ती ऐक. पडश्यावर तें बरें करणारे स्वेदन, अभ्यंग, धुरी, लेप, परिषेक व स्नान या पद्धतीचे उपचार करावे. जवांची कण्हेरी किंवा भाजलेले जव खावयास द्यावे. लावा, तित्तिर, कोंबडा व गांजीण (ज्यास बटेर असेंही ह्मणतात,) या पक्ष्यांच्या मांसाचे सुरवे चांगल्या बऱ्याच तुपांत तयार करून सैंधव, आंबटाण व कडू द्रव्यें मिश्रित करून गरम गरम प्यावें. बकऱ्याच्या मांसाचा पिंपळी, जव, कुळीथ, सुंठ, डाळिंबाचा रस आंवळे या पदार्थांसहित पुष्कळसें तूप टाकून तयार केलेला सुरवा प्यावा. याच्या योगानें पडसें वगैरे वर सांगितलेलें सहा विकार नाहींसे होतात, किंवा रोग्याचें सात्म्य पाहून मुळे किंवा कुळथाच्या कढणाबरोबर जव, गहूं व साळीचे पदार्थ तयार करून खावयास द्यावे.

पिबेत्प्रसादं वारुण्या जलं वा पाञ्चमूलिकम् ।
धान्यनागरसिद्धं वा तामलक्याथग शृतम् ॥ ६८ ॥
पर्णिनीभिश्चतसृभिस्तेन चान्नानि कल्पयेत् ।

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

क्रुसरोत्कारिकामाषकुलत्थयवपायसैः॥ ६९ ॥
सङ्करस्वेदविधिना कण्ठं पार्श्वमुरः शिरः ।
स्वेदयत्पत्रभंगेन शिरश्च परिषेचयेत् ॥ ७० ॥
वलागुडूचीमधुकशृतैर्वा वारिभिः सुखैः ।
बस्तमत्स्यशिरोभिर्वा नाडीस्वेदैः प्रयोजयेत् ॥ ७१ ॥
कण्ठे शिरसिपार्श्वे च पयोभिर्वा सवातिकैः ।
औदकानूपमांसानि सलिलं पाञ्चमूलिकम् ॥ ७२ ॥
सस्नेहमारनालं वा नाडीस्वेदं प्रयोजयेत् ।
जीवन्त्याः शतपुष्पाया बलाया मधुकस्य च ॥ ७३ ॥
वचाया वेसवारस्य विदार्या मूलकस्य च ।
औदकानूपमांसानामुपनाहाश्च संस्कृता ॥ ७४ ॥
शस्यन्ते च चतुःस्नेहाः शिरःपार्श्वांसशूलिनाम् ।
शतपुष्पा समधुकं कुष्ठं तगरचन्दनम् ।
आलेपनं स्यात्सघृतं शिरःपार्श्वांसशूलनुत् ॥ ७५ ॥
बलारास्नातिलाः सर्पिर्मधुकं नीलमुत्पलम् ।
पलंकषा देवदारु चन्दनं केसरं घृतम् ॥ ७६ ॥
वीरां बला विदारी च कृष्णगन्धा पुनर्नवा ।
शतावरी पयस्या च कत्तृणं मधुकं घृतम् ॥ ७७ ॥
चत्वार एते श्लोकार्धैः प्रदेहाः परिकीर्तिताः ।
शस्ताःसंसृष्टदोषाणां शिरःपार्श्वांसशूलिनाम् ॥ ७८ ॥
नावनं धूमपानानि स्नेहाश्चोत्तरभक्तिकाः ।
तैलान्यभ्यंगयोगीनि वस्तिकर्म तथापरम् ॥ ७९ ॥

वारुणी मंड, रानगांजा–रानभाल–रिंगणी–डोरली व गोखरूं या पंचमुळांचा काढा, धने व सुंठीचा काढा, भुईआंवळीचा काढा, किंवा रानगांजा–रानभाल–रानमूग व रानउडीद यांचा काढा द्यावा व याच काढ्यांत खाण्यापिण्याचे पदार्थ तयार करावे. तिळांची खिचडी, भाकरी, उडीद, कुळीथ, जव व खीर यांनीं संकर पद्धतीनें गळा बरगड्या, छाती व डोकें शेकावें, वातनाशक वृक्षांचीं पानें टाकून उकळलेलें पाणी डोक्यावर ओतावें; किंवा चिकणा, गुळवेल व ज्येष्ठमध हीं द्रव्यें टाकून उकळलेलें पाणी कोमट करून त्यानें डोक्यावरून स्नान घालावें. अथवा बकऱ्याचें मुंडकें किंवा माशाचें मस्तक यांचा नाडीस्वेदविधीनें गळा,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

डोकें व बरगड्या यांस शेक द्यावा. किंवा वातनाशक द्रव्यें टाकून उकळलेल्या पाण्यानें नाडीस्वेदन करावें अथवा जलचर व पाणथळ जनावरांचा मांसरस, रानगांजादि पंचमुळांचा काढा अथवा स्निग्ध कांजी यांनीं नाडीस्वेदन करावें. जीवन्ती, बडीशोप, चिकणा, ज्येष्ठमध, वेखंड वेसवार, ( मांसाचा खीमा शिजवून त्यांत गूळ, तूप, पिंपळी, मिरें वगैरे मिळवून केलेला पदार्थ ) भुईकोहळा, मुळे, जलचर व आनूप प्राण्यांचें मांस यांत तेल, तूप, चरबी व मज्जा हे चारही प्रकारचे स्नेह मिळवून, त्यांचें पोटीस बनवून त्याचा उपयोग करावा. हा डोकें, बरगड्या व खांदे यांचे दुखणें बंद करण्यास उत्तम आहे. बडीशेप, ज्येष्ठीमध, कोष्ठ तगर व चंदन यांचा तुपांतून लेप लावला असतां डोकें, बरगड्या व खांदे यांचें दुखणें बंद होतें. १ चिकणा, रास्ना, तीळ, तूप, ज्येष्ठमध व निळें कमळ; २ गुग्गुळ, देवदार, चंदन, नागकेशर व तूप; ३ क्षीरकाकोली, चिकणा, भुईकोंहळा, शेवग्याची साल व पुनर्नवा; ४ शतावरी, क्षीरकाकोली, रोहिसगवत, ज्येष्ठमध व तूप याप्रमाणें हे अर्ध्या अर्ध्या श्लोकांत सांगितलेले लेप द्विदोषजन्य मस्तकशूल आणि बरगड्या व खांदे दुखण्यावर प्रशस्त आहेत. तसेंच नस्य करावें, धुरी द्यावी, जेवणानंतर तूप प्यावयास द्यावें, अभ्यंग करण्याचीं तेलें तयार करून त्यांचें मालिश करावें आणि शेवटीं बस्ति द्यावा.

जलौकालाबुशृंगैर्वा प्रदुष्टं व्यधनेन वा ।
शिरःपार्श्वांसशूलेषु रुधिरं तस्य निर्हरेत् ॥ ८० ॥
प्रदेहः सघृतश्चेष्टः पद्मकोशीरचन्दनैः ।
दूर्वामधुकमञ्जिष्ठाकेशरैर्वा घृताप्लुतैः ॥ ८१ ॥
प्रपौण्डरीकनिर्गुण्डीपद्मकेशरमुत्पलम् ।
कशेरुकाः पयस्या च ससर्पिष्कं प्रलेपनम् ॥ ८२ ॥
चन्दनाद्येन तैलेन शतधौतेन सर्पिषा ।
अभ्यंग पयसा सेकः शस्तश्च मधुकाम्बुना ॥ ८३ ॥
माहेन्द्रेण सुशीतेन चन्दनादिशृतेन वा ।
परिषेकः प्रयोक्तव्य इति संशमनी क्रिया ॥ ८४ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

डोकें, बरगडया व खांदे दुखत असतां, तसें करणें योग्य दिसल्यास जळवा, तुंबडी किंवा शिंग लावून अथवा शिरा चिरून रक्त काढवावें. पद्म-काष्ठ, वाळा व चन्दन यांचा तुपांतून लेप द्यावा. दूर्वा, ज्येष्ठमध, मंजिष्ठ व नागकेशर यांचा तुपांतून लेप द्यावा. पुंडरीक काष्ठ, निगडीचा पाला, कमळ-केशर व निळें कमळ यांचा, किंवा कसेरूचें मूळ व क्षीरकाकोलीचा तुपां-तून लेप द्यावा. मागें ज्वरचिकित्साध्यायांत सांगितलेल्या चंदनादि तेलाची किंवा शंभर वेळां धुतलेल्या तुपाची मालिश करावी. दुधाची किंवा ज्येष्ठीमध घालून उकळलेल्या पाण्याची धार धरावी. किंवा थंडगार पावसाच्या पाण्यानें अथवा पूर्वोक्त चन्दनादि औषधें घालून कढवि-लेल्या पाण्यानें अभिषेक करावा. याप्रमाणें हे शामक उपाय सांगितले.

दोषाधिकानां वमनं शस्यते सविरेचनम् ।
स्नेहस्वेदोपपन्नानां सस्नेहं यन्न कर्शनम् ॥ ८५ ॥
शोषी मुञ्चति गात्राणि पुरीषस्रंसनादपि ।
अवलापेक्षिणीं मात्रां किं पुनर्यो विरिच्यते ॥ ८६ ॥
योगात्संशुद्धकोष्ठानां कासे श्वासे स्वरक्षये ।
शिरःपार्श्वांसशूलेषु सिद्धानेतान्प्रयोजयेत् ॥ ८७ ॥
बलाविदारीगन्धाद्यैर्विदार्या मधुकेन वा ।
सिद्धं सलवणं सर्पिर्नस्यं स्या स्वर्यमुत्तमम् ॥ ८८ ॥
प्रपौण्डरीकं मधुकं पिप्पली बृहती बला ।
क्षीरं सर्पिश्च तत्सिद्धं स्वर्यं स्यान्नावनं परम् ॥ ८९ ॥
शिरःपार्श्वांसशूलघ्नं कासश्वासनिबर्हणम् ।
प्रयुज्यमानं बहुशो घृतञ्चोत्तरभक्तिकम् ॥ ९० ॥
दशमूलेन पयसा सिद्धं मांसरसेन च ।
बलागर्भं घृतं सद्यो रोगानेतान्प्रबाधते ॥ ९१ ॥
भक्तस्योपरिमध्ये वा यथाग्निप्रविचारितम् ।
रास्नाघृतं वा सक्षीरं सक्षीरं वा बलाघृतम् ॥ ९२ ॥

क्षयी रोग्याचे दोष फार वाढलेले असले तर प्रथम त्याचें स्नेहन व स्वेदन करून किंचित् स्निग्ध असें वमन व विरेचन करावें. परंतु तें इतकें बेताचें असावें कीं त्यापासून त्याची शक्ति क्षीण होतां कामा नये, कारण

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

क्षयी मनुष्यास एरवींच जरी एखादा जुलाब झाला तर तो हातपाय गाळूं लागतो. अशा स्थितींत त्यास त्याच्या शक्तीकडे न पाहतां एकदम जोरदार रेचन दिल्यास त्याची दशा काय होईल याचा विचार करावा. योग्य वमन विरेचनानें कोठा साफ झाल्यावर खोकला, दमा, स्वरभेद आणि डोकें, बरगड्या व खांदे दुखणें या विकारांवर पुढील उपाय योजावे. चिकणा, रानगांजादि दशमुळें, भुइकोहळा व ज्येष्ठीमध हीं द्रव्यें आणि थोडें सैंधव टाकून तयार केलेल्या तुपाचें नस्य केल्यानें आवाज उत्तम प्रकारें सुधारतो. पुंडरीककाष्ठ, ज्येष्ठमध, पिंपळी, डोरली-मूळ, चिकणामूळ हीं द्रव्यें व दूध मिळवून तयार केलेल्या तुपाचें नस्यही उत्तम आवाज सुधारणारें आहे. डोकें दुखणें, बरगड्या दुखणें व खांदे दुखणें, खोकला व दमा हे विकार भोजनानंतर औषधिसिद्ध तूप बरेंचसें घेत गेल्यानें नाहींसे होतात दशमुळांचा काढा व तूप अथवा मांसरस व चिकणामुळाचा कल्क यांनीं तयार केलेलें तूप सेवन केल्यानें वरील विकार लवकर नाहींसे होतात. जेवणानंतर किंवा जेवणाच्या दर-म्यान यथाशक्ति रास्ना व दूध किंवा चिकणा व दूध मिळवून तयार केलेलें तूप सेवन केल्यानेंही वरील रोग बरे होतात.

लेहान्कासापहान्स्वर्यान्श्वासहिक्कानिबर्हणान् ।
शिरःपार्श्वांसशूलघ्नान्स्नेहाँश्चातः परं शृणु ॥ ९३ ॥
घृतं खर्जूरमृद्वीकाशर्कराक्षौद्रसंयुतम् ।
सपिप्पलीकं वैस्वर्यकासश्वासनिबर्हणम् ॥ ९४ ॥
दशमूलशृतात्क्षीरात्सर्पिर्यदुदियान्नवम् ।
सपिप्पलीकं सक्षौद्रं तत्परं स्वरबोधनम् ॥ ९५ ॥
शिरःपार्श्वांसशूलघ्नं कासश्वासज्वरापहम् ।
पञ्चभिः पञ्चमूलैर्वा शृताद्यदुदियाद्घृतम् ॥ ९६ ॥
पञ्चानां पञ्चमूलानां रसे क्षीरचतुर्गुणे ।
सिद्धं सर्पिर्जयत्येतद्यक्ष्मणः सप्तकं बलम् ॥ ९७ ॥
खर्जुरं पिप्पली द्राक्षा पथ्या शृङ्गी दुरालभा ।
त्रिफला पिप्पली मुस्तं शृङ्गाटीगुडशर्कराः ॥ ९८ ॥
वीरा शटी पुष्कराख्यं सुरसः शर्करागुडः ।
नागरं चित्रको लाजाः पिप्पल्यामलकं गुडः ॥ ९९ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्लोकार्धविहितान्नेतान्लिह्यान्ना मधुसर्पिषा ।
कासश्वासापहान्स्वर्यान्पार्श्वशूलापहाँस्तथा ॥ १०० ॥

आतां खोकला नाहींसा करणारे, आवाज खुलवणारे, दमा व उचकी दाबून टाकणारे आणि डोकें, बरगड्या व खांदे यांतील शूळ नाहींसा करणारे लेह व स्नेह सांगतों, ते ऐक. तूप, खजूर, द्राक्षें खडीसाखर, मध व पिंपळी हीं एकत्र करून घेतलीं असतां स्वरभंग, खोकला व दमा बरे होतात, रानगांजा, रानभाल, रिंगणी, डोरली, गोखरू, बेल, ऐरण, टेंटू, शिवण व पाडळ हीं दहा मुळें टाकून तापविलेल्या दूधापासून जें तूप होईल तें ताजें घेऊन त्यांत पिंपळी व मध मिळवून तें सेवन करावें. हें उत्कृष्ट आवाज खुलवणारें असून डोकें, बरगड्या व खांदे यांचें दुखणें, खोकला, दमा व ताप हें विकार नाहींसे करणारें आहे. किंवा वरील दशमुळें, शतावरी, भुईकोहळा, जीवंती, पाषाणी, जीवक, सरकांडें, उंस, दर्भ, कसई, साळीभात, पुनर्नवा, एरंड, रानउडीद व रानमूग अशीं एकंदर मिळून पंचवीस मुळें टाकून दूध आटवावें आणि त्यापासून जें तूप होईल तें खावें. ह्मणजे त्यापासूनही पूर्वोक्त तुपाचा गुण येतो. उक्त २५ पंचमूळांचा काढा करून त्यांत त्या काढ्याच्या चौपट दुधासह तूप सिद्ध करून तें घेतलें असतां पडसें, खोकला, दमा, खांदे दुखणें, बरगड्या दुखणें, स्वरभेद व अरुचि हे क्षयाचे सात विकार नाहींसे होतात. १ खजूर, पिंपळी, द्राक्षें, हिरडा, काकडशिंगी व धमासा. २ त्रिफळा, पिंपळी, नागरमोथा, शृंगाटी ( जीवन्ती ), गूळ व खडीसाखर. ३ क्षीरकाकोली, कचोरा, पुष्करमूळ, सुरस ( तुळस ), खडीसाखर व गूळ. ४ नागरमोथा, चित्रक, लाह्या, पिंपळी, आंवळकठी व गूळ. याप्रमाणें अर्ध्या अर्ध्या श्लोकांत सांगितलेल्या जिनसांचें चूर्ण करून तें मध व तुपांतून चाटावें. ह्मणजे खोकला, दमा व बरगड्यांतला शूळ नाहींसा होऊन आवाज खुलतो.

सितोपलां तुगाक्षीरीं पिप्पलीं बहुलां त्वचम् ।
अन्त्यादूर्ध्वं द्विगुणितं लेहयेन्मधुसर्पिषा ॥ १०१ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चूर्णितं प्राशयेद्वा तच्छ्वासकासकफातुरम्।
सुप्तजिह्वारोचकिनमल्पाग्निं पार्श्वशूलिनम् ॥ १०२ ॥

**सितोपलादि चूर्णः**—खडीसाखर, वंशलोचन, पिंपळी, वेलचीदाणें दालचिनी हीं द्रव्यें उलट क्रमानें उत्तरोत्तर दुप्पट ह्मणजे दालचिनीहून वेलची, वेलचीहून पिंपळी व त्याचप्रमाणें पुढें खडीसाखरेपर्यंत एकाहून दुसरें दुप्पट प्रमाणांत घेऊन त्यांचें चूर्ण करून तें मध व तुपांतून चाटावें किंवा नुसतेंच खावें; ह्मणजे दमा, खोकला, कफ, जीभ जड होणें, अरुचि, मंदाग्नि व बरगड्यांतलें दुखणें, हे सर्व विकार नाहींसे होतात.

हस्तपादांगदाहेषु ज्वरे रक्ते तथोर्ध्वगे।
वासासर्पिः शतावर्या सिद्धं वा परमं हितम् ॥ १०३ ॥
दुरालभां श्वदंष्ट्रांश्च चतस्रः पर्णिनीर्बलाम्।
भागान्पलोन्मितान्कृत्वा पलं पर्पटकस्य च ॥ १०४ ॥
पंचेद्दशगुणे तोये दशभागावशेषिते।
रसे सुपूते द्रव्याणामेषां कल्कान्समावपेत् ॥ १०५ ॥
शट्याः पुष्करमूलस्य पिप्पलीत्रायमाणयोः।
तामलक्याः किराततानां तिक्तस्य कुटजस्य च ॥ १०६ ॥
फलानां शारिवायाश्च सुपिष्टान्कर्षसम्मितान्।
ततस्तेन घृतप्रस्थं क्षीरद्विगुणितं पचेत् ॥ १०७॥
ज्वरं दाहं भ्रमं कासमंसपार्श्वशिरोरुजम्।
तृष्णां छर्दिरतीसारमेतान्सर्पिरपोहति ॥ १०८॥

हात, पाय व अंगाचा दाह होत असेल, ताप असेल व रक्तही ऊर्ध्वगामी झालें असेल तर अडुळशाच्या मुळ्या घालून सिद्ध केलेलें वासाघृत किंवा शतावरीघृत द्यावें. हें उक्त विकारांवर चांगलें गुणकारी आहे.

**गोक्षुरादिघृत**—धमासा, गोखरूं, रानगांजा, रानभाल, रानउडीद, रानमूग, चिकणा व पित्तपापडा हीं द्रव्यें प्रत्येकीं ४।४ तोळे घेऊन सर्वांच्या दसपट पाण्यांत उकळावीं. एक दशांश काढा. उरला ह्मणजे उतरून चांगला गाळून घेऊन त्यांत इंद्रजव, कचोरा, पुष्करमूळ, पिंपळी, मायफळ, भुयआंवळी, कडू किराईत, कडू पडवळ, इंद्रजव व अनंतमूळ (उपळसरी) या औषधांचा प्रत्येकीं एकेक तोळा कल्क मिळवून या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मिश्रणांत एकशेर तूप व दोनशेर दूध मिळवून तें तूप सिद्ध करून घ्यावें. यापासून ताप, दाह, भ्रम, खोकला, खांदे, बरगड्या व डोकें दुखणें, तहान, उलटी व अतीसार हे रोग बरे होतात.

जीवन्तीं मधुकं द्राक्षां फलानि कुटजस्य च ।
शटीं पुष्करमूलञ्च व्याघ्रीं गोक्षुरकं बलाम् ॥ १०९ ॥
नीलोत्पलं तामलकीं त्रायमाणां दुरालभाम् ।
पिप्पलींच्च सभं पिष्ट्वा घृतं वैद्यो विपाचयेत् ॥ ११० ॥
एतद्व्याधिसमूहस्य रोगेशस्य समुत्थितम् ।
रूपमेकादशविधं सर्पिरग्र्यं व्यपोहति ॥ १११ ॥

जीवन्त्यादिघृत—जीवंती, ज्येष्ठमध, काळीं द्राक्षें, इंद्रजव, कचोरा, पुष्करमूळ, रिंगणीमूळ, गोखरू, चिकणामूळ, निळें कमळ, भुईआंवळी, मायफळ, घमासा व पिंपळी हीं समभाग घेऊन त्यांचा वांटून कल्क करून तो एकपट तूप व चौपट पाण्यांत मिळवून तें तूप सिद्ध करावें. हें तूप क्षयरोगांत होणाऱ्या पूर्वोक्त एकंदर अकराही विकारांस नाहींसें करितें.

बलां स्थिरां पृश्निपर्णीं बृहतीं सनिदिग्धिकाम् ।
साधयित्वा रसे तस्मिन्पयो गव्यं सनागरम् ॥ ११२ ॥
द्राक्षाखर्जूरसर्पिर्भिः पिप्पल्या च शृतं सह ।
सक्षौद्रं ज्वरकासघ्नं स्वर्यं चैतत्प्रयोजयेत् ॥ ११३ ॥
आजस्य पयसश्चैव प्रयोगो जाङ्गला रसाः ।
यूषार्थे चणकामुद्गामकुष्ठाश्चोपकल्पिताः ॥ ११४ ॥
ज्वराणां शमनीयो यः पूर्वमुक्तः क्रियाविधिः ।
यक्ष्मिणां ज्वरदाहेषु ससर्पिष्कः प्रशस्यते ॥ ११५ ॥
कफप्रसेके बलवाञ्श्लेष्मिकश्छर्दयेन्नरः ।
पयसा फलयुक्तेन मधुरेण रसेन वा ॥ ११६ ॥
सर्पिष्मत्या यवाग्वा वा वमनीयोपसिद्धया ।
स वान्तोऽद्याच्च लघ्वन्नमन्नकाले सदीपनम् ॥ ११७ ॥
यवागोधूममाध्वीकशीध्वरिष्टसुरासवान् ।
जाङ्गलानि च शूल्यानि सेवमानः कफञ्जयेत् ॥ ११८ ॥
श्लेष्मणोऽतिप्रसेके तु वायुः श्लेष्माणमस्यति ।
कफप्रसेकं तं विद्वान्स्निग्धोष्णेनैव निर्जयेत् ॥ ११९ ॥
क्रिया कफप्रसेके या वम्यां सैव प्रशस्यते ।
हृद्यानि चान्नपानानि वातघ्नानि लघूनि च ॥ १२० ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चिकणामूळ, रानगांजामूळ, रानभालमूळ, डोरलीमूळ व रिंगणीमूळ यांचा काढा करून त्यांत गाईचें दूध, सुंठ, द्राक्षें, खजूर व पिंपळी यांचा कल्क मिळवून या मिश्रणांत तूप सिद्ध करावें, हें मधाबरोबर घेतलें असतां ताप व खोकला नाहींसा होऊन आवाज चांगला सुटतो. क्षयरोगांत बकरीचें दूध व जांगल प्राण्यांच्या मांसाचे सुरवे यांचा उपयोग करावा. कढण द्यावयाचें असल्यास तें हरभरे, मूग किंवा मठ यांचें तयार करून द्यावें. ज्वर चिकित्साध्यायांत तापाचे जे शामक उपाय सांगितले आहेत त्यांचाच उपयोग क्षयाच्या तापांत व दाह होत असतां करावा. मात्र क्षयांत सर्व प्रयोगांत तूप वापरावें. ह्मणजे इतर तापांत जो नुस्ता काढा घ्यावयास सांगितला असेल त्याच काढ्यांत तूप तयार करून तें क्षयावर द्यावें. फार कफ पडत असल्यास, रोगी सशक्त असला तर त्यास दुधांतून किंवा मधूर मांस-रसांतून गेळफळ देऊन वांती करवावी. किंवा गेळफळ वगैरे वांतिका-रक द्रव्यें मिळवून तूप घालून केलेली कण्हेरी द्यावी. वांति होऊन गेली ह्मणजे जेवण्याच्या वेळीं हलके व अग्निदीपक अन्न द्यावें. जव, गहूं, माध्वीक, शीधू, अरिष्ट, सुरा, आसव आणि जांगल प्राण्यांचें लोखं-डाच्या सळईवर भाजलेलें मांस सतत सेवन केल्यानें कफाचें शमन होतें. क्षयांत जो फार कफ पडतो त्यास वायूच फेंकीत असतो. ह्मणून कफ पडणें बंद करण्याकरितां जी चिकित्सा करावयाची ती स्निग्ध व उष्ण ह्मणजे वातनाशक असावी. जी चिकित्सा कफ बंद करण्याकरितां करावयाची तीच वांतीही बंद करण्याकरितां करावी. आणि नंतर हृदयास प्रिय, वातनाशक व हलकें असें अन्नपान द्यावें.

प्रायेणोपहताग्नित्वात्सपिच्छमातिसार्यते ।
प्राप्नोत्यास्यस्य वैरस्यं न चान्नमभिनन्दति ॥ १२१ ॥
तस्याग्निदीपनान्योगानतीसारनिबर्हणान् ।
वक्त्रशुद्धिकरान्कुर्यादरुचिप्रतिबाधकान् ॥ १२२ ॥
सनागरानिन्द्रयवान्पिबेद्वा तण्डुलाम्बुना ।
सिद्धां यवागूं जीर्णे च चांगेरीतक्रदाडिमैः ॥ १२३ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पाठां बिल्वं यमानीश्च पातव्यं तक्रसंयुतम् ।
दुरालभां शृंगवेरं पाठां च सुरया सह ॥ १२४ ॥
जम्ब्वाम्रमध्यं बिल्वञ्च सकपित्थं सनागरम् ।
पेया मण्डेन पातव्यमतीसारनिवृत्तये ॥ १२५ ॥
एतानेव च योगाँस्त्रीन्पाठादीन्कारयेत्खडान् ।
ससूपधान्यान्सस्नेहान्साम्लान्संग्रहणान्परान् ॥ १२६ ॥
वेतसार्जुनजम्बूनां मृणालीकृष्णगन्धयोः ।
श्रीपर्ण्या मदयन्त्याश्च यूथिकायाश्च पल्लवान् ॥ १२७ ॥
चांगेर्याश्चुक्रिकायाश्च दुग्धिकायाश्च कारयेत् ।
खडान्दधिसरोपेतान्ससर्पिष्कान्सदाडिमान् ॥ १२८ ॥
मांसानां लघुपाकानां रसाः सांग्राहिकैर्युताः ।
व्यञ्जनार्थं प्रशस्यन्ते भोज्यार्थं रक्तशालयः ॥१२९॥
स्थिरादिपञ्चमूलेन पाने शस्तं शृतं जलम् ।
तक्रं सुरा सचुक्रीका दाडिमस्याथवा रसः ॥ १३० ॥

क्षयांत रोग्याचा अग्नि विशेषेंकरून दवला जात असल्यामुळें त्यास आमातिसार होतो. म्हणजे चिकट, बुळबुळीत जुलाब होतात, तोंडाची रुचि बिघडते व अन्नावर इच्छा जात नाहीं. अशा स्थितींत रोग्यास अग्निदीपक असून अतिसार बंद करणारी अशीं जीं औषधें असतील तीं द्यावीं आणि तोंड स्वच्छ करणारीं व रुचि आणणारीं औषधें असतील त्यांचाही उपयोग करावा. अतिसारांत इंद्रजव व सुंठ तांदुळांच्या धुवणांतून घ्यावीं. आणि हें पचल्यावर चुका (भाजी) ताक व डाळिंबाचा रस मिळवून तयार केलेली कण्हेरी प्यावी. पहाडमूळ बेलफळाचा गर व ओंवा हीं ताकांतून द्यावीं. धमासा, सुंठ व पहाडमूळ मद्याबरोबर घ्यावीं. आणि जांभळाची बी, आंब्याची कोय, पिकलेलें कंवठ व सुंठ हीं पेजेंतून घ्यावीं. या प्रयोगांपासून अतिसार बंद होतो. वर सांगितलेल्या शेवटच्या तीन प्रयोगांतील औषधांसह मूग, मठ, मसुरा वगैरे धान्याचें कढण करून त्यांत तूप व आंबटाण टाकून तें द्यावें. हें उत्तम ग्राहक आहे. किंवा वेत, अर्जूनसादडा जांभूळ, कमळ, शेवगा, शिवण, बेलमोगरी, जुई, चुका, चिंच व दुधी यांचीं पानें, दह्याची साय, तूप

CC-0 Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

व डाळिंबाचा रस हीं एकत्र करून त्यांचें खडयूष ( कढण ) बनवून तें द्यावें. पचण्यास हलक्या अशा मांसाचा, स्तंभक औषधें मिळवून शाखा करून त्याबरोबर तांबड्या साळींचा भात खावयास द्यावा. रानगांजा वगैरे पंचमुळें टाकून तापविलेलें पाणी पिण्यास द्यावें. ताक, मद्य, चुका व डाळिंबाचा रस हींही ग्राहक असून दीपक आहेत.

दीपनं ग्राहि निर्दिष्टं भेषजं भिन्नवर्चसे ।
परं मुखस्य वैरस्यनाशनं रोचनं शृणु ॥ १३१ ॥
द्वौ कालौ दन्तधवनं भक्षयेन्मुखधावनैः ।
तद्वत्प्रक्षालयेदास्यं धारयेत्कवलग्रहाम् ॥ १३२ ॥
पिबेध्दूमं ततो भृष्टमद्याद्दीपनपाचनम् ।
भेषजं पानमन्नञ्च हितमिष्टोपकल्पितम ॥ १३३ ॥
त्वंमुस्तमेलाधान्यानि मुस्तमामलके त्वचम् ।
दार्वी त्वचो यमानी च पिप्पल्यस्तेजवत्यपि ॥ १३४ ॥
यमानी तिन्तिडीकञ्च पञ्चैते मुखधावनाः ।
श्लोकपादेषु विहिता रोचना मुखशोधनाः ॥ १३५ ॥
गुलिकां धारयेदास्ये चूर्णैर्वा शोधयेन्मुखम् ।
एषामालोडितानां वा धारयेत्कवलग्रहान् ॥ १३६ ॥
सुरामाध्वीकसीधूनां तैलस्य मधुसर्पिषोः ।
कवलान्धारयेदिष्टान्क्षीरस्येक्षुरसस्य च ॥ १३७ ॥
यमानीं तिन्तिडीकञ्च नागरं साम्लवेतसम् ।
दाडिमं बदरञ्चाम्लं कार्षिकञ्चोपकल्पयेत् ॥ १३८ ॥
धान्यसौवर्चलाजाजीवराङ्गश्चार्धकार्षिकम् ।
पिप्पलीनां शतञ्चैकं द्वे शते मरिचस्य च ॥ १३९ ॥
शर्करायाश्च चत्वारि पलान्येकत्र चूर्णयेत् ।
जिह्वाविशोधनं हृद्यं तच्चूर्णं भक्तरोचकम् ॥ १४० ॥
हृत्प्लीहपार्श्वशूलघ्नं विबन्धानाहनाशनम् ।
कासश्वासहरं ग्राही ग्रहण्यर्शोऽविकारनुत् ॥ १४१ ॥

येथपर्यंत अतिसारांत द्यावयाची दीपक व संग्राहक औषधें सांगितलीं. आतां तोंडाची अरुचि नाहींशी करून रुचि आणणारे उपाय सांगतों. सकाळ-संध्याकाळ दोन्हीं वेळ दन्तधावन भक्षण करावें. तोंड स्वच्छ करणाऱ्या काढ्यांनीं तें धुवावें. तोंडांत कवलग्रह धरावा, प्रायो-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गिक धूमपान करावें, दीपक व पाचक द्रव्यें भाजून खावीं. आणि हितकर व आवडणारें खाण्यापिण्याचे पदार्थ सेवन करावे. १ दालचिनी नागरमोथा, वेलची, धने; २ नागरमोथा, आंवळकठी व दालचिनी; ३ दारुहळद, दालचिनी, ओंवा; ४ पिंपळीं व चवक ( किंवा गजपिंपळी) आणि ५ ओंवा ( भाजलेला ) व चिंच हे प्रत्येक चरणांत एकेक याप्रमाणें सांगितलेले पांच प्रयोग तोंड स्वच्छ करून रुचि आणणारे आहेत. सदरहु औषधांच्या गोळ्या करून तोंडांत धराव्या. चूर्ण करून तें चोळावें किंवा हीं पाण्यांत कालवून तोंडांत त्याच्या चुळा धराव्या. सुरा, माध्विक, शीधु, तेल, मध-तूप, दूध व उंसाचा रस हीं तोंडांत धरल्यानेंही तोंड स्वच्छ होतें. यमानीषाडवचूर्ण–ओंवा, चिंच ( वरचें टरफल ), सुंठ, चुका, डाळिंबसाल व आंबट बोरें हीं प्रत्येकीं एकेक, १०० पिंपळ्या, २०० काळीं मिरें आणि १६ तोळे खडीसाखर या सर्व जिनसांचें एकत्र चूर्ण करून तें घ्यावें. ह्मणजे यापासून जीभ स्वच्छ होते, हृदयास प्रसन्नता येते, अन्नावर रुचि होते, हृदय, प्लीहा, बरगड्या, यांतील दुखणें बंद होतें; विबंध, मलमूत्रावरोध, खोकला व दमा हे विकार नाहींसे होतात, जुलाब बंद होतात आणि ग्रहणी व मूळव्याधीचे विकार बरे होतात.

तालीसपत्रं मरिचं नागरं पिप्पली शुभा ।
यथोत्तरं भागवृद्ध्या त्वगेले चार्धभागिके ॥ १४२ ॥
पिप्पल्यष्टगुणा चात्र प्रदेया सितशर्करा ।
कासश्वासारुचिहरं तच्चूर्णं दीपनं परम् ॥ १४३ ॥
हृत्पाण्डुग्रहणीदोषशोषप्लीहज्वरापहम् ।
वम्यतीसारशूलघ्नमूर्ध्ववातानुलोमनम् ॥ १४४ ॥
कल्पयेद्गुटिकाश्चैव चूर्णं पक्त्वा सितोपलैः ।
गुटिका ह्यग्निसंयोगाच्चूर्णाल्लघुतराः स्मृताः ॥ १४५ ॥

तालीसादि चूर्ण व गुटिका–तालीसपत्र, काळींमिरें, सुंठ व पिंपळी हीं उत्तरोत्तर क्रमानें १–२–३–४ अशा प्रमाणांत घ्यावीं. दालचिनी व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वेलचीदाणे अर्धा अर्धा भाग घ्यावे आणि पिंपळीच्या आठपट (म्हणजे ३२ भाग) खडीसाखर घ्यावी. या सर्वांचें एकत्र चूर्ण करून तें घेतलें असतां खोकला, दमा, अरुचि नाहींशीं होतात. उत्तम प्रकारें अग्नि दीपन होतें, हृद्रोग, पांडुरोग, संग्रहणी, क्षय प्लीहा, ताप, वांति, अतिसार व शूल हे विकार नाहींसे होऊन वायूचें अनुलोमन होतें. याच चूर्णाच्या खडीसाखरेच्या पाकांत गोळ्या करून घ्याव्या. अग्निसंयोगानें या चूर्णापेक्षां हलक्या होतात.

शुष्यते क्षीणमांसाय कल्पितानि विधानवित् ।
दद्यान्मांसादमांसानि बृंहणानि विशेषतः ॥ १४६ ॥
शोषिणे बर्हिणं दद्याद्बर्हिशब्देन चापरान् ।
गृध्रानुलूकाँश्चाषांश्च विधिवत्सूपकल्पितान् ॥ १४७ ॥
काकांस्तित्तिरिशब्देन वर्मिशब्देन चोरगान् ।
भृष्टान्मत्स्यान्त्रशब्देन दद्याद्गण्डूपदानपि ॥ १४८ ॥
लोमशान्स्थूलनकुलान्बिडालाँश्चोपकल्पितान् ।
शृगालशावाँश्च भिषक् शशशब्देनदापयेत् ॥ १४९ ॥
सिंहानृक्षाँस्तरक्षूंश्च व्याघ्रानेवंविधांस्तथा ।
मांसादान्मृगशब्देन दद्यान्मांसाभिवृद्धये ॥ १५० ॥
मांसेनोपचिताङ्गानां मासं मांसकरं परम् ।
तीक्ष्णोष्णलाघवाच्छस्तं विशेषान्मृगपक्षिणाम् ॥ १५१ ॥
मांसानि यान्यनभ्यासादनिष्टानि प्रयोजयेत् ।
तेषूपधा सुखं भोक्तुं तथा शक्यानि तानि हि ॥ १५२ ॥
जानञ्जुगुप्सन्नैवाद्याज्जग्धं वा पुनरुल्लिखेत् ।
तस्माच्छद्मोपसिद्धानि मांसान्येतानि दापयेत् ॥ १५३ ॥
बर्हितित्तिरिदक्षाणां हंसानां शूकरोष्ट्रयोः ।
खरगोमहिषाणाञ्च मांसं मांसकरं परम् ॥ १५४ ॥
योनिरष्टाविधा चोक्ता मांसानामान्नपानिके ।
तान्परीक्ष्य भिषग्विद्वान्दद्यान्मांसानि शोषिणे ॥ १५५ ॥
प्रसहा भूषयानूपवारिजा वारिचारिणः ।
आहारार्थं प्रदातव्या मात्रया वातशोषिणे ॥ १५६ ॥
प्रतुदा विष्किराश्चैव धन्वजाश्च मृगद्विजाः ।
कफपित्तपरीतानां प्रयोज्याः शोषरोगिणाम् ॥ १५७ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विधिवत्सूपसिद्धानि मनोज्ञानि मृदूनि च ।
रसवन्ति सुगन्धीनि मांसान्येतानि भक्षयेत् ॥ १५८ ॥

ज्या क्षयरोग्याचें मांस क्षीण होऊन जो अगदीं सुकत चालला असेल त्यांस मांसभक्षक जनावरांचीं मांसें जीं विशेषेंकरून पौष्टिक असतील त्यांचे नानाप्रकारचे खाद्य–पेय पदार्थ बनवून द्यावे. त्यास मोराचें ह्मणजे मोराच्या नांवानें गिधाड, घुबड व नीळकंठ पक्षांचें मांस उत्तम प्रकारें बनवून द्यावें. तित्तिराचें नांव सांगून कावळ्याचें मांस, वर्मि नांवाच्या एक जातीच्या नदींतील माशाच्या नांवानें सर्पाचें मांस आणि माशाचीं आंतडीं ह्मणून भाजलेले गांडोळ द्यावे. खेंकड, मुंगूस, मांजर व कोल्ह्याचीं बछडीं यांच्या मांसाचे, सशाचें मांस ह्मणून, अनेक तऱ्हेचे पदार्थ बनवून द्यावे. सिंह, अस्वल, तरस, वाघ व लांडगा वगैरे दुसऱ्या मांसाहारी पशूंचें मांस हरिणाचें मांस ह्मणून द्यावें. हत्ती, गेंडा व घोडा यांच्या मांसाचा खीमा करून त्यांत गूळ, तूप, पिंपळी, काळीं मिरें वगैरे मसाले टाकून त्याचे चांगले चांगले पदार्थ बनवून ते रेड्याचें मांस असें सांगून द्यावें. या मांसाच्या योगानें मांस वाढतें. मांस खाऊन पुष्ट झालेल्या जनावराचें अत्यंत मांस वाढविणारें असतें. त्यांतूनही पशु व पक्षी यांचें मांस तीक्ष्ण, उष्ण व हलकें असल्यामुळें विशेष प्रशस्त आहे. जें मांस खाण्याची रोग्यास संवय नसेल किंवा जें त्यास आवडत नसेल त्याची खोटीच प्रशंसा करून त्यावर त्याचें मन जाऊन तो तें खाईल असें करावें. खाण्यास दिलेलें मांस कावळा, कोल्हा, मांजर, सर्प, वगैरे घृणित जनावरांचें आहे असें रोग्यास समजल्यास त्यास वीट येऊन तो तें अगोदर खाणारच नाहीं. आणि कदाचित् जबरदस्तीनें खाल्लेंच तर तें ओकून पडेल. ह्मणून वर सांगितल्याप्रमाणें घृणित जनावरांचें मांस द्यावयाचें तें दुसऱ्या चांगल्या जनावरांच्या नांवानें द्यावें. मोर, तित्तिर, कोंबडा, हंस, डुक्कर, उंट, गाढव, गौ व रेडा यांचें मांस अतिशय मांसवर्धक आहे. सूत्रस्थानाच्या अन्नपानविधि नामक अध्यायांत मांसाच्या आठ जाति सांगि-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तऱ्या आहेत. त्यांपैकीं त्या त्या दोषाच्या अनुसार ज्या रोग्यास ज्या तऱ्हेचें मांस देणें योग्य असेल त्याचा विचार करून तें द्यावें जबरदस्तीनें आपलें भक्ष्य घेऊन खाणारीं, बिळांत राहणारीं, पाणथळ जागेंत रहाणारीं व पाण्यांत फिरणारीं अशा जनावरांचें मांस योग्य प्रमाणांत वातजन्य क्षयांत द्यावें; आणि चोंचीनें टोंचून आपलें भक्ष्य खाणारे, पायांनीं विखरून खाणारे, व जांगल पशुपक्षी यांचें मांस कफ-पित्तजन्य क्षयांत द्यावें. वरील मांसाचे नानाप्रकारचे रसभरित व सुगंधि पदार्थ बनवून खावे.

मांसमेवाश्नतः शोषे माध्वीकं पिबतोऽपि च ।
नियतानल्पचित्तस्यं चिरं काये न तिष्ठति ॥ १५९ ॥
वारुणीमण्डनित्यस्य बहिर्मार्जनसेविनः ।
अविधारितवेगस्य यक्ष्मा न लभतेऽन्तरम् ॥ १६० ॥
प्रसन्नां वारुणीं शीधुमरिष्टानासवान्मधु ।
यथार्हमनुपानार्थं पिबेन्मांसानि भक्षयेत् ॥ १६१ ॥
मद्यं तैक्ष्णौष्ण्यवैशद्यसूक्ष्मत्वात्स्रोतसां मुखम् ।
प्रमथ्य विवृणोत्याशु तन्मोक्षात्सप्त धातवः ।
पुष्यन्ति धातुपोषाच्च शीघ्रं शोषः प्रशाम्यति ॥ १६२ ॥
मांसादमांसस्वरसे सिद्धं सर्पिः प्रयोजयेत् ।
सक्षौद्रं पयसा सिद्धं सर्पिर्दशगुणेन वा ॥ १६३ ॥
सिद्धं मधुरकैर्द्रव्यैर्दशमूलकषायिकैः ।
क्षीरमांसरसोपेतं घृतं शोषहरं परम् ॥ १६४ ॥
पिप्पलीपिप्पलीमूलचव्यचित्रकनागरैः ।
सयावशूकैः सक्षीरैः स्रोतसां शोधनं घृतम् ॥ १६५ ॥
रास्नाबलागोक्षुरकं स्थिरा वर्षाभुसाधितम् ।
जीवन्तीपिप्पलीगर्भं सक्षीरं शोषनुद्घृतम् ॥ १६६ ॥
यवाग्वा वा पिबेन्मात्रां लिह्याद्वा मधुनासह ।
सिद्धानां सर्पिषामेषामद्यादन्नेन वा सह ॥ १६७ ॥
शुष्यतामेष निर्दिष्टो विधिराभ्यवहारिकः ।
बहिःस्पर्शनमाश्रित्य वक्ष्यतेऽतः परं विधिः ॥ १६८ ॥

जो क्षयरोगी वर सांगितल्याप्रमाणें केवळ मांसच खाऊन राहील व वर द्राक्षमद्याचें अनुपान ठेवील आणि मन शांत ठेवून चित्त उत्साहित ठेवील त्याच्या शरीरांत रोग फार दिवस राहणार नाहीं. अर्थात्

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लवकरच बरा होईल. सतत मद्य व त्यावरची साय सेवन करणें, बहिर्मार्जन ह्मणजे बाह्यशुद्धीचे उटणें, स्वेद, लेप, मर्दन वगैरे उपचार करणें, मल मूत्र-अधोवायु वगैरेंचे आलेले वेग न थांबविणें, या तीन गोष्टी जो करितो त्याच्या शरीरांत क्षयरोगास जागा मिळत नाहीं. क्षयरोग्यानें वर सांगितल्याप्रमाणें मांसभोजन करून वर प्रसन्ना, वारुणी, शीधु, अरिष्ट, आसव, द्राक्षामद्य यांपैकीं जें योग्य असेल तें मद्य प्यावें. मद्य तीक्ष्ण, उष्ण, स्वच्छ ( चिकट नव्हे तें ) व शरीरांतील अगदीं बारीक नाड्यांत देखील प्रवेश करूं शकण्याजोगें सूक्ष्म असल्यामुळें, तें धातुवाहक स्रोतसांचीं तोंडें जीं बंद झालेलीं असतात तीं तत्काल मोकळीं करितें व त्यांस पसरवितें. स्रोतसें मोकळीं झालीं कीं, लगेच त्यांतून धातु वाहूं लागतात. ह्मणजे धातूंस पोषण मिळूं लागतें. याप्रमाणें धातु पुष्ट झाले कीं क्षय लागलाच बरा होऊं लागतो. कारण स्रोतसें बंद होऊन धातूंस पोषण न मिळाल्यामुळेंच क्षयाची उत्पत्ति होते हें वर सांगितलेंच आहे क्षयावर मांसभक्षक जनावरांच्या सुरव्यांत तूप सिद्ध करून तें सेवन करावें. किंवा दसपट दुधांत सिद्ध केलेलें तूप मध मिळवून द्यावें. मधुर गणांतील औषधांचा कल्क, रानगांजादि दशमूळांचा काढा, दूध व मांसरस यांनीं तूप सिद्ध करून द्यावें. हें क्षयावर रामबाण आहे. पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक व सुंठ यांचा कल्क यवक्षार आणि दूध यांनीं तूप तयार करून तें घेतलें असतां बंद झालेलीं स्रोतसें शुद्ध होऊन मोकळीं होतात. स्रोतसें मोकळीं करण्याचा जो धर्म मद्यांत आहे तोच या तुपांत आहे. रास्ना, चिकणा, गोखरूं, रानगांजामूळ व पुनर्नवा यांच्या काढ्यांत जीवन्ती व पिंपळीचा कल्क आणि दूध मिळवून त्यांत तूप सिद्ध करावें. यापासून क्षय बरा होतो. वर सांगितलेलीं घृतें कण्हेरींतून द्यावीं, मधांतून चाटावीं, किंवा अन्नाबरोबर सेवन करावीं. येथपर्यंत क्षयरोग्यास पोटांत द्यावयाच्या औषधांचा प्रकार सांगितला. आतां बहिर्मार्जनविधि ह्मणजे उटणें, लेप, अभ्यंगादि बाह्य उपचार यांचें वर्णन करितों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्नेहक्षीरेऽम्बुकोष्ठे तं स्वभ्यक्तमवगाहयेत् ।
स्रोतोविबन्धमोक्षार्थं बलपुष्ट्यर्थमेव वा ॥ १६९ ॥
उत्तीर्णं मिश्रकैः स्नेहैः पुनरुक्तैः सुखैः करैः ।
मृद्गीयात्सुखमासीनं सुखश्चोत्सादयेन्नरम् ॥ १७० ॥
जीवन्तीं शतवीर्यांच विकसां सपुनर्नवाम् ।
अश्वगन्धामपामार्गं तर्कारीं मधुकं बलाम् ॥ १७१ ॥
विदारीं सर्षपं कुष्ठं तण्डुलानतसीफलम् ।
माषाँस्तिलाँश्च किण्वञ्च सर्वमेकत्र चूर्णयेत् ॥ १७२ ॥
त्रिगुणं यवचूर्णेन दध्नायुक्तं समाक्षिकम् ।
एतदुत्सादनं कार्यं पुष्टिवर्णबलप्रदम् ॥ १७३ ॥
गौरसर्षपकल्केन गन्धैश्चापि सुगन्धिभिः ।
स्नायादृतुसुखैस्तोयैर्जीवनीयौषधैः शृतैः ॥ १७४ ॥
गन्धैः समाल्यैर्वासोभिर्भूषणैश्च विभूषितः ।
स्पृयान्संस्पृश्य सम्पूज्य देवताः सभिषग्द्विजाः ॥ १७५ ॥
इष्टवर्णरसस्पर्शं गन्धवत्पानभोजनम् ।
इष्टमिष्टैरुपहितं सुखमद्यात्सुखप्रदम् ॥ १७६ ॥
समातीतानि धान्यानि कल्पनीयानि शुष्यताम् ।
लघूनि हीनवीर्याणि तानि पथ्यतमानि हि ॥ १७७ ॥
यच्चोपदेक्ष्यते पथ्यं क्षतक्षीणचिकित्सिते ।
यक्ष्मिणस्तत्प्रयोक्तव्यं बलमांसाभिवृद्धये ॥ १७८ ॥
अभ्यंगोत्सादनैः स्नानैरवगाहैर्विमार्जनैः ।
वस्तिभिः क्षीरसर्पिर्भिर्मांसैर्मांसरसौदनैः ॥ १७९ ॥
इष्टैर्मद्यैर्मनोज्ञानां गन्धानामुपसेवनैः ।
यथर्तुविहितैः स्नानैर्वासोभिरहतैः प्रियैः ॥ १८० ॥
सुहृदां रमणीयानां प्रमदानाञ्च दर्शनैः ।
गीतवादित्रशब्दैश्च प्रियश्रुतिभिरेव च ॥ १८१ ॥
हर्षणाश्वासनैर्नित्यं गुरूणां समुपासनैः ।
ब्रह्मचर्येण दानेन तपसा देवतार्चनैः ॥ १८२ ॥
सत्येनाचारयोगेन मंगलैरविहिंसया ।
वैद्यविप्रार्चनाच्चैव रोगराजोनिवर्तते ॥ १८३ ॥
यया प्रयुक्तया चेष्ट्या राजयक्ष्मा पुरा जितः ।
तां वेदविहितामिष्टिमारोग्यार्थी प्रयोजयेत् ॥ १८४ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रोग्याच्या अंगास तेलाची खूब मालिश करून स्नेह, दूध, किंवा पाण्याच्या टाकींत त्यास बसवून ठेवावें. यापासून सर्वांगाच्या शिरा मोकळ्या होऊन शक्ति व पुष्टि येते. टाकींतून बाहेर आल्यावर त्यास सुखानें बसवून मागें गुल्मचिकित्सेंत सांगितलेल्या मिश्रक स्नेहाची (तेल व तूप) हलक्या व नरम हातानें मालिश करावी आणि मालिश झाल्यावर अंगास उटणें चोळावें. जीवन्ती, शतावरी, मंजिष्ठ, घेटुळी, अस्कंध, आघाडा, ऐरणमूळ ( किंवा टांकळ्याचें बीज ), ज्येष्ठमध, चिकणा, भुईकोहळा, पांढऱ्या शिरसा, कोष्ठ, वावडिंग, अळशी, उडीद, तीळ व सुरावीज या सर्व जिनसा एकत्र करून त्यांचें चूर्ण करावें आणि यांत यांच्या तिप्पट जवांचें पीठ आणि दहीं व मध मिळवून सर्व एके ठिकाणीं कालवून याचें उटणें लावावें. यापासून शरीरास पुष्टि, कांति व शक्ति येते. पांढऱ्या शिरसांचा कल्क आणि गहुला, केशर, वगैरे सुगंधि पदार्थ अंगास लावून सूत्रस्थानाच्या ४ थ्या अध्यायांत सांगितलेलीं जीवनीय गणांतील औषधें टाकून तापविलेलें पाणी ऋतुमानाप्रमाणें थंड-कोमट किंवा गरम जसें सुखदायक होईल तसें करून त्यानें स्नान करावें. स्नान करून सुगंधि फुलांच्या माळा घालाव्या, चांगलीं शोभिवंत वस्त्रें धारण करावीं, अलंकार घालावे, मणिमुक्तादि स्पृश्य पदार्थांस स्पर्श करावा, देव, वैद्य, ब्राह्मण यांची पूजा करावी, आणि इष्ट-मित्रांसह सर्व प्रकारें प्रिय असणारे व हितकर खाद्य-पेय सेवन करावे. क्षय रोग्यास एक वर्षापेक्षां जुनीं धान्यें खावयास द्यावीं. तीं हलकीं व सौम्य ( ज्यांचें वीर्य मंद झालें आहे अशीं ) असल्यामुळें अत्यंत पथ्यकर असतात. शक्ति व मांस वाढण्याकरितां जे उपाय आम्हीं पुढें क्षतक्षीणचिकित्सेंत सांगणार आहों तेच क्षयरोग्यासही योजावे. औषधी तेलाची मालिश, उटणें, स्नान, औषधि पाण्यांत बसून राहणें, बाह्यशुद्धि बस्ति, दूध, औषधितूप, मांस, सुरवें व भात, इष्ट मद्य, मनोहर सुगंध, त्या त्या ऋतूंत सुखदायक स्नान, चांगलीं आवडतीं वस्त्रें, आप्त-इष्ट माणसें व रमणीय तरुण स्त्रियांचें दर्शन गाणें-बजावणें, पुत्रजन्म-विवाहा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दिकांसारखे शुभ व आनंददायक समाचार ऐकण्यांत येणे हर्षयुक्त असणें उत्साह असणें, वृद्धजनांची पूजा, ब्रह्मचर्य, दान, तप, देवतार्चन सत्य, सदाचार, मणि–मंगल प्रायश्चित्तादि दैवीचिकित्सा, अहिंसा आणि वैद्य व ब्राह्मणांची पूजा या सर्व उपायांनीं क्षयरोग बरा होतो. पूर्वीं जी यज्ञ–इष्टी केल्यानें क्षयरोग बरा झाला होता तीं अथर्ववेदविहित इष्टी आरोग्य इच्छिणाऱ्या मनुष्यानें करावी. ह्मणजे त्याचा क्षयरोग बरा होईल.

> प्रागुत्पत्तिनिमित्तानि प्राग्रूपं रूपसंग्रहः।
> समासव्यासतश्चोक्तं भेषजं राजयक्ष्मणः ॥ १८५ ॥
> नाम हेतुरसाध्यत्वं साध्यत्वं कृच्छ्रसाध्यता।
> इत्युक्त संग्रहः कृत्स्नो राजयक्ष्मचिकित्सिते ॥ १८६ ॥

क्षयरोगाची मूळ उत्पत्ति, कारणें, पूर्वरूप, लक्षणें, संक्षिप्त व सविस्तर चिकित्सा, पर्याय नांवें, तीं पडण्याचे हेतु, आणि साध्य, असाध्य व कृच्छ्रसाध्यता यांचा विचार, इतक्या विषयांचें विवेचन या राजयक्ष्मचिकित्सा नांवाच्या अध्यायांत केलें आहे.

अष्टमोऽध्यायः समाप्तः ॥ ७ ॥

---

# अथ नवमोऽध्यायः

> अथातोऽर्शश्चिकित्सितं व्याख्यास्यामः।
> इति ह स्माह भगवानात्रेयः ॥ १ ॥

आतां मूळव्याधीची चिकित्सा वर्णन करितों. आत्रेय ऋषि असेंच सांगते झाले.

> आसीनं मुनिमव्यग्रं कृतजप्यं कृतक्षणम्।
> पृष्टवानर्शसां युक्तिमग्निवेशः पुनर्वसूम् ॥ २ ॥
> प्रकोपहेतुसंस्थानं स्थानं लिंगं चिकित्सितम्।
> साध्यासाध्यविभागञ्च तस्मै तन्मुनिरब्रवीत ॥ ३ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

एकदां पुनर्वसु आत्रेयऋषि संध्योपासन, जपआदि आवश्यक नित्य कर्मे आटपून स्वस्थ बसले असतां त्यांस अग्निवेशानें मूळव्याधीची सम्प्राप्ति, कारणें, आकृति, स्थान, लक्षणें, चिकित्सा आणि साध्यासाध्यभेद या विषयांसंबंधानें प्रश्न केला. त्यावरून आत्रेय ऋषींनी त्याविषयीं निरूपण केलें.

इह खलु अग्निवेश द्विविधान्यर्शांसि सहजानि कानिचित्कानिचिज्जातस्योत्तरकालजानि । तत्र गुदवलिबीजोपतप्तिरायतनमर्शसां सहजानां। तत्र द्विविधो बीजोपतप्तौ हेतुर्मातापित्रोरपचारः पूर्वकृतश्च कर्म तथाऽन्येषामपि सहजानां विकाराणां। तत्र सहजानि सहजातानि शरीरेणार्शांसीत्यधिमांसविकाराः ॥ ४ ॥

हे अग्निवेश! मूळव्याध दोन प्रकारची असते. एक सहज ह्मणजे जन्मतः असणारी आणि दुसरी कालान्तरानें दोषप्रकोपापासून होणारी त्यांपैकीं सहज मूळव्याधीचें कारण आई-बापांच्या वीर्य-रक्ताच्या ज्या अंशापासून गुदद्वारांतील वळ्या बनतात त्या अंशांत मूळव्याधिजनक वातादिदोषांची विकृति असणें हें होय. याप्रमाणें बीजांत विकार उत्पन्न होण्याचीं दोन कारणें असतात. एक आईबापांचे अपथ्य अहार विहार आणि दुसरें पूर्वजन्मार्जित कर्म. जन्मतः असणाऱ्या एकंदर रोगांचीं हींच दोन कारणें असतात. सहज ह्मणजे जन्मापासून शरीराच्या उत्पत्तीबरोबरच झालेली आणि मूळव्याध ह्मणजे एक मांसवृद्धीचा रोग.

सर्वेषाञ्चार्शसां क्षेत्रं गुदस्यार्धपञ्चांगुलेऽवकाशे त्रिभागान्तरास्तिस्रो गुदवलयः क्षेत्रमिति देशःकेचित्तु भूयांसमेवं देशमुपदिशन्त्यर्शसां शिश्नमपत्यपथं गलमुखनासिकाकर्णाक्षिवर्त्मानि त्वक्च ॥ ५ ॥

मूळव्याध होण्याचें ठिकाणः—सर्व प्रकारच्या मूळव्याधि होण्याचें ठिकाण गुदाच्या साडेचार अंगुळाच्या सीमेंत दीड दीड अंगुळ प्रमाण

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

असणाऱ्या तीन वळ्या* हें होय. कित्येकांनीं शिश्न, योनि, गळा, तोंड, नाक, कान, पापण्या व त्वचा इतकीं अधिक स्थानें मानलीं आहेत.

तत्र सहजान्यर्शांसि कानिचिदणूनि कानिचिन्महान्ति कानिचिद्दीर्घाणि कानिचिद्ध्रस्वानि कानिचिद्वृत्तानिकानिचिद्विषमविसृतानि कानिचिदन्तःकुटिलानि कानिचिद्बहिः कुटिलानि कानिचिज्जटिलानि कानिचिदन्तर्मुखानि यथास्वं दोषानुबन्धवर्णानि ॥ ६ ॥

सहज मूळव्याधीची आकृतिः—लहान, मोठी, लांबट, आंखूड, वाटोळी, वांकडी पसरलेली, आंत वांकडी तिकडी झालेली, बाहेरच्या बाजूस वांकडी तिकडी गांठळलेली किंवा अंतर्मुख अशा प्रकारची असते. त्यांचे वर्णही त्यांतील दोषाधिक्यानुरूप असतात.

तैरुपहतो जन्मप्रभृति भवत्यतिकृशो विवर्णः क्षामो दीनः प्रचुरविबद्धवातमूत्रपुरीषः शार्करी चाश्मरी वा तथानियतविबद्धमुक्तपक्वामशुष्कभिन्नवर्चा अन्तरान्तराश्वेतपाण्डुहरितपीतरक्तारुणतनुसान्द्रपिच्छिलकुणपगन्धा मपुरीषोपवेशी नाभिबस्तिवंक्षणोद्देशे प्रचुरकर्तिकान्वितः सशूलगुदप्रवाहिकः परिहर्षप्रमेहप्रसक्तविष्टम्भान्त्रकूजोदावर्तहृदयेन्द्रियोपलेपः प्रचुरविवद्धतिक्ताम्लोद्गारः सुदुर्बलो दुर्बलाग्निरल्पशुक्रः क्रोधनो दुःखोपचारशीलः कासश्वासतमकतृष्णाहृल्लासछर्दिररोचकाविपाकपीनसक्षवथुपरीतस्तैमिरिकः शिरःशूली क्षामभिन्नसन्नसक्तजर्जरस्वरः कर्णरोगी सशुनपाणिपादवदनाक्षिकूटः सज्वरः साङ्गमर्दः सर्वपर्वास्थिशूली च अन्तरान्तरा पार्श्वकुक्षिबस्तिहृदयपृष्ठत्रिकग्रहोपतप्तः प्रध्यानपरः परमालसश्चेति जन्मप्रभृति अस्य गुदजैरावृतो मार्गोपरोधाद्वायुरपानप्रत्यारोहन्समानव्यान प्राणोदानान्पित्तश्लेष्माणौ च प्रकोपयति । ते प्रकुपिताः पञ्च वाताः पित्तश्लेष्माणौ चार्शसामभिद्रवन्ते एतान्विकारानुपजनयन्तीत्युक्तानि सहजान्यर्शांसि ॥ ७ ॥

---

१ या तीन वळ्यांचीं अर्थानुसार प्रवाहिणी, विसर्जनी व संवरणी अशीं नांवें आहेत. प्रवाहिणी वळी सर्वांच्या आंत असून ती मल आणण्याचें काम करिते. मधली विसर्जनी हिचें काम प्रवाहिणीनें आणलेला मळ बाहेर टाकून द्यावयाचा हें असतें. तिसरी संवरणी; ही गुदाच्या बाहेरच्या बाजूस असते ही गुदाच्या बाहेरच्या बाजूस असलेल्या मलाचें वेष्टन करिते.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

**सहज मूळव्याधीचें सामान्यरूपः**—ज्यास जन्मापासून मूळव्याध असते तो रोगी मुळापासून अतिशय रोड, निस्तेज, निरुत्साही व दीन असतो. त्यास कधीं कधीं मलमूत्र व अधोवायु यांचा अवरोध होतो. व कधीं हीं जास्त होतात. लध्वींतून रेंव जाते, मूतखडा होतो. तसेंच कधीं शौचास साफ होत नाहीं, कधीं होतें. कधीं मल पक्क होतो, कधीं आम असतो. कधीं मळ सुकून जातो, कधीं पातळ शौचास होतें. शौचाचा रंग पांढरा, फिकट, हिरवा, पिंवळा, लाल, किंवा पिंगट यांपैकीं बदलून बदलून असतो. मळ कधीं सडलेल्या प्रेताप्रमाणें दुर्गंधयुक्त व चिकट चिकट असतो. बेंबी, मूत्राशय व जांघाडे यांत कातरल्यासारखी फार पीडा होते. मुरडा होऊन जुलाब होतात. अंगावर शाहरे येतात, लध्वी फार होते, पोट फुगतें, पोटांत गुडगुडतें, मलमूत्रादिकांचा अवरोध, हृदयादि इंद्रियांच्या स्थानीं चिकटा बसतो, पुष्कळ पण अडखळत कडू किंवा आंबट ढेकर येतात, अतिशय अशक्तता असते, अग्नि मंद असतो, वीर्य थोडें असतें, स्वभाव रागीट व दुःखोपचारप्रिय असतो. खोकला, दमा, तमक श्वास, तहान, मळमळ, ओकारी, अरुचि, अपचन, पडसें, शिंका, या विकारांनीं पीडिलेला असतो. डोळ्यांपुढें काजवे येतात, डोकें दुखतें, शब्दोच्चार हलका, फुटका, खोल, जड, अडखळत व पिंजलेला असा होतो, कान दुखतो, हात, पाय, तोंड, डोळ्यांतील बुबळें सुजलेलीं असतात, अंग मोडणें, सगळे सांधे व हाडकें ठणकणें, बरगड्या, पोट, बस्ति, हृदय, पाठ व माकडहाड हीं जखडणें, हे विकार होतात; नेहमीं ध्यानस्थ असल्याप्रमाणें बसतो व अंगांत अति आळस असतो. जन्मापासून असलेल्या मोडांनीं गुदद्वार बंद झाल्यामुळें खालीं जाणाऱ्या अपानवायूस प्रतिबंध होऊन तो वर चढून समान, व्यान, प्राण व उदान हे चार प्रकारचे वायु आणि पित्त—कफ यांस कोपवितो. याप्रमाणें कुपित झालेले ते पांचही वायु आणि पित्त व कफ हे सर्वत्र पसरून वर सांगितलेले विकार उत्पन्न करितात. याप्रमाणें हें सहज मूळव्याधीविषयीं निरूपण केलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अत ऊर्ध्वं जातस्योत्तरकालजानि व्याख्यास्यामः ॥ गुरुमधुरशीताभिष्यन्दिविदाहिविरुद्धाजीर्णप्रमिताशनात्सात्म्यभोजनाद्गव्यमात्स्यवाराहमाहिषाजाविकपिशितभक्षणात्कृशशुष्कपूतिमांसपैष्टिकपरमान्नक्षीरमोदकदधितिलगुडविकृतिसेवनाच्च माषयूषेक्षुरसपिण्याकपिण्डालुकशुष्कशाकशुक्तलशुनकिलाटपिंडकबिसमृणालशालुकक्रौञ्चादनकशेरुकशृङ्गाटकतरुणविरूढनवधान्याममूलकोपयोगाद्गुरुफलशाकरागहरितवसाशिरस्पदपर्युषितपूतिशीतसंकीर्णान्नाभ्यवहरणान्मन्दकातिक्रांतमद्यपानाद्व्यापन्नगुरुसलिलपानादतिस्नेहपानादसंशोधनाद्बस्तिकर्मविभ्रमादव्यवायाद्दिवास्वप्नात्सुखशयनासनोपसेवनाच्चोपहताग्नेर्मलोपचयो भवत्यतिमात्रम् । अथोत्कटुकविषमकठिनासनसेवनादुद्भ्रांतयानोष्ट्रप्रयाणादतिव्यवायाद्बस्तिनेत्रासम्यक्प्रणिधानाद्गुदक्षणनादभीक्ष्णंशीताम्बुसंस्पर्शाचेललोष्ठतृणादिघर्षणात्प्रततातिनिबर्हणाद्वातमूत्रपूरीषवेगोदीरणात्समुदीर्णवेगविनिग्रहात्स्त्रीणांचामगर्भभ्रंशाद्गर्भोत्पीडनाद्बहुविषमप्रसूतिभिश्चप्रकुपितो वायुरपानस्तं मलमुपचितमधोगममासाद्य गुदवलिष्वाधत्ते ततस्तास्वर्शांसि प्रादुर्भवन्ति ॥ ८ ॥

**दोषज मूळव्याधीची सम्प्राप्तिः**—आतां जन्मल्यानंतर होणाऱ्या दोषजन्य मूळव्याधीविषयीं निरूपण करूं. जड, गोड, थंड, कफकारक, विदाह उत्पन्न करणारे पदार्थ खाणें, पूर्वीं सूत्रस्थानांत सांगितल्याप्रमाणें परस्पर विरुद्धधर्मीं पदार्थ एकत्र मिळवून खाणें, अपक्व अन्न खाणें किंवा अजीर्णावर जेवणें, फार थोडें खाणें, प्रकृतीस न मानणारे पदार्थ खाणें, गाय, मासे, डुकर, ह्मैस, बकरी, किंवा मेंढी यांचें मांस खाणें, रोडावलेल्या जनावरांचें वाळलेलें, किंवा सडकें मांस खाणें, पिठाचे पदार्थ, खीर, दूध, लाडू, दहीं, तीळ किंवा गुळाचे पदार्थ अतिशय खाणें, उडदाचें कढण, उंसाचा रस, तिळांची पेंड, कणग्या, (पेंडाळु) सुक्या भाज्या, शिरका, लसूण, खर्वस, रताळें (पांढरें), कमळांचे देंठ, व कंद, कमळकांकडी, कसरा व शिंगाडे, कोंवळें मोड

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आलेलें व नवें धान्य व कच्चे मुळे यांचा विशेष उपयोग करणें, जड फळें, भाज्या, रागषाडव, चटण्या–कोंशिबिरी, जनावरांची वसा, मुंडकें व पाय यांचें मांस, शिळें–सडकें–थंड व नानातऱ्हेचें भेसळ अन्न खाणें, मन्दक दहीं, अतिशय किंवा फार जुनें मद्य अथवा बिघडलेलें व जड पाणी यांचें सेवन करणें, तूप किंवा इतर स्निग्ध द्रव्य अतिशय पिणें, वेळच्यावेळीं वमनविरेचन वगैरे घेऊन शरीराची शुद्धि न करणें, बस्तिक्रियेंत बिघाड होणें बिलकुल स्त्रीसंग न करणें, दिवसा निजणें आणि नेहमीं चैनीनें बेफिकिर निजून किंवा बसून राहणें, या कारणांनीं अग्नि मंद होऊन त्यायोगानें अन्न बरोबर न पचतां त्याचा विशेषतः मळच होऊन तो अतिशय सांठतो. याशिवाय मूळव्याधीचीं दुसरीं कारणें अशीं आहेत कीं, उकिडवें, वांकडे तिकडें, दगड किंवा पाट वगैरेंसारख्या टणक आसनावर बसणें, बेफाम झालेल्या जनावराची स्वारी करणें, नेहमीं उंटावर बसणें, अतिशय स्त्रीसंभोग करणें, पिचकारीची नळी भलत्याच तऱ्हेनें आंत प्रविष्ट करणें, गुदद्वार खरचटणें, त्यास वरचेवर थंड पाण्याचा स्पर्श होणें, कपडा–ढेंकूळ–गवत वगैरेंनीं गुदद्वार घांसलें जाणें, शौचास बसलें असतां एकसारखें अतीशय कुंथणें, अधोवायु-मल-मूत्र इत्यादिक उपस्थित न झालीं असतां तीं बळेंच आणण्याचा यत्न करणें व आलीं असतां थांबविणें; तसेंच स्त्रियांचा कच्चा गर्भ पडणें, गर्भ अवदळणें, फार बाळंतपणें किंवा विकृत बाळंतपणें–या वरील सर्व कारणांनीं अपानवायु प्रकुपित होऊन तो सांचलेल्या मळाशीं मिळून त्यास खालीं आणून गुदद्वाराच्या ज्या वळ्या आहेत त्यांठिकाणीं ठेवितो अर्थात् त्यापासून त्या जागीं मूळव्याध उत्पन्न होते.

सर्षपमसूरमाषमुद्गमकुष्ठकयवकलायपिण्डीतकखर्जुरकर्कन्धुकाकणन्तिका–बिम्बीबदरकरीरोदुम्बरजाम्बवगोस्तनांगुष्ठकशेरुकशृङ्गाटकशृङ्गीदक्षशिखिशुकतुण्डजिह्वामुकुलकर्णिकासंस्थानानि सामान्याद्वातपित्तकफप्रबलानि ॥ ९ ॥

मूळव्याधीच्या सामान्य आकृति—शिरस, मसूर, उडीद, मूग, मठ, जव, वाटाणा, दुध्या, खजूर, लहान बोर, गुंज, तोंडलें, मोठें बोर,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बांबूचे कोंब, उंबराचें फळ, जांभूळ, द्राक्ष, आंगठा, कसरा, शिंगाडा, काकडशिंगी, कोंबडा, मोर व पोपट यांची चोंच व जीभ, फुलाची किंचित् फुललेली कळी किंवा कमळकोष याप्रमाणें असतात.

तेषामयं विशेषः । शुष्कम्लानकठिनपरुषरूक्षश्यावानि-तीक्ष्णाग्राणि वक्राणि स्फुटितमुखानि विषमविस्तृतानि शूलाक्षेपतोदस्फुरणचिमिचिमासंहर्षणापरीतानि स्निग्धो-ष्णोपशयानि प्रवाहिकाध्मानशिश्नवृषणबस्तिवङ्क्षणहृद्ग्र-हाङ्गमर्दप्रबलानि प्रततविबद्धवातमूत्रवर्चांसि कठिनवर्चां-स्यूरुकटीपृष्ठत्रिकपार्श्वकुक्षिबस्तिशूलाशिरोऽभितापक्षव-थुद्गारप्रतिश्यायकासोदावर्तायासशोषशोथमूर्च्छारोचक-मुखवैरस्यतैमिर्यकंडूनासाकर्णशंखशूलस्वरोपघातकराणि-श्यावारुणपरुषनखनयनवदनत्वङ्मूत्र-पुरीषस्य वातोल्ब-णान्यर्शांसीति विद्यात्॥ १० ॥

**वातजन्य मूळव्याधीचीं विशिष्ट लक्षणें**—आतां त्यांच्या दोषपरत्वें निर-निराळ्या आकृति सांगतों. सुकलेल्या, कोमेजलेल्या, घट्ट, खडबडीत, रूक्ष काळसर, दर्भांकुराप्रमाणें तीक्ष्ण टोंकांच्या, वांकड्यां पसरलेल्या अथवा उकललेल्या तोंडाच्या आणि वर—खालीं-तिरप्या अशा वांकड्या तिकड्या पसरलेल्या ज्या मूळव्याधि असतात त्या वातप्रधान समजाव्या. त्यांत ठणका आंचके, टोंचण, फुरफुरणें चिमचिमणें, व शिरशिरणें हीं लक्षणें होतात, यांचें स्निग्ध व उष्ण चिकित्सेनें शमन होतें. यांत अतिसार, पोटफुगी, शिश्न, वृषण, बस्ति, जांघाडे व हृदय यांचें जखडणें, अंग मोडणें व छाती धड-धडणें हे विकार होतात. नेहमीं अधोवायु, मल व मूत्र यांचा अवरोध, मळाचा खडा होणें, मांड्या, कमर, पाठ, माकडहाड, बरगड्या, पोट व बस्ति यांत शूल होणें, डोकें दुखणें, शिंका, ढेंकर, पडसें, खोकला, उदावर्त, थकवा, शोष, सूज, मूर्च्छा, अन्नावर अरुचि, तोंडाचा बेचवपणा, डोळ्यांपुढें काजवे येणें, खाज, नाक-कान-कानसिल, यांत ठणका व आवाज बसणें हेही विकार वातजन्य मूळव्याधींत होतात. याशिवाय नखें, डोळे, तोंड, चामडी, मूत्र व मल हीं खडबडीत होतात व त्यांचा रंग काळसर—पिंगट होतो. वरील लक्षणें ज्या मूळव्याधींत दिसतील ती वातप्रधान आहे असें समजावें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भवतश्चात्र.

कषायकटुतिक्तानि रूक्षशीतलघूनि च ।
प्रमिताल्पाशनं तीक्ष्णमद्यमैथुनसेवनम् ॥ ११ ॥
लंघनं देशकालौ च शीतौ व्यायामकर्म च ।
तीक्ष्णो वातातपस्पर्शो हेतुर्वातार्शसामिति ॥ १२ ॥

तुरट, तिखट, कडू, रूक्ष, थंड व हलकें असें अन्न खाणें, एकच प्रकारचे अगदीं थोडें अन्न खाणें, तीव्र मद्यपान करणें, अति मैथुन, लंघन, थंड देशकाल, व्यायाम आणि झोंबणारा वारा व ऊन्ह यांचा स्पर्श हीं वरील दोन श्लोकांत वातजन्य मूळव्याधीचीं थोडक्यांत कारणें सांगितलीं आहेत.

तत्र यानि मृदुशिथिलसुकुमाराण्यस्पर्शसहानि रक्तपीतनीलकृष्णानि स्वेदोपक्लेदबहुलानि विस्रगन्धीनि तनुपीतरक्तस्रावीणि दाहकण्डूशूलनिस्तोदपाकवन्ति शिशिरोपशयानि सम्भिन्नपीतहरितवर्चांसि पीतविस्रगन्धप्रचुरविण्मूत्राणि पिपासाज्वरतमकसंमोहभोजनद्वेषकराणि पीतनखनयनत्वंमूत्रपूरीषस्य पित्तोल्बणान्यर्शांसीति विद्यात् ॥ १३ ॥

पित्तज मूळव्याधीचीं लक्षणें—जी मूळव्याध शिरसाच्या फुलाप्रमाणें नरम, नाजुक, स्पर्श न सहन करूं शकणारी, तांबडी, पिंवळी, निळी किंवा काळ्या रंगाची अशी असेल, जी घामानें ओली असते, जी चिघळते, जिच्यांतून पातळ पिंवळसर रक्त वाहत असतें व जिच्या स्रावास कच्च्या मांसाप्रमाणें दुर्गंधि येते, जिच्यांत आग होते, खाज पडते, ठणका लागतो, टोंचण लागते, जी पिकते, जी थंड उपचारांनीं शांत होते, जींत पिंवळ्या हिरव्या रंगाचे जुलाब होतात, पिंवळ्या रंगाचे हिरवट मांसाप्रमाणें दुर्गंधीयुक्त व पुष्कळसें मल-मूत्र होतें, तहान लागते, ताप येतो, तमकश्वास लागतो, मूर्च्छा येते, जेवणाचा वीट येतो आणि जींत नखें डोळे चामडी मल व मूत्र यांचा रंग पिवळा होतो ती पित्तजन्य मूळव्याध असें समजावें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भवतश्चात्र.

कट्वम्ललवणक्षारव्यायामाग्न्यातपप्रभाः ।
देशकालावशिशिरौ क्रोधो मद्यमसूयनम् ॥ १४ ॥
विदाहितीक्ष्णमुष्णञ्च सर्वं पानान्नभेषजम् ।
पित्तोल्बणानां विज्ञेयः प्रकोपे हेतुरर्शसाम् ॥ १५ ॥

तिखट, आंबट, खारट पदार्थांचें सेवन, व्यायाम, विस्तव व उन्हाचा शेक, उष्ण देश—काल राग, मद्यपान द्वेष; विदाही, तीव्र व उष्ण अन्नपान आणि औषध हीं पित्तजन्य मूळव्याधीचीं मुख्य कारणें होत.

तत्र यानि प्रमाणवन्त्युपचितानि श्लक्ष्णानि स्पर्शसहानि श्वेतपाण्डुपिच्छिलानि स्तब्धानि गुरूणि स्तिमितानि सुप्तसुप्तानि स्थिरश्वयथूनि कण्डुवहुलानि प्रततपिञ्जरश्वेतरक्तपिच्छास्राविणि गुरुपिच्छिलेश्वेतमूत्रपुरीषाणि रूक्षोष्णोपशयानि प्रवाहिकातिमात्रोत्थानवंक्षणानाहवन्ति परिकर्तिका हृल्लासनिष्ठीविकाकासारोचकप्रतिश्याय गौरवछर्दिमूत्रकृच्छ्रशोषशोथपाण्डुरोगशीतज्वराश्मरी शर्कराहृदयेन्द्रियास्योपलेपास्यमाधुर्यप्रमेहकराणि दीर्घकालानुपशयान्यातिमात्रमग्निमार्दवक्लैब्यकराण्यामविकारप्रबलानि गुरूणि च शुक्लनखनयनवदनत्वङ्मूत्रपुरीषस्य श्लेष्मोल्बणान्यर्शांसीति विद्यात् ॥ १६ ॥

कफजन्य मूळव्याधीचीं लक्षणें—ज्या मूळव्याधीचे मोड मोठे, पुष्ट गुळगुळीत असतात; ज्यास स्पर्श केला असतां बरें वाटतें, ज्याचा रंग पांढरा किंवा फिक्कट असतो; जे बुळबुळीत, ताठ, जड, ओलसर व बधिर असतात; ज्यांत कायमची सूज असते व फार खाज सुटते ज्यांतून पिवळ्या-पांढऱ्या-तांबड्या रंगाचा बुळबुळीत असा पुष्कळ स्राव होत असतो; ज्या मुळव्याधींत मल-मूत्र जड, बुळबुळीत व पांढऱ्या रंगाचें असतें; ज्यांचें रूक्ष व उष्ण चिकित्सेनें शमन होतें, अतिसार, जांघाडे फुगणें, गुदद्वार—मूत्राशय—व नाभींत कातरल्यासारखी पीडा होणें, मळमळ, वरचेवर थुंकणें, खोकला, अरुचि, पडसें, अंग जड होणें, ओकारी, मूत्रकृच्छ्र, शोष, सूज, पांडुरोग, हिंवताप, मूतखडा, हृदय-इंद्रिय व तोंड यांत चिकटा, तोंड गुळमट होणें, प्रमेह हे विकार होतात, ज्या दीर्घकाल-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पर्यंत दुःख देतात; ज्यांत जठराग्नि अत्यंत मंद होतो, नपूंसकत्व येतें व आमविकारांचा जोर असतो, ज्या जड असतात आणि ज्यांत नखें, डोळे तोंड, त्वचा, मूत्र व मल यांचा रंग पांढरा होतो त्या कफजन्य मूळव्याधी समजाव्या.

मधुरस्निग्धशीतानि लवणाम्लगुरूणि च ।
अव्यायामदिवास्वप्नशय्यासनसुखे रतिः ॥ १७ ॥
प्राग्वातसेवा शीतौ च देशकालावचिन्तनम् ।
श्लैष्मिकाणां समुद्दिष्टमेतत्कारणमर्शसाम् ॥ १८ ॥

गोड, स्निग्ध, थंड, खारट, आंबट व जड पदार्थांचे अतिसेवन, शारीरिक श्रम न करणें, दिवसा निजणें, बिछान्यावर किंवा बैठकीवर पडून किंवा बसून राहणें, पूर्वेचा वारा, शीत, देश-काल व बेफिकिरी हीं कफजन्य मूळव्याधीचीं मुख्य मुख्य कारणें आहेत.

हेतुलक्षणसंसर्गाद्विद्याद्द्वन्द्वोल्बणानिच ।
सर्वो हेतुस्त्रिदोषाणां सहजैर्लक्षणैः समम् ॥ १९ ॥
विष्टम्भोऽन्नस्य दौर्बल्यं कुक्षेराटोप एवच ।
कार्श्यमुद्गारबाहुल्यं सक्थिसादोऽल्पविट्कता ॥ २० ॥
ग्रहणीदोषपांड्वार्तिराशंका चोदरस्य च ।
पूर्वरूपाणि निर्दिष्टान्यर्शसामभिवृद्धये ॥ २१ ॥
अर्शांसि खलु जायन्ते नासन्निपतितैस्त्रिभिः ।
दोषैर्दोषविशेषात्तु विशेषः कल्प्यतेऽर्शसाम् ॥ २२ ॥

दोन दोन दोष बिघडण्याचीं कारणें घडून त्या दोन्हीं दोषांपासून उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या मूळव्याधींचीं लक्षणें ज्या एका मूळव्याधींत आढळतील ती द्विदोषज आहे असें समजावें. त्रिदोषजन्य मूळव्याध सर्व कारणें घडून आल्यानें होते व त्यांत सहज ह्मणजे जन्मतः असलेल्या मूळव्याधीचीं सर्व लक्षणें होतात. मूळव्याधीचीं पूर्वरूपें-अन्नाचें अपचन, अशक्तता, पोट फुगणें, कृशता, फार ढेंकर येणें, मांड्या गळल्याप्रमाणें वाटणें, शौचास थोडें होणें, आणि संग्रहणी, पांडुरोग व उदररोगाचा भास होणें हीं लक्षणें होऊं लागलीं असतां पुढें मूळव्याध

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

होणार असें समजावें. मूळव्याध झाल्यानंतर हीं लक्षणें अधिक बळाव-तात तीन्हीं दोष मिळाल्यावाचून कोणतीही मूळव्याध उत्पन्नच होत नाहीं. अर्थात् एकंदर मूळव्याधींत तीन्हीं दोष बिघडलेले असतात. परंतु ज्यांत ज्या दोषाचा विशेष जोर असेल त्य दोषावरून वातजन्य, पित्त-जन्य अशीं नांवें त्यास देतात.

पञ्चात्मा मारुतः पित्तं कफो गुदवलित्रयम् ।
सर्व एव प्रकुप्यन्ति गुदजानां समुद्भवे ॥ २३ ॥
तस्मादर्शांसि दुःखानि बहुव्याधिकराणि च ।
सर्वदेहोपतापीनि प्रायः कृच्छ्रतमानि च ॥ २४ ॥

मूळव्याधींत प्राण—अपान—व्यान—उदान—समान हें पांचही प्रकारचे वायु पित्त, कफ व मलद्वारांतील तिन्हीं वळया हीं सर्व प्रकुपित होतात. ह्मणून मूळव्याध हा एक अति कष्टदायक, नानाप्रकारचे उपद्रव उत्पन्न करणारा व सर्व शरीरास क्लेश देणारा असा रोग आहे. बहुतेक मूळ-व्याधी कष्टसाध्य असतात.

हस्ते पादे गुदे नाभ्यां मुखे वृषणयोस्तथा ।
शोथो हृत्पार्श्वशूलश्च यस्यासाध्योऽर्शसो हि सः ॥ २५ ॥
हृत्पार्श्वशूलं सम्मोहश्छर्दिरङ्गस्य रुग्ज्वरः ।
तृष्णा गुदस्य पाकश्च निहन्युर्गुदजातुरम् ॥ २६ ॥
सहजानि त्रिदोषाणि यानिचाऽभ्यन्तरां वलिम् ।
जायन्तेऽर्शांसि संश्रित्य तान्यसाध्यानि निर्दिशेत् ॥ २७ ॥
शेषत्वादायुषस्तानि चतुष्पादसमन्विते ।
याप्यन्ते दीप्तकायाग्नेः प्रत्याख्येयान्यतोऽन्यथा ॥ २८ ॥
द्वन्द्वजानि द्वितीयायां वलौ यान्याश्रितानि च ।
कृच्छ्रसाध्यानि तान्याहुः परिसंवत्सराणि च ॥ २९ ॥
बाह्यायान्तु वलौ जातान्येकदोषोल्बणानि च ।
अर्शांसि सुखसाध्यानि न चिरोत्पतितानि च ॥ ३० ॥
तेषां प्रशमने यत्नमाशु कुर्याद्विचक्षणः ।
तान्याशु हि गुदं बुध्वा कुर्युर्बद्धगुदोदरम् ॥ ३१ ॥

**साध्यासाध्यादि विचार**—ज्या मूळव्याधींत हात, पाय, मलद्वार, बेंबी, तोंड व वृषण यांत सूज येते आणि हृदय व बरगड्या यांत शूल

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

होतो, ती असाध्य असें समजावें. ज्या मूळव्याधींत हृदय व बरगड्यांत शूळ होतो, मूर्च्छा येते, ओकाऱ्या येतात, अंगाला ठणका लागतो, ताप येतो, तहान लागते व मलद्वार पिकतें ती असाध्य समजावी. जन्मतः असलेली, त्रिदोषजन्य व मलद्वारांतील आंतल्या ( प्रवाहिणी ) वळीस झालेली ( मग ती एकदोषजन्य असो किंवा द्विदोषजन्य असो ) मूळव्याध असाध्य समजावी. जर रोग्याचें आयुष्य शिल्लक असेल, चिकित्सेचे चारही पाद ( वैद्य, रोगी, सेवक व औषध ) यथोचित असतील व रोग्याचा जठराग्नि प्रदीप्त असेल तर वरील तीन प्रकारच्या मूळव्याधीपासून रोगी मरत नाहीं. जोंपर्यंत त्याची चिकित्सा करावी तोंपर्यंत तो चांगला राहतो. ह्मणजे त्याची चिकित्सा केली असतां ती निष्फल जात नाहीं. परंतु वर सांगितल्याच्या उलट स्थिति असल्यास चिकित्साच करूं नये. द्विदोषज, मधल्या ( विसर्जनी ) वळीस झालेली व एका वर्षाच्या पलीकडची अशी जी मूळव्याध ती कष्टसाध्य समजावी. बाहेरच्या वळीवर झालेली एकदोषजन्य व वर्षाच्या आंतील मूळव्याध सुखसाध्य जाणावी. विचक्षण वैद्यानें तत्काल तिची चिकित्सा सुरू करून ती बरी करण्याचा यत्न करावा. उशीर लावल्यास तिच्या योगानें मलद्वार बंद होऊन बद्धगुदोदर रोग उत्पन्न होतो.

तत्राहुरेके शस्त्रेण कर्तनं हितमर्शसाम् ।
दाहं क्षारेण चाप्येके दाहमेके तथाग्निना ॥ ३२ ॥
अस्त्येतद्भूरितन्त्रेण धीमता दृष्टकर्मणा ।
क्रियते त्रिविधं कर्म भ्रंशस्तस्य सुदारुणः ॥ ३३ ॥
पुँस्त्वोपघातः श्वयथुर्गुदे वेगविनिग्रहः ।
आध्मानं दारुणं शूलं व्यथा रक्तातिवर्तनम् ॥ ३४ ॥
पुनर्विरोहो रूढानां क्लेदो भ्रंशो गुदस्य च ।
मरणं वा भवेच्छीघ्रं शस्त्रक्षाराग्निविभ्रमात् ॥ ३५ ॥
यत्तु कर्म सुखोपायमल्पभ्रंशमदारुणम् ।
तदर्शसां प्रवक्ष्यामि समूलानां निवृत्तये ॥ ३६ ॥

मूळव्याधींचे मोड शस्त्रानें कापून टाकले असतां ती नाहींशी होते असें शस्त्रवैद्यांचें मत आहे. कित्येकांच्या मतें क्षारानें मोड जाळून टाकणें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हें चांगलें आहे. कांहीं तर अग्नीनें डाग देणें हेंच चांगलें समजतात. परंतु ही तिन्ही प्रकारची चिकित्सा फक्त शास्त्रज्ञ, बुद्धिमान् व अनुभवी अशा शस्त्रवैद्यानेंच करणें योग्य आहे. कारण यांत यत्किंचत्‌ही प्रमाद झाल्यास त्यापासून नानाप्रकारचे भयंकर परिणाम होण्याचा संभव असतो. पुरुषत्वास धक्का बसणें, गुदद्वारास सूज येणें, मल-मूत्रास अटकाव होणें, पोट फुगणें, दारुण ठणका, ठुसठुस, अतिशय रक्तस्राव, मोड पुन्हां उद्भवणें, चिकटा, अंग ( मलद्वार ) बाहेर येणें, इतक्यावर थांबलें तर मिळविलीं, परंतु या चुकीच्या परिणामीं प्रसंगविशेषीं ताबडतोब मरणही येतें. सारांश वरील तीन प्रकारची चिकित्सा भयंकर व साधारण चिकित्सकांच्या निरुपयोगी आहे. ह्मणून सोप्या उपायानें होणारी, ज्यांत चुकून बिघाड होण्याची फारशी धास्ती नाहीं व जी भयंकर नाहीं अशी सर्वसाधारणोपयोगी असून मूळव्याध समूळ नाहींशी करणारी अशी चिकित्सा आह्मीं आतां सांगतों.

वातश्लेष्मोल्बणान्याहुः शुष्काण्यर्शांसि तद्विदः ।
प्रस्रावीणि तथार्द्राणि रक्तपित्तोल्बणानिच ॥ ३७ ॥
तत्र शुष्कार्षसां पूर्वं प्रवक्ष्यामि चिकित्सितम् ।
स्तब्धानि स्वेदयेत्पूर्वं शोफशूलान्वितानि च ॥ ३८ ॥
चित्रकक्षारबिल्वानां तैलेनाभ्यज्य बुद्धिमान् ।
यवमाषपुलाकानां कुलत्थानाञ्च पोट्टलैः ॥ ३९ ॥
गोखराश्वशकृत्पिण्डैस्तिलकल्कैस्तुषैरपि ।
वचाशताह्वापिण्डैर्वा सुखोष्णैः स्नेहसंयुतैः ॥ ४० ॥
शक्तूनां पिण्डिकाभिर्वा स्निग्धानां तैलसर्पिषा ।
शुष्कमूलकपिण्डैर्वा पिण्डैर्वा कार्ष्णगन्धिकैः ॥ ४१ ॥
रास्नापिण्डैः सुखोष्णैर्वा सस्नेहैर्हपुषैरपि ।
इष्टकस्य खराह्वायाः शाकैर्गृञ्जनकस्य च ।
अभ्यज्य कुष्ठतैलेन स्वेदयेत्पोट्टलीकृतैः ॥ ४२ ॥

मुळव्याधींत दोन प्रकार आहेत. एक कोरडी व दुसरी ओली अथवा रक्ती. सुकी मुळव्याध वात व कफ या दोन दोषांपासून होते आणि रक्तपित्ताच्या प्राबल्यानें ओली होते. ओलींतून रक्ताचा स्राव होतो. या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दोहोंपैकीं प्रथम कोरडया मुळव्याधीची चिकित्सा सांगतों. जे मोड ताठरलेले असून त्यांत सूज व ठणका असतो त्यांस प्रथम चित्रकमूळ, जवखार व बेलफळ यांनीं सिद्ध केलेलें तेल चोपडून जव, उडीद व कुळीथ यांच्या भुसाच्या पोटलीनें शेकावें. किंवा गाय, गाढव व घोडा यांच्या विष्टेचे गोळे करून त्यानें शेकावें. किंवा वांटलेल्या तिळांच्या गोळ्यानें अथवा तिळांच्या सालपटांनीं किंवा वेखंड व बाळंतशेपा यांचा गोळा करून त्यांत तेल-तूप मिळवून त्याचा सोसण्याजोग्या गरम गरम पुरचुंडीनें शेक द्यावा. किंवा तेलतुपाचें मोहन घालून केलेल्या सातूच्या पिठाच्या पोतंडीनें शेकावें. किंवा सुकलेल्या मुळ्याच्या, काळ्या शेवग्याच्या पाल्याच्या, रास्नेच्या किंवा खडशेरणीच्या स्निग्ध व सोसण्याजोग्या गरम गरम पोटलीनें शेक द्यावा. किंवा कोष्ठ घालून तयार केलेलें तेल मोडास चोपडून विटकर, अजमोदा व गाजरांची भाजी यांची स्निग्ध पुरचुंडी करून तिनें शेक द्यावा.

वृषार्कैरण्डबिल्वानां पत्रोत्क्वाथैश्च सेचयेत् ।
मूलकत्रिफलार्काणां वेणूनां वरुणस्य च ॥ ४३ ॥
अग्निमन्थस्य शिग्रोश्च पत्राण्यश्मन्तकस्य च ।
जलेनोत्क्वाथ्य शूलार्तं स्वभ्यक्तमवगाहयेत् ॥ ४४ ॥
कौलोत्क्वाथेऽथवा कोष्णे सौवीरकतुषोदके ।
बिल्वोत्क्वाथेऽथवा तक्रे दधिमण्डाम्लकाञ्जिके ॥ ४५ ॥
गोमूत्रे वा सुखोष्णे तं शूलार्तमुपवेशयेत् ।
कृष्णसर्पवराहोष्ट्रजतूकावृषदंशजाम् ॥ ४६ ॥
वसामभ्यञ्जनं कुर्याद्धूपनं चार्शसां हितम् ।
नृकेशाः सर्पनिर्मोको वृषदंशस्य चर्म च ।
अर्कमूलं शमीपत्रमर्शोऽभ्यो धूपनं हितम् ॥ ४७ ॥
तुम्बुरूणि विडङ्गानि देवदार्वक्षता घृतम् ।
बृहती चाश्वगन्धा च पिप्पल्यः सुरसाघृतम् ॥ ४८ ॥
वराहवृषविट्चैव धूपनं सक्तवो घृतम् ।
कुञ्जरस्य पुरीषन्तु घृतं सर्जरसो रसः ॥ ४९ ॥

सेचनप्रयोग—अडुळसा, रुई, एरंड व बेल यांच्या पानांचा काढा करून त्याचें सेचन करावें. किंवा मुळे, त्रिफळा, रुई, वेळू, वाय-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वरणा, ऐरण, शेवगा व आपटा यांच्या पानांचा काढा करून त्यांत, ज्याचे मोड ठणकत असतील अशा रोग्यास, प्रथम चांगलें तेल चोपडून बसवावें. किंवा बोरांच्या कोमट काढ्यांत, तुसासहित किंवा तूसरहित जवांच्या कांजींत, बेलाच्या पानांच्या काढ्यांत, ताकांत, दह्याच्या निवळींत, आंबट कांजींत, अथवा सोसण्याजोग्या गरम गरम गोमूत्रांत रोग्यास बसवावें. अभ्यङ्ग—काळा साप, डुक्कर, उंट, घुबड किंवा मांजर यांची वसा ( चरबी ) मोडास चोपडावी. धुरी—मनुष्याचे केंस, सापाची कात, मांजराची चामडी, रुईचें मूळ, शमीचीं पानें यांची मोडास धुरी देणें हितकर आहे. तिरफळें, वावडिंगें, देवदार, तांदुळ व तूप यांची; किंवा डोरली, अस्कंघ, पिंपळी, काळी तुळस व तूप यांची किंवा डुक्कर व बैलाची लीद, सातूचें पीठ व तूप यांची; किंवा हत्तींची लीद, तूप, राळ व शिलारस किंवा रसांजन यांची धुरी द्यावी.

हरिद्राचूर्णसंयुक्तं सुधाक्षीरप्रलेपनम् ।
गोपित्तपिष्टाः पिप्पल्यः सहरिद्रा प्रलेपनम् ॥ ५० ॥
शिरीषबीजं कुष्ठञ्च पिप्पल्यः सैन्धवं गुडः ।
अर्कक्षीरं सुधाक्षीरं त्रिफला च प्रलेपनम् ॥ ५१ ॥
पिप्पल्यश्चित्रकाः श्यामाः किण्वं मदनतण्डुलाः ।
प्रलेपः कुक्कुटशकृद्धरिद्रागुडसंयुतः ॥ ५२ ॥
निकुम्भः साम्रुतासङ्गः पारावतशकृद्गुडः ।
प्रलेपः स्याद्गजास्थीनि निम्बो भल्लातकानिच ॥ ५३ ॥
प्रलेपः स्यादलर्केण वासन्तकवसायुतः ।
शूलश्वयथुहृद्युक्तश्चुलूकीवसयाऽथवा ॥ ५४ ॥
आर्के पयः सुधाकाण्डं कटुकालाबुपल्लवाः ।
करञ्जो बस्तिमूत्रञ्च लेपनं श्रेष्ठमर्शसाम् ॥ ५५ ॥

**मोडांवर लेप.**—१ तिधारी निवडुंगाच्या चिकांत हळदीची पूड मिळवून त्याचा मोडास लेप द्यावा. २ गोरोचन पिंपळी व हळद यांचा वांटून लेप द्यावा. ३ शिरसाचें बीं, कोष्ठ, पिंपळी, सैंधव, गूळ, रुईचा व तिधारी निवडुंगाचा चीक आणि त्रिफळा यांचा लेप द्यावा. ४ कोंबपिंपळी, चित्रकमूळ, निशोत्तरमूळ, सुराबीज, गेळफळांतील बीं,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ड्याची शीट, हळद व गूळ या सर्व जिनसांचा लेप लावावा. ५ दंती-मूळ, मोरचूत, पारव्याची शीट व गूळ यांचा लेप द्यावा. ६ हत्तीचें हाड, कडूनिंब व बिब्बा यांचा लेप द्यावा. ७ किंवा उंट अथवा गोधा-माशाच्या चरबींतून रुईमांदाराच्या चिकाचा लेप द्यावा; यांच्या योगानें ठणका व सूज नाहींशी होतात. रुईचा चीक, तिधारी निवडुंगाचें कांडें, कडू दुध्या भोंपळ्याचीं पानें व करंजाच्या बिया हीं सर्व बोकडाच्या मुतांत वांटून त्याचा लेप लावावा. हा उत्तम लेप आहे.

अभ्यङ्गाद्याः प्रदेहान्ता य एते परिकीर्तिताः ।
स्तम्भश्वयथुकण्डूवार्तिशमनास्तेऽर्शसां मताः ॥ ५६ ॥
प्रदेहान्तैरुपक्रान्तान्यर्शांसि प्रस्रवन्ति हि ।
सञ्चितं दुष्टरुधिरं ततः सम्पद्यते सुखम् ॥ ५७ ॥
शीतोष्णस्निग्धरूक्षैर्हि न व्याधिरुपशाम्यति ।
रक्ते दुष्टे भिषक्तस्माद्रक्तमेवावसेचयेत् ॥ ५८ ॥
जलौकाभिस्थता शस्त्रैः सूचिंभिर्वा पुनः पुनः ।
अवर्तमानं रुधिरं रक्तार्शोभ्यः प्रवाहयेत् ॥ ५९ ॥

वर अभ्यंगापासून लेपापर्यंत जे प्रयोग सांगितले ते केल्यानें मोडाचा ताठरपणा, सूज, खाज व ठणका हीं बंद होतात. या उपायांनीं बिघडून सांचलेलें रक्त वाहून जातें व त्यामुळें बरें वाटतें. जोपर्यंत नासलेलें रक्त मुळव्याधींत कायम आहे तोंपर्यंत थंड–गरम, स्निग्ध-रूक्ष-कोणत्याही तऱ्हेची चिकित्सा केल्यानें त्यापासून रोगाची शांति होत नाहीं. ह्मणून वैद्यानें रक्त काढवावें. जर मोड कठिण असल्यामुळें वरील उपायांनीं रक्तस्राव होत नसेल तर जळवा लावून, शस्त्रानें किंवा सुईनें पुनः पुनः त्यांतून रक्त काढवावें.

गुदश्वयथुशूलार्तं मन्दाग्निं पाययेत्तु तम् ।
त्र्यूषणं पिप्पलीमूलं पाठां हिङ्गु सचित्रकम् ॥ ६० ॥
सौवर्चलं पुष्कराख्यमजाजीं बिल्वपेषिकाम् ।
बिडं यमानीं हपुषां विडङ्गं सैन्धवं वचाम् ॥ ६१ ॥
तिन्तिडीकञ्च मण्डेन मद्येनोष्णोदकेन च ।
तथार्शोग्रहणीदोषशूलानाहाद्विमुच्यते ॥ ६२ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कुर्याद्वा पाचनं तस्य यदुक्तं ह्यातिसारिके ।
सगुडामभयां वाऽथ प्राशयेत्पौर्वभक्तिकीम् ॥ ६३ ॥
पाययेत त्रिवृच्चूर्णं त्रिफलाया रसेन वा ।
हृते गुदाश्रये दोषे गच्छन्त्यर्शांसि सङ्क्षयम् ॥ ६४ ॥
गोमूत्राध्युषितां दद्यात्सगुडां वा हरीतकीम् ।
हरीतकीं तक्रयुतां त्रिफलां वा प्रयोजयेत् ॥ ६५ ॥
सनागरं चित्रकं वा शीधुयुक्तं प्रयोजयेत् ।
चव्यं वा शीधुसंयुक्तमजाजीदीप्यकं पिबेत् ॥ ६६ ॥
सुरां वा हपुषां पाठां युक्तां सौवर्चलायुताम् ।
दधित्थबिल्वसंयुक्तं तथा वा चव्यचित्रकौ ॥ ६७ ॥
भल्लातकयुतं वाऽथ प्रदद्यात्तत्र तर्पणम् ।
बिल्वनागरयुक्तं वा यमान्या चित्रकेण वा ॥ ६८ ॥
चित्रकं हपुषां हिङ्गु दद्याद्वा तक्रसंयुताम् ।
पञ्चकोलयुतं वापि तक्रमस्मै प्रदापयेत् ॥ ६९ ॥

मळद्वारांत सूज व ठणका असेल आणि अग्नि मंद असेल तर रोग्यास सुंठ, मिरें, पिंपळी, पिंपळमूळ, पहाडमूळ, हिंग, चित्रकमूळ, संचळ, पुष्कर-मूळ, जिरें, वाळलेलें बेलफळ, बिडलोण, ओवा, शेरणी, वावडिंग, सैंधव, वेखंड व चिंच या जिनसांचें चूर्ण मंड, मद्य किंवा ऊन पाण्याबरोबर घ्यावें. यापासून मूळव्याध, संग्रहणी व मलमूत्रावरोध हे विकार नाहींसे होतात. किंवा अतिसारचिकित्सेंत सांगितलेल्या पाचक औषधांचा उपयोग करावा. जेवणाच्या पूर्वीं गुळांतून हिरड्याचें चूर्ण खावयास द्यावें. किंवा निशोत्तराचें चूर्ण त्रिफळ्याच्या काढ्यांतून घ्यावें. यापासून रेचनद्वारा मलद्वारांतील दोष नाहींसे होऊन मूळव्याध बरी होत जाते. रात्रीं हिरडे गो-मूत्रांत भिजत घालून ठेवून दुसरे दिवशीं सकाळीं ते गुळाबरोबर खावे. किंवा ताकांतून हिरड्याचें अथवा त्रिफळ्याचें चूर्ण घ्यावें किंवा सुंठ व चित्रक-मूळ अथवा चवक, जिरें व ओंवा हीं उंसाच्या रसाच्या मद्यांतून द्यावीं. शेरणी व पहाडमूळ यांचें चूर्ण संचळ मिळवून मद्यांतून घ्यावें. कवठ व वालबेलफळ यांचें चूर्ण अथवा चवक व चित्रक यांचें चूर्ण, जवांच्या सातूंचें पीठ ताकांत भिजवून त्यांतून द्यावें. किंवा बिबामिश्रित ताक-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सातू द्यावे. बेलफळ व सुंठ; ओंवा, किंवा चित्रक यांचें चूर्ण ताकांतून प्यावें. अथवा चित्रकमूळ, शेरणी व हिंग यांचें चूर्ण ताकांतून द्यावें. किंवा पिंपळी, पिंपळीमूळ, चवक व सुंठ, यांचें चूर्ण ताकांतून प्यावें.

हपुषां कुञ्चिकां धान्यमजाजीं कारवीं शटीम् ।
पिप्पली पिप्पलीमूलं चित्रकं हस्तिपिप्पलीम् ॥ ७० ॥
यमानीञ्चाजमोदाञ्च चूर्णितं तक्रसंयुतम् ।
मन्दाम्लकटुकं विद्वान्स्थापयेद्घृतभाजने ॥ ७१ ॥
व्यक्ताम्लकटुकं जातं तक्रारिष्टं मुखप्रियम् ।
प्रपिबेन्मात्रया कालेष्वन्नस्य तृषितस्त्रिषु ॥ ७२ ॥
दीपनं रोचनं वर्ण्यं कफवातानुलोमनम् ।
गुदश्वयथुकण्ड्वार्तिनाशनं बलवर्धनम् ॥ ७३ ॥

तक्रारिष्ट—शेरणी, मेथी, धने, जिरें, बडीशोप, कचोरा, पिंपळी, पिंपळीमूळ, चित्रकमूळ, गजपिंपळीं, ओंवा व अजमोदा हीं सर्व औषधें समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करून तें ताकांत मिळवावें. या सर्व मिश्रणाचा स्वाद किंचित् आंबट तिखट असतो. अशा स्थितींत वैद्यानें तें मिश्रण एका तुपानें रावलेल्या मडक्यांत भरून ठेवावें. कांहीं दिवसांनीं तें चांगलें चणचणीत आंबट–तिखट व रुचकर होईल. त्यावेळीं अरिष्ट तयार झालें असें समजून तें जेवतांना तिन्ही वेळीं तहान लागली असतां पाण्याच्या ऐवजीं योग्य प्रमाणानें प्यावें. हे दीपक, रुचकर, शरीरास तजेला आणणारें कफ-वाताचें अनुलोमन करणारें, मळद्वारांतील सूज, खाज व ठणका नाहींसा करणारें व शक्तिवर्धक आहे.

त्वचं चित्रकमूलस्य पिष्ट्वा कुम्भं प्रलेपयेत् ।
तक्रं वा दधि वा तत्र जातमर्शोहरं पिबेत् ॥ ७४ ॥
वातश्लेष्मार्शसां तक्रात्परं नास्तीह भेषजम् ।
तत्प्रयोज्यं यथादोषं सस्नेहं रूक्षमेव वा ॥ ७५ ॥
सप्ताहं वा दशाहं वा पक्षं मासमथापि वा ।
बलकालविशेषज्ञो भिषक्तक्रं प्रयोजयेत् ॥ ७६ ॥
अत्यर्थं मृदुकायाग्नेस्तक्रमेवावचारयेत् ।
सायं वा लाजसक्तूनां दद्यात्तक्रावलेहिकाम् ॥ ७७ ॥
जीर्णे तक्रे प्रदद्याद्वा तक्रं पेयां ससैन्धवाम् ।

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तक्रानुपानं सस्नेहं तक्रौदनमतः परम् ॥ ७८ ॥
यूषैर्मांसरसैर्वापि भोजयेत्तक्रसंयुतैः ।
कालक्रमज्ञः सहसा न च तक्रं निवारयेत् ॥ ७९ ॥
तक्रप्रयोगान्मासान्ते क्रमेणोपशमो मतः ॥ ८० ॥
अपकर्षो यथोत्कर्षो न त्वन्नादपकृष्यते ।
शक्त्यागमनरक्षार्थं दार्ढ्यार्थमनलस्यच ॥ ८१ ॥
बलोपचयवर्णार्थमेष निर्दिश्यते क्रमः ।
रूक्षमर्धोद्धृतस्नेहं यतश्चानुद्धृतं घृतम् ॥ ८२ ॥
तक्रं दोषाग्निबलवित्त्रिविधं तत्प्रयोजयेत् ।
हतानि न विरोहन्ति तक्रेण गुदजानि तु ॥ ८३ ॥
भूमावपि निषिक्तं तद्दहेत्तक्रं तृणोलुपम् ।
किम्पुनर्दीप्तकायाग्नेः शुष्काण्यर्शांसि देहिनः ॥ ८४ ॥
स्रोतस्सु तक्रशुद्धेषु रसः सम्यगुपैति यः ।
तेन पुष्टिर्बलं वर्णः प्रहर्षश्चोपजायते ॥ ८५ ॥
वातश्लेष्मविकाराणां शतञ्चापि निवर्तते ।
नास्ति तक्रात्परं किञ्चिदौषधं कफवातजे ॥ ८६ ॥

चित्रकमुळाची साल वांटून ती मडक्यास आंतल्या बाजूनें लिंपावी. आणि त्यांत दूध विरजून त्यापासून झालेलें दहीं किंवा त्याचें ताक प्यावें. यापासून मूळव्याध बरी होते. वात-कफजन्य मूळव्याधीवर तर ताकापेक्षां चांगलें औषधच नाहीं. तें दोषानुसार स्निग्ध किंवा रूक्ष द्यावें. ह्मणजे वातजन्य मूळव्याधीवर स्निग्ध अर्थात लोणी न काढलेलें व कफजन्य मूळव्याधीवर रूक्ष ह्मणजे लोणी काढलेलें ताक द्यावें. ताक द्यावयाचें तें वैद्यानें रोग व रोग्याची शक्ति आणि ऋतु यांचा विचार करून सात दिवस, दहा दिवस, पंधरवडा किंवा एक महिन्यापर्यंत देत असावें. ज्यांचा जठराग्नि फारच मंदावलेला असेल त्यास वैद्यानें अन्न न देतां नुस्त्या ताकावरच ठेवावें. जर अन्नावांचून नुसतें ताक त्याच्यानें पिववत नसेल तर संध्याकाळच्या वेळीं लाह्यांचे पिठाची ताकांत लापशी करून द्यावी. किंवा ताक जिरूं लागलें ह्मणजे सैंधव टाकून केलेली ताकाची कण्हेरी द्यावी. नंतर किंचित् स्नेहमिश्रित ताकभात खावयास

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

द्यावा व त्यावर प्यावयास ताक द्यावें. किंवा पुष्कळसें ताकमिश्रित कढण, अथवा मांसरसाबरोबर भात खावा. कालमान जाणणाऱ्या वैद्यानें एकदम ताक बंद करूं नये. तर थोडें थोडें कमी करीत सोडावें. ताकाचें क्रमशः एक महिनापर्यंत सेवन केल्यानें मूळव्याध बरी होते. ज्या क्रमानें एक महिनापर्यंत ताक वाढवावयाचें, त्याच क्रमानें तें कमी करीत यावें. अन्न कमी करण्याचें कारण नाहीं. या पद्धतीनें ताकाचें सेवन केल्यापासून शक्ति येते, आलेली शक्ति कायम राहते, अग्नि दृढ राहतो, आणि बल पुष्टि व तजेला येतात. ताकाचे तीन प्रकार आहेत. एक रूक्ष ह्मणजे ज्यांतून सर्व लोण्याचा अंश काढलेला आहे असें. दुसरें अर्धोद्धृतस्नेह ह्मणजे ज्यांतून अर्धवट लोणी काढलें आहे असें. व तिसरें अनुद्धृतस्नेह ह्मणजे लोणी न काढलेलें. या तीन प्रकारच्या ताकांचा दोष व अग्नि यांच्या बलाबलाचा विचार करून उपयोग करावा. ताकाच्या सेवनानें बरी झालेली मूळव्याध पुन्हां उद्भवत नाहीं. जमिनीवर ताक सांडलें असतां त्या ठिकाणचें गवत जळून जातें अर्थात् पुन्हां उत्पन्न होत नाहीं. मग ज्याचा जठराग्नि प्रदीप्त आहे अशा रोग्याची कोरडी मूळव्याध नाहींशी करून टाकल्यास यांत आश्चर्य काय? वातकफ दोषानें भरून गेलेलीं स्रोतसें ताकानें शुद्ध—मोकळीं—झालीं ह्मणजे आहाररस धातूंस बरोबर पोंचतो व धातूंस पोषण मिळाल्यानें अर्थात्च शरीर पुष्ट होतें, शक्ति येते, अंगावर तजेला येतो व उत्साह वाढतो आणि वाताचे ८० व कफाचे २० मिळून एकंदर शंभर विकार नाहींसे होतात. ह्मणून ह्मटलें आहे कीं वातकफजन्य मूळव्याधीवर ताकासारखें दुसरें रामबाण औषध नाहीं.

पिप्पलीपिप्पलीमूलं चित्रकं हस्तिपिप्पलीम् ।
शृङ्गवेरमजाजीं च कारवीं धान्यतुम्बुरुम् ॥ ८७ ॥
बिल्वं कर्कटकं पाठां पिष्ट्वा पेयां विपाचयेत् ।
फलाम्लां यमकस्नेहां तां दद्याद्गुदजापहाम् ॥ ८८ ॥
एतैश्चैव खडं कुर्यादेतैश्चैव पचेज्जलम् ।
एतैश्चैव घृतं साध्यमर्शसां विनिवृत्तये ॥ ८९ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शटीपलाशसिद्धां वा पिप्पल्या नागरेण वा ।
दद्याद्यवागूं तक्राम्लां मरिचैरवचूर्णिताम् ॥ ९० ॥
शुष्कमूलकयूषं वा यूषं कौलत्थमेव वा ।
दधित्थबिल्वयूषं वा सकुलत्थमकुष्ठकम् ॥ ९१ ॥
छागलं वा रसं दद्याद्यूषैरेतैर्विमिश्रितम् ।
लावादीनां फलाम्लं वा सतक्रं ग्राहिभिर्युतम् ॥ ९२ ॥
रक्तशालिर्महाशालिः कलमो जांगलः सितः ।
शारदः षष्टिकश्चैव स्यादन्नविधिरर्शसाम् ॥ ९३ ॥
इत्युक्तो भिन्नशकृतामर्शसां च विधिक्रमः ।
येऽत्यर्थं गाढशकृतस्तेषां वक्ष्यामि भेषजम् ॥ ९४ ॥

पिंपळी, पिंपळमूळ, चित्रक, गजपिंपळी, सुंठ, जिरें, अजमोदा, धने, तिरफळ, बेलफळाचा गर, काकडशिंगी व पहाडमूळ हीं द्रव्यें वांटून पेजेंत मिळवून तीं शिजवावीं व महाळुंग वगैरेंची आंबटाण व तेल-तूप मिश्रण हीं त्यांत मिळवून ती घेतल्यानें मूळव्याध नाहींशी होते. हींच द्रव्यें मिळवून त्यांचें खडयूष ( कढण ) करावें, व हींच टाकून पाणीही कढवून द्यावें. तसेंच या द्रव्यांनीं तूप सिद्ध करून तें सेवन करावें. या सर्व उपयांनीं मूळव्याध बरी होते. कचोरा व पळस किंवा पिंपळी व सुंठ हीं द्रव्यें टाकून कण्हेरी तयार करावी व त्यांत आंबट-पणाकरितां ताक मिळवून व मिऱ्याची पूड टाकून ती द्यावी. वाळलेल्या मुळ्यांचें कढण, कुळथांचें कढण, कवठ व बेलफळाचें कढण किंवा कुळीथ व मठ यांचें कढण द्यावें. किंवा हीं कढणें बकऱ्याच्या मांसा-च्या सुरव्याबरोबर मिळवून द्यावीं. किंवा लावा वगैरे पक्ष्यांच्या मांस-रसाबरोबर महाळुंग वगैरे आंबट फळांचा रस, ताक व संग्राहक ( जुलाब बंद करणारीं ) औषधें मिळवून वरील कढणें द्यावीं. तांबडया साळी, मोठ्या साळी, कलम, जाङ्गल, पांढऱ्यासाळी, शारदी व साठेतांदूळ हीं धान्यें मूळव्याधीच्या रोग्यास द्यावीं. ज्या मूळव्याधीच्या रोग्यास जुलाबाप्रमाणें पातळ शौचास होतें त्याचा चिकित्साक्रम येथपर्यंत सांगि-तला. आतां ज्यांच्या मळाचा फार कठिण खडा होतो त्याची चिकित्सा सांगतों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सस्नेहैः सक्तुभिर्युक्तां प्रसन्नां लवणीकृताम् ।
दद्यान्मत्स्यण्डिकां पूर्वं भक्षयित्वा सनागराम् ॥ ९५ ॥
गुडं सनागरं पाठां फलाम्लं पाययेच्च तम् ।
गुडं घृतं यवक्षारं युक्तं वापि प्रयोजयेत् ॥ ९६ ॥
यमानीं नागरं पाठां दाडिमस्य रसं गुडं ।
सतक्रं लवणं दद्याद्वातवर्चोऽनुलोमनं ॥ ९७ ॥
दुःस्पर्शकेन बिल्वेन यमान्या नागरेण वा ।
एकैकेनापि संयुक्ता पाठा हन्त्यर्शसां रुजं ॥ ९८ ॥
प्राग्भक्तान् यमके भ्रष्टान् सक्तुभिश्चावचूर्णितान् ।
करञ्जपल्लवान् दद्याद्वातवर्चोनुलोमनान् ॥ ९९ ॥
मदिरां वा सलवणां शीधुं सौवीरकं तथा ।
गुडनागरसंयुक्तं पिबेद्वा पौर्वभक्तिकम् ॥ १०० ॥

प्रथम सुंठीचें चूर्ण व खडीसाखर मिळवून खाऊन त्यावर तूप, सातूचें पीठ व सैंधव मीठ हीं तीन द्रव्यें त्यांत मिळवून सुरामंड प्यावें किंवा गूळ, सुंठ, पहाडमूळ व अम्लवेतस यांचा काढा करून प्यावा किंवा गूळ, तूप व जवखार हीं मिळवून घ्यावीं. ओंवा सुंठ, पहाडमूळ, डाळिंबाचा रस व गूळ यांचा काढा करून त्यांत ताक व सैंधव मिळवून तो दिला असतां अधोवायु व मलाचें अनुलोमन होतें अर्थात् वारा साफ असतो व मोकळें शौचास होतें. घमासा, बेलफळाचा गर, ओंवा व सुंठ हीं सर्व औषधें, किंवा यांपैकीं तीन, दोन, अथवा निदान एक औषधाचा पहाडमुळाबरोबर काढा करून घेतला असतां मूळव्याध बरी होते. प्रथम करंजाचीं पानें. तेल-तुपाच्या मिश्रणांत परतून त्यांत सातूचें पीठ मिळवून तीं खावीं आणि वर जेवावें ह्मणजे अधोवायु व मलाचें अनुलोमन होतें किंवा सैंधवमिश्रित मदिरा, अथवा गूळ व सुंठमिश्रित शीधु किंवा सौवीरक अगोदर पिऊन वर भोजन करावें.

पिप्पलीनागरक्षारकारवीधान्यजीरकैः ।
फाणितेन च संयोज्य फलाम्लं दापयद्घृतम् ॥ १०१ ॥
पिप्पलीपिप्पलीमूलं चित्रको हस्तिपिप्पली ।
शृंगवेरं यवाक्षारं तैः सिद्धं वा पिबेद्घृतम् ॥ १०२ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चव्यचित्रकसिद्धं वा गुडक्षारसमन्वितम् ।
पिप्पलीमूलसिद्धं वा सगुडक्षारनागरम् ॥ १०३ ॥
पिप्पलीपिप्पलीमूलदधिदाडिमधान्यकैः ।
सिद्धं सर्पिर्विधातव्यं वातवर्चोविबन्धनुत् ॥ १०४ ॥
चव्यं त्रिकटुकं पाठां क्षारं कुस्तुम्बुरूणि च ।
यमानीं पिप्पलीमूलमुभे च बिडसैन्धवे ॥ १०५ ॥
चित्रकं बिल्वमभयां पिष्ट्वा सर्पिर्विपाचयेत् ।
शकृद्वातानुलोम्यार्थं जाते दध्नि चतुर्गुणे ॥ १०६ ॥
प्रवाहिकां गुदभ्रंशं मूत्रकृच्छ्रं परिस्रवम् ।
गुदवंक्षणशूलं च घृतमेतद्व्यपोहति ॥ १०७ ॥
नागरं पिप्पलीमूलं चित्रको हस्तिपिप्पली ।
श्वदंष्ट्रा पिप्पली धान्यं बिल्वपाठायमानिकाः ॥ १०८ ॥
चांगेरीस्वरसे सर्पिः कल्कैरेतैर्विपाचयेत् ।
चतुर्गुणेन दध्ना च तद्घृतं कफवातनुत् ॥ १०९ ॥
अर्शांसि ग्रहणीदोषं मूत्रकृच्छ्रं प्रवाहिकाम् ।
गुदभ्रंशार्तिमानाहं घृतमेतद्व्यपोहति ॥ ११० ॥

पिंपळी, सुंठ, जवखार, बडीशोप, धने, जिरें व अम्लवेतस किंवा महाळुंग, डाळिंब वगैरे अम्लत्व प्रधान व अनुलोमन करणाऱ्या फळांचा रस यांनीं तूप सिद्ध करून त्यांत काकवी मिळवून तें घ्यावें. पिंपळी, पिंपळमूळ, चित्रक, गजपिंपळी, सुंठ व जवखार यांनीं सिद्ध केलेलें तूप सेवन करावें. चवक व चित्रक यांनीं तूप सिद्ध करून त्यांत गूळ व जवखार मिळवून तें घ्यावें. पिंपळीमूळ टाकून तूप शिजवावें व त्यांत गूळ जवखार व सुंठ हीं द्रव्यें मिळवून तें तूप सेवन करावें. पिंपळी, पिंपळीमूळ, दहीं, डाळिंबाचा रस व धने यांनीं सिद्ध केलेलें तूप सेवन करावें. यापासून अधोवायु व मल यांचा अवरोध नाहींसा होतो. चवक, सुंठ, मिरें, पिंपळी पहाडमूळ, जवखार, धने, ओंवा, पिंपळमूळ बिडलोण, सैंधव, चित्रक, बेलफळाचा गर व हिरडे यांचा कल्क व चौपट दहीं मिळवून तूप सिद्ध करून तें सेवन करावें. यापासून जुलाब, अंग बाहेर येणें, मूत्रकृच्छ्र, चिकट चिकट स्राव आणि मलद्वार व जांघाड्यांतील वेदना इतके विकार नाहींसे होतात. सुंठ, पिंपळीमूळ, चित्रक,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गजपिंपळी, गोखरूं, पिंपळी, धने, बेलफळ, पहाडमूळ व ओंवा यांचा कल्क, चुक्याचा अंगरस व चौपट दहीं मिळवून तूप सिद्ध करावें. हें कफवातनाशक आहे. यापासून मूळव्याध, संग्रहणीचे रोग, मूत्रकृच्छ्र, अतीसार, अंग बाहेर येणें, मलद्वार ठणकणें व मलमूत्रावरोध हे विकार नाहींसे होतात.

पिप्पलीं नागरं पाठां श्वदंष्ट्रां च पृथक् पृथक् ।
भागांस्त्रिपलिकान्कृत्वा कषायमुपकल्पयेत् ॥ १११ ॥
कण्डीरं पिप्पलीमूलं व्योषचव्यश्च चित्रकम् ।
पिष्ट्वा कषाये विनयेत्पूते द्विपलिकं भिषक् ॥ ११२ ॥
पलानि सर्पिषस्तस्मिंश्चत्वारिंशत्प्रदापयेत् ।
चांगेरीस्वरसं तुल्यं सर्पिषा दधि षड्गुणम् ॥ ११३ ॥
मृद्वग्निना ततः साध्यं सिद्धं सर्पिर्निधापयेत् ।
तदाहारे विधातव्यं पाने प्रायोगिके विधौ ॥ ११४ ॥
ग्रहण्यर्शोविकारघ्नं गुल्महृद्रोगनाशनम् ।
शोथप्लीहोदरानाहमूत्रकृच्छ्रज्वरापहम् ॥ ११५ ॥
कासहिक्काऽरुचिश्वाससूदनं पार्श्वशूलनुत् ।
बलपुष्टिकरं वर्ण्यमग्निसन्दीपनं परम् ॥ ११६ ॥

पिंपळी, सुंठ, पहाडमूळ, गोखरू हीं प्रत्येकीं १२ तोळे घेऊन त्यांचा काढा करून तो गाळून घ्यावा आणि त्यांत धाकटी कारली, पिंपळमूळ, सुंठ, मिरें, पिंपळी, चवक व चित्रक हीं प्रत्येकीं आठआठ तोळे घेऊन वांटून मिळवावीं. त्यांतच १६० तोळे तूप, तितकाच चुक्याचा अंगरस व त्याच्या सहापट दहीं हीं सर्व मिळवून मंदाग्नीवर तें तूप सिद्ध करावें आणि तें जेवणांत व औषधरूपानें सतत वापरावें. यापासून संग्रहणी, मूळव्याध, गुल्म, हृद्रोग, सूज, पानथरी उदर, मलमूत्रावरोध मूत्रकृच्छ्र, ताप, खोकला उचकी, अरुचि, दमा, बरगड्यांत दुखणें हे सर्व विकार नाहींसे होऊन शक्ति व पुष्टि येते, अंगावर तजेला येतो आणि जठराग्नि उत्तम प्रकारें प्रदीप्त होतो.

सगुडां पिप्पलीयुक्तां घृतभृष्टां हरीतकीम् ।
त्रिवृद्दन्तीयुतां वाऽपि भक्षयेदानुलोमिकीम् ॥ ११७ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विड्वातकफपित्तानामानुलोम्येन निर्मले ।
गुदेऽर्शांसि प्रशाम्यन्ति पावकश्चाभिवर्धते ॥ ११८ ॥
बर्हितित्तिरिलावानां रसानम्लान्सुसंस्कृतान् ।
दक्षाणां वर्तकानाञ्च दद्याद्विड्वातसंग्रहे ॥ ११९ ॥
त्रिवृद्दन्तीपलाशानां चाङ्गेर्याश्चित्रकस्य च ।
सुभृष्टं यमके दद्याच्छाकं दधिसरैर्युतम् ॥ १२० ॥
उपोदिकां तण्डुलीयं वीरां वास्तुकपल्लवान् ।
सुवर्चलां सलोणीकां यवशाकमवल्गुजम् ॥ १२१ ॥
काकमाची रुहापत्रं महापत्रं तथाम्लिकाम् ।
जीवन्ती शटिशाकंच शाकं गृञ्जनकस्यच ॥ १२२ ॥
दधिदाडिमसिद्धानि भृष्टानि यमकेऽपिच ।
धान्यनागर युक्तानिशाकान्येतानि दापयेत् ॥ १२३ ॥
गोधाश्वावित्सलोपाकमार्जारोष्ट्रगवामपि ।
कूर्मशल्लकयोश्चैव साधयेच्छाकवद्रसान् ॥ १२४ ॥
रक्तशाल्योदनं दद्याद्रसैस्तैर्वातशान्तये ।
ज्ञात्वा वातोल्बणं रूक्षं दीप्ताग्निं गुदजातुरम् ॥ १२५ ॥
मदिरां शार्करं जातं शीधुं तक्रं तुषोदकम् ।
अरिष्टं दधिमण्डं वा शृतं वा शिशिरंजलम् ॥ १२६ ॥
कण्टकार्या शृतंवाऽपि शृतं नागरधान्यकैः ।
अनुपानं भिषग्दद्याद्वातवर्चोऽनुलोमनम् ॥ १२७ ॥

हिरडे तुपांत भाजून त्यांचें चूर्ण करून तें पिंपळी व गुळाशीं, किंवा निशोत्तर व दन्तीमुळाशीं मिळवून खावें. यापासून अधोवायु व मलाचें अनुलोमन होतें. मल, वायु, कफ, व पित्त हीं बरोबर आपापल्या मार्गांत असल्यानें मलद्वारांतील दोष नाहींसे होतात आणि त्या योगानें मूळव्याधीचे मोड नाहींसे होऊन अग्निही वाढतो. तात्पर्य मूळव्याधींत मल—मूत्र—अधोवायु वगैरेंचे अनुलोमन करणें हा मोठ्या महत्वाचा उपाय आहे. शौचास व लघ्वीस साफ होऊन अधोवायुही बरोबर सरूं लागला ह्मणजे मोड आपोआप बसून जातात. मल व वायु यांचा अवरोध होत असल्यास मोर, तित्तर, लावा, कोंबडा किंवा बटेर यांच्या मांसाचा महाळुंग, दहीं वगैरेंची आंबटाण आणि तूप मसाला वगैरे पदार्थ मिळवून, रसका करून द्यावा. किंवा निशोत्तर, दन्ती, पळस,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चुका किंवा चित्रक यांच्या कोंवळ्या पाल्याची भाजी तेल-तुपाच्या मिश्रणांत परतून त्यांत दह्याची साय व इतर मसाले टाकून तयार करून खावी. अथवा थोरमयाळ, तांदुळजा, क्षीरकाकोली, चाकवत, सूर्यमुखी, घोळ, पांढरा चाकवत ( एक जातीची चील ), बावची, कावळी, रुद्दापत्र (लाजाळु किंवा गुळवेल ), मालाकंद, अंबाडी, हरणदोडी, कचोरा व गाजर यांच्या पानांची भाजी तेल-तुपाच्या मिश्रणांत परतून त्यांत धने व सुंठ मिळवून दहीं आणि डाळिंबाच्या रसांत तयार करून ती द्यावी. पाण-घोरपड, ससा, खोंकड, मांजर, उंट, बैल, कांसव किंवा शल्लक, यांच्या मांसाचे वरील भाज्यांच्या कृतीनें शोरुवे करून त्यांच्या बरोबर तांबड्या साळींचा भात खावयास द्यावा. ज्याच्या प्रकृतींत वाताचा जोर आहे, ज्यांचें शरीर रूक्ष आहे व ज्यांचा अग्नि प्रदीप्त आहे अशा मूळव्याधीच्या रोग्यास हा प्रयोग उपयोगी आहे. जेवणावर पिण्याकरितां मदिरा, शर्करामद्य, शीधु, ताक, तुषोदक, अरिष्ट, दह्याची निवळी किंवा रिंगणी-मूळ अथवा सुंठ व धने टाकून कढविलेलें पाणी द्यावें. याच्या योगानें वाताचें अनुलोमन होतें.

उदावर्तपरीता ये ये चात्यर्थं विरूक्षिताः ।
विलोमवाताः शूलार्तास्तेष्विष्टमनुवासनं ॥ १२८ ॥
पिप्पलीं मदनं बिल्वं शताह्वां मधुकं वचां ।
कुष्ठं शटीं पुष्कराख्यं चित्रकं देवदारु च ॥ १२९ ॥
पिष्ट्वा तैलं विपक्तव्यं पयसा द्विगुणेन च ।
अर्शसां मूढवातानां तच्छ्रेष्ठमनुवासनं ॥ १३० ॥
गुदनिस्सरणं शूलं मूत्रकृच्छ्रं प्रवाहिकाम् ।
कट्यूरुपृष्ठदौर्बल्यमानाहं वंक्षणाश्रयम् ॥ १३१ ॥
पिच्छास्रावं गुदे शोफं वातवर्चोविनिग्रहं ।
उत्थानं बहुशो यच्च जयेत्तच्चानुवासनात् ॥ १३२ ॥

---

१. वाताचें अनुलोमन झालें म्हणजे कफ-पित्तांचें अनुलोमन सहजीं होतें. कारण शरीरांत वात हाच कायतो क्रियावान् दोष आहे. बाकीचे दोन दोष जड सारखे असून त्यांची क्रिया वाताच्या सहाय्यानेच घडते. वाग्भटांनीं वाताचें वर्णन करितांना " विट्श्लेष्मपित्तादिमलायनानां विक्षेपसंहारकरः " असेंच लिहिलें आहे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अनुवासनिकैः पिष्टैः सुखोष्णैः स्नेहसंयुतैः ।
दार्वन्तैः स्तब्धशूलानि गुदजानि प्रलेपयेत् ॥ १३३ ॥
दिग्धा तैः प्रस्रवन्त्याशु श्लेष्मपिच्छांसशोणिताः ।
कण्डूः स्तम्भः सरुक्शोफः स्रुतानां विनिवर्तते ॥ १३४ ॥
निरूहं वा प्रयुञ्जीत सक्षीरं दाशमूलिकम् ।
समूत्रस्नेहलवणं कल्कैर्युक्तं फलादिभिः ॥ १३५ ॥

जे रोगी उदावर्तानें पीडिलेलें असतात. ज्यांचें शरीर अत्यंत रूक्ष झालेलें असतें, ज्यांचा वायु उन्मार्गगामी झालेला असतो व ज्यांस शूलाचीही पीडा असते अशा रोग्यांस अनुवासन बस्ती द्यावा. पिंपळी, गेळफळ, बेलफळ, बडीशोप, ज्येष्ठमध, वेखंड, कोष्ठ, कचोरा, पुष्कर-मूळ, चित्रक व देवदार, हीं द्रव्यें चटणीसारखीं बारीक वांटून तीं एक भाग तेल, दोन भाग दूध ( व चौपट पाणी ) यां तिहींच्या मिश्रणांत मिळवून तें तेल तयार करावें आणि त्याचा अनुवासन बस्ती द्यावा. यापासून मूढवात, मलद्वार बाहेर येणें, ठणकणें, मूत्रकृच्छ्र, अतिसार, कंबर, मांड्या, पाठ हीं निःशक्त होणें, जांघाडे फुगणें, चिकट स्राव होणें, गुदद्वार सुजणें, अधोवायु व मलाचा अवरोध होणें व वरचेवर थोडथोडें शौचास होणें हे सर्व विकार नाहींसे होतात. वर सांगितलेलीं पिंपळीपासून देवदारापर्यंतचीं अनुवासनोपयोगी औषधें वांटून त्यांत तूप मिळवून तीं सोसण्याजोगीं गरम करून त्याचा ताठरलेल्या व ठणकणाऱ्या मोडांवर लेप द्यावा. हा लेप लावल्यापासून लवकरच मोडांतून रक्त व दाट चिकट कफ वाहून जातो आणि त्यांतील खाज, ताठपणा, ठणका व सूज हीं नाहींशीं होतात, किंवा दूध, गोमूत्र, तेल, सैंधव, व पूर्वोक्त गेळफळादिकांचा कल्क यांसह दशमुळांच्या काढ्याचा निरुह बस्ति द्यावा.

हरीतकीनां प्रस्थार्धं प्रस्थमामलकस्यच ।
स्यात्कपित्थाद्दशपलं ततोऽर्धा चेन्द्रवारुणी ॥ १३६ ॥
विडंगं पिप्पली लोध्रं मरिचं सैलवालुकम् ।
द्विपलांशं जल[illegible]द्रोणे विपाचयेत ॥ १३७ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

द्रोणशेषे रसेतस्मिन्पूते शीते समावपेत् ।
गुडस्य द्विशतं तिष्ठेत्तपक्षं घृतभाजने ॥ १३८ ॥
पक्षादूर्ध्वं भवेत्पेया ततो मात्रां यथाबलम् ।
अस्याभ्यासादरिष्टस्य नश्यन्ति गुदजानपि ॥ १३९ ॥
ग्रहणीपाण्डुहृद्रोगप्लीहागुल्मोदरापहः ।
कुष्ठशोफारूचिहरो बलवर्णाग्निवर्धनः ॥ १४० ॥
सिद्धोऽयमभयारिष्टः कामलाश्वित्रनाशनः ।
कृमिग्रन्थ्यर्बुदव्यङ्गराजयक्ष्मज्वरान्तकृत् ॥ १४१ ॥

अभयारिष्ट—हिरडे ३२ तोळे, आंवळकठी ६४ तोळे, कवठाचा गर ४० तोळे, इंद्रायणमूळ २० तोळे, वावडिंग, पिंपळी लोध्र काळीं-मिरें व एलवालु, हीं प्रत्येकीं आठ आठ तोळे याप्रमाणें हीं सर्व औषधें घेऊन त्यांचा ६४ शेर पाण्यांत काढा करावा. चतुर्थांश उरला म्हणजे उतरून गाळून घ्यावा आणि तो निवाल्यावर त्यांत ८०० तोळे गूळ घालून तें एकंदर मिश्रण तुपानें राबलेल्या मडक्यांत एक पंधर-वडापर्यंत भरून ठेवावें. एक पंधरवड्यानंतर हें अरिष्ट तयार होतें. ( नंतर तें मडक्यांतून काढून गाळून घ्यावें व मोठ्या बाटलींत भरून आंत हवा न जाईल असें गच्च बूच बसवून ठेवावें. नाहीं तर हें लवकर बिघडण्याचा संभव असतो ) यांतून रोग्याच्या शक्तीच्या मानानें योग्य प्रमाणांत रोज देत जावें. याचें सतत सेवन केल्यानें मूळव्याधीचे मोड नाहींसे होतात. संग्रहणी, पाण्डुरोग, हृद्रोग, पानथरी, गुल्म, उदर, कुष्ठ, सूज व अरुचि हे रोग नष्ट होतात आणि शक्ति, कांति व जठराग्नि हीं वाढतात. हें अभयारिष्ट एक सिद्ध औषध आहे. यापासून कावीळ, पांढरें कुष्ठ, कृमि, ग्रंथि, अर्बुद, व्यंग, क्षय व ताप हे रोगही नाश पावतात.

दन्तीचित्रकमूलानामुभयोः पञ्चमूलयोः ।
भागान्पलांशानापोथ्य जलद्रोणे विपाचयेत् ॥ १४२ ॥
त्रिफलाया दलानाञ्च प्रक्षिप्य त्रिपलं ततः ।
रसे चतुर्थशेषे तु पूते शीते समावपेत् ॥ १४३ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तुलां गुडस्य तत्तिष्ठेन्मासार्धं घृतभाजने ।
तन्मात्रया पिबेन्नित्यमर्शोभ्योऽपि प्रमुच्यते ॥ १४४ ॥
ग्रहणीपांडुरोगघ्नं वातवर्चोऽनुलोमनम् ।
दीपनं चारुचिघ्नश्च दन्त्यरिष्टमिदं विदुः ॥ १४५ ॥

दन्त्यरिष्ठ—दंतीमूळ, चित्रकमूळ व दशमुळें हीं प्रत्येकीं चार चार तोळे आणि हिरडेदळ, बेहडेदळ व आंवळकठी हीं प्रत्येकीं चार चार तोळे कुटून त्यांचा सोळा शेर पाण्यांत काढा करावा. चतुर्थांश उरला म्हणजे तो गाळून घ्यावा आणि त्यांत ४०० तोळे गूळ घालून पंधरा दिवसपर्यंत तुपानें रावलेल्या मडक्यांत भरून ठेवावा. म्हणजे हें दन्ती अरिष्ट तयार झालें. हें दररोज योग्य प्रमाणांत घेत गेल्यानें मूळव्याध बरी होते, संग्रहणी व पांडुरोग नाहींसे होतात, वायु व मलाचें अनुलोमन होतें. अग्नि प्रदीप्त होतो आणि तोंडास रुचि येते.

हरीतकीफलप्रस्थं प्रस्थमामलकस्य च ।
विशालाया दधित्थस्य पाठाचित्रकमूलयोः ॥ १४६ ॥
द्वे द्वे पले समापोथ्य द्विद्रोणे साधयेदपाम् ।
पादावशेषे पूते च रसे तस्मिन्प्रदापयेत् ॥ १४७ ॥
गुडस्यैकां तुलां वैद्यः संस्थाप्य घृतभाजने ।
पक्षस्थितं पिबेदेनं ग्रहण्यर्शोविकारवान् ॥ १४८ ॥
हृत्पाण्डुरोगं प्लीहानं कामलां विषमज्वरम् ।
वर्चोमूत्रानिलकृतान्विबन्धानग्निमार्दवम् ॥ १४९ ॥
कासं गुल्ममुदावर्तं फलारिष्टो व्यपोहति ।
अग्निसन्दीपनो ह्येष कृष्णात्रेयेण भाषितः ॥ १५० ॥

फलारिष्ट—हिरडे व आंवळे एकेक शेर, इंद्रायणमूळ, कंवठाचा गर, पहाडमूळ व चित्रकमूळ, हीं प्रत्येकीं आठ आठ तोळे याप्रमाणें सर्व औषधें घेऊन चांगली बारीक कुटून ती बत्तीस शेर पाण्यांत कढवावीं. चतुर्थांश ( आठ शेर ) काढा उरला म्हणजे तो गाळून घेऊन त्यांत ४०० तोळे गूळ टाकून तो तुपानें रावलेल्या मडक्यांत पंधरा दिवस-पर्यंत भरून ठेवावा. म्हणजे फलारिष्ट तयार झालें. याच्या सेवनानें संग्रहणी, मूळव्याध, हृद्रोग, पांडुरोग, प्लीहा, कावीळ, विषमज्वर, मल-मूत्र

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri
LIBRARY.
Jangamwadi Math, VARANASI,

अधोवायु यांचा अवरोध, अग्निमांद्य, खोकला, गुल्म व उदावर्त, हे रोग नाहींसे होतात, हें फलारिष्ट चांगलें अग्निदीपन करणारें आहे असें कृष्णात्रेयांनीं सांगितलें आहे.

दुरालभायाः प्रस्थः स्याच्चित्रकस्य वृषस्य च।
पथ्यामलकयोश्चैव पाठाया नागरस्य च ॥ १५१ ॥
दन्त्याश्च द्विपलान्भागाञ्जलद्रोणे विपाचयेत्।
पादावशेषे पूते च सुशीते शर्कराशतम् ॥ १५२ ॥
प्रक्षिप्य स्थापयेत्कुम्भे मासार्धं घृतभाजने।
प्रलिप्ते पिप्पलीचव्यप्रियंगुक्षौद्रसर्पिषा ॥ १५३ ॥
तस्य मात्रां पिबेत्काले शार्करस्य यथाबलम्।
अर्शांसि ग्रहणीदोषमुदावर्तमरोचकम् ॥ १५४ ॥
शकृन्मूत्रानिलोद्गारविबन्धानग्निमार्दवम्।
हृद्रोगं पाण्डुरोगंच सर्वमेतेन साधयेत् ॥ १५५ ॥

दुरालभाद्यरिष्ट—धमासा एक शेर आणि चित्रकमूळ, अडूळसा, हिरडे, आंवळकठी, पहाडमूळ, सुंठ व दन्तीमूळ हीं प्रत्येकीं आठ आठ तोळे घेऊन कुटून १६ शेर पाण्यांत कढवावीं. चतुर्थांश काढा राहिला ह्मणजे गाळून घ्यावा आणि तो थंड करून त्यांत ४०० तोळे साखर घालावी. नंतर एका तुपानें रावलेल्या मडक्यास आंतून पिंपळी, चवक, गहुला, मध व तूप यांचा कल्क करून तो लिंपावा आणि त्यांत वरील साखर मिश्रित काढा पंधरा दिवसपर्यंत बंद करून ठेवावा, ह्मणजे हें दुरालभाद्यारिष्ट तयार झालें. याचें योग्य वेळीं व योग्य प्रमाणांत यथाशक्ति सेवन केल्यानें मूळव्याध, संग्रहणी, उदावर्त, अरुचि, मल-मूत्र अधोवायु यांचा अवरोध, अग्निमांद्य, हृद्रोग व पांडुरोग, हे सर्व विकार नाहींसे होतात.

नवस्यामलकस्यैकां कुर्याज्जर्जरितां तुलाम्।
कुडवांशं विडङ्गानि पिप्पलीमरिचानि च ॥ १५६ ॥
पाठां मूलञ्च पिप्पल्याः क्रमुकं चव्यचित्रकौ।
मञ्जिष्ठा नालुकं लोध्रं पलिकान्युपकल्पयेत् ॥ १५७ ॥
कुष्ठं दारुहरिद्राञ्च सुराह्वं शारिवाद्वयम्।
इन्द्राह्वं भद्रमुस्तंश्च कुर्यादर्धं पलोन्मितम् ॥ १५८ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चत्वारि नागपुष्पस्य पलान्यभिनवस्य च ।
द्रोणाभ्यामम्भसो द्वाभ्यां साधयित्वाऽव तारयेत् ॥ १५९ ॥
पादावशेषे पूते च शीते तस्मिन्समावपेत् ।
मृद्वीकाद्व्याढकरसं शीतं निर्यूहसम्मितम् ॥ १६० ॥
शर्करायाश्च भिन्नाया दद्याद्द्विगुणितां तुलाम् ।
कुसुमस्य रसस्यैकमर्धप्रस्थं नवस्य च ॥ १६१ ॥
त्वगेलाप्लवपत्राम्बुसेव्यक्रमुककेशरान् ।
चूर्णयित्वा तु मतिमान्कार्षिकानत्र दापयेत् ॥ १६२ ॥
तत्सर्वं स्थापयेत्पक्षं शुचौ च घृतभाजने ।
प्रलिप्ते सर्पिषा किञ्चिच्छर्करागुरुधूपिते ॥ १६३ ॥
पक्षादूर्ध्वमरिष्टोऽयं कनको नामविश्रुतः ।
पेयः स्वादुरसो हृद्यः प्रयोगाद्भक्तरोचनः ॥ १६४ ॥
अर्शांसि ग्रहणीदोषमानाहमुदरं ज्वरम् ।
हृद्रोगं पाण्डुतां शोषं गुल्मवर्चोविनिग्रहम् ॥ १६५ ॥
कासं श्लेष्मामयाँश्चोग्रान्सर्वानेवापकर्षति ।
वलीपलितखालित्यं दोषजञ्च व्यपोहति ॥ १६६ ॥

**कनकारिष्ठ**–ताजे आंवळे ४०० तोळे वांटून घ्यावे. वावडिंगें, पिंपळी व काळीं मिरें प्रत्येकीं सोळा तोळे; पद्दाडमूळ, पिंपळीमूळ, सुपारी, चवक, चित्रक, मंजिष्ठ, वाळुक काकडीचें बीज व लोध्र, हीं प्रत्येकीं चार चार तोळे; कोष्ठ, दारुहळद, देवदार, पांढरी व काळी उपळसरी, इंद्रजव व भद्रमोथा, हीं प्रत्येकीं दोन दोन तोळे आणि ताजें नागकेशर सोळा तोळे. याप्रमाणें वरील सर्व औषधें एकत्र करून तीं ३२ शेर पाण्यांत कढवावीं. चतुर्थांश काढा झाला ह्मणजे उतरून गाळून घ्यावा आणि तो थंड करून त्यांत वरील काढ्याइतकाच ह्मणजे आठ शेर द्राक्षांचा रस किंवा काढा, ८०० तोळे खडीसाखरेची पूड, ताज्या जाईच्या फुलांचा रस दीड शेर, आणि दालचिनी, वेलची, केवटीमोथा तमालपत्र, वाळा, नेत्रवाळा, सुपारीचें फूल व नागकेशर हीं प्रत्येकीं एकेक तोळा याप्रमाणें सर्व द्रव्यें टाकावीं. नंतर एक स्वच्छ तुपानें रावलेलें मडकें घेऊन त्यास आंतून थोडें तूप व खडीसाखर चोपडून आणि अगराचा धूर देऊन त्यांत वरील काढ्याचें मिश्रण पंधरा दिवसपर्यंत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भरून ठेवावें. ह्मणजे हें कनकारिष्ट तयार झालें. हें प्यावयास गोड व प्रिय लागतें. याच्या सतत सेवनापासून अन्नावर रुचि उत्पन्न होते आणि मूळव्याध, संग्रहणी, पोटफुगी, उदर, ज्वर, हृद्रोग, पांडुरोग, क्षय, गुल्म, मलावरोध, खोकला, सर्व प्रकारचे जाज्वल्य कफविकार, आणि दोषज ह्मणजे अकालीं रोगांपासून उत्पन्न झालेलें वलीपलित ( अंगावर सुरकुत्या पडणें, व केंस पांढरें होणें,) आणि चाई हे सर्व विकार नाहींसे होतात.

पत्रभङ्गोदकैः शौचं कुर्यादुष्णेन चाम्भसा ।
इति शुष्कार्षसां सिद्धमुक्तमेतच्चिकित्सितम् ॥ १६७ ॥

सुक्या मुळव्याधीच्या रोग्यानें शौचास पाणी द्यावयाचें तें वायवरणा वगैरे वायुनाशक पानें घालून कढविलेलें किंवा निदान नुसतें गरम असें द्यावें. येथपर्यंत हीं कोरड्या मूळव्याधीची रामबाण चिकित्सा सांगितली.

चिकित्सितमिदं सिद्धं स्त्राविणां शृण्वतःपरम् ।
तत्रानुबन्धो द्विविधः श्लेष्मणो मारुतस्य च ॥ १६८ ॥
विड्श्यावं कठिनं रुक्षं चाधोवायुर्न वर्तते ।
तनु चारुणवर्णञ्च फेनिलं चासृगर्शसाम् ॥ १६९ ॥
कट्यूरुगुदशूलञ्च दौर्बल्यं यदि वाऽधिकम् ।
तत्रानुबन्धो वातस्य हेतुर्यदि विरूक्षणम् ॥ १७० ॥
शिथिलं श्वेतपीतञ्च विट् स्निग्धं गुरु शीतलम् ।
यद्यर्शसां घनञ्चासृक्तन्तुमत्पाण्डुपिच्छिलम् ॥ १७१ ॥
गुदं सपिच्छं स्तिमितं गुरु स्निग्धञ्च कारणम् ।
श्लेष्मानुबन्धो विज्ञेयस्तत्र रक्तार्शसां बुधैः ॥ १७२ ॥

आतां वाहणाऱ्या मूळव्याधीची चिकित्सा सांगतो ती ऐक. वाहणाऱ्या ह्मणजे रक्त्या मूळव्याधींत पित्ताचें सर्वदा प्राधान्य असतें हें वर सांगितलेंच आहे. त्यांत संसर्गी अर्थात् मदतगार दोष कफ किंवा वात हे दोन असतात. त्यांपैकीं, ज्या मूळव्याधींत मळ धूसर रंगाचा, कठिण व सुकलेला असा असेल, वारा सरत नसेल आणि मोडांतून पातळ, पिंगट रंगाचें व फेंसाळ रक्त वाहत असेल, तसेंच कंबर, मांड्या व मळ-

१ सर्व अरिष्टें पंधरा दिवसपर्यंत धान्यराशींत किंवा जमिनींत पुरून ठेवावीं.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

द्वारांत ठणका होत असेल, अंगांत फार अशक्तता वाटत असेल आणि हे विकार रूक्ष आहारविहारांनीं उत्पन्न झाले असतील, त्या मूळव्याधींत वायूचा संबंध आहे असें समजावें. ज्या मूळव्याधींत मळ ढिला-विस्कळित, पांढऱ्या पिवळट रंगाचा, चिकट, जड व थंड असतो; मोडांतून दाट, तंतुयुक्त, फिकट, व बुळबुळीत रक्त वाहतें; मलद्वार बुळबुळीत व ओलसर असतें आणि जड व स्निग्ध आहारविहारांनीं हे विकार उत्पन्न झालेले असतात त्या रक्त्या मूळव्याधींत कफाचा संसर्ग आहे असें समजावें.

स्निग्धशीतं हितं वाते रूक्षशीतं कफानुगे ।
चिकित्सितमिदं तस्मात्सम्प्रधार्य प्रयोजियेत् ॥ १७३ ॥
पित्तश्लेष्माधिकं मत्वा शोधनेनोपपादयेत् ।
स्रवणं चाप्युपेक्षेत लंघनैर्वा समाचरेत् ॥ १७४ ॥
प्रवृत्तमादावर्शोभ्यो यो निगृह्णात्यबुद्धिमान् ।
शोणितं दोषमलिनं तद्रोगाञ्जनयेद्बहून् ॥ १७५ ॥
रक्तपित्तं ज्वरं तृष्णामग्निनाशमरोचकम् ।
कामलां श्वयथुं शूलं गुदवङ्क्षणसंश्रयम् ॥ १७६ ॥
कण्ड्वरुः कोठपिडकाः कुष्ठं पाण्ड्वामयं गदम् ।
वातमूत्रपुरीषाणां विबन्धं शिरसो रुजम् ॥ १७७ ॥
स्तैमित्यं गुरुगात्रत्वं तथान्यान्रक्तजान्गदान् ।
तस्मात्स्रुते दुष्टरक्ते रक्तसंग्रहणं मतम् ॥ १७८ ॥
हेतुलक्षणकालज्ञो बलशोणितवर्णवित् ।
कालं तावदुपेक्षेत यावन्नात्ययमाप्नुयात् ॥ १७९ ॥

वाताचा संसर्ग असतां स्निग्ध व थंड आणि कफाचा अनुबंध असला तर रूक्ष व थंड चिकित्सा करावी. पित्त-कफाचा जोर असल्यास विरेचनादिकांनीं शोधन करावें. किंवा रक्त बंद करण्याचा प्रयत्न न करितां तें तसेंच जाऊं द्यावें. अथवा रोग्याच्या शक्तीप्रमाणें त्याच्याकडून लंघन करवावें जो अज्ञ वैद्य आरंभींच मोडांतून निघणारें दूषित घाणेरडें रक्त बंद करितो तो रोग्यास रक्तपित्त, ज्वर, तहान, अग्निनाश, अरुचि, काविळ, सूज, मळद्वार व जांघाड्यांतील ठणका, खाज गळवें, शीतपित्त, फोड, कुष्ठ, पांडुरोग, वायु-मल-मूत्रांचा अवरोध, डोकें दुखणें, अंगावर

 CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ओलें वस्त्र असल्यानें जसें वाटतें तसा भास होणें, अंग जड होणें, हे सर्व व इतर नाना प्रकारचे रक्त दोषापासून होणारे रोग उत्पन्न करून देण्यास कारण होतो. ह्मणून सर्व दूषित रक्त निघून गेल्यानंतरच रक्तस्राव बंद करण्याचा प्रयत्न करावा. वैद्यानें मूळव्याधीचीं कारणें, लक्षणें, काल, रोग्याची शक्ति व रक्ताचा रंग या सर्वांची बरोबर परीक्षा करून रोग्याच्या जीवास धक्का न पोहोंचेल इतका वेळपर्यंत रक्त वाहूं द्यावें.

अग्निसन्दीपनार्थञ्च रक्तसंग्रहणायच ।
दोषाणां पाचनार्थञ्च परं तिक्तैरुपाचरेत् ॥ १८० ॥
यस्तु प्रक्षीणदोषस्य रक्तं वातोल्बणस्य च ।
वर्तते स्नेहसाध्यन्तत्पानाभ्यङ्गानुवासनैः ॥ १८१ ॥
यत्तु पित्तोल्बणं रक्तं घर्मकाले प्रवर्तते ।
स्तम्भनीयं तदेकान्तान्नचेद्वातकफानुगम् ॥ १८२ ॥
कुटजत्वङ्निर्यूहः सनागरः स्निग्धरक्तसंग्रहणः ।
त्वग्दाडिमस्य तद्वत्सनागरश्चन्दनरसश्च ॥ १८३ ॥
चन्दनकिराततिक्तकधन्वयवासाः सनागराः क्वथिताः ।
रक्तार्शसां प्रशमना दार्वीत्वगुशीरनिम्बाश्च ॥ १८४ ॥
सातिविषा कुटजत्वक् फलञ्च सरसाञ्जनम् ।
मधुयुतं हि रक्तापहं प्रदद्यात्पिपासवे तण्डुलजलेन ॥ १८५ ॥
कुटजत्वचो विपाच्यं पलशतमार्द्रस्य मेघसलिलेन ।
यावत्स्याद्गतरसं तद्द्रव्यं पूतो रसस्ततो ग्राह्यः ॥ १८६ ॥
मोचरसः ससमङ्गःफलिनी च समांशिकैस्त्रिभिस्तैश्च ।
वत्सकबीजं तुल्यं चूर्णितमत्र प्रदातव्यम् ॥ १८७ ॥
पूतः क्वथितः सरसो दार्वीलेपो ततः समवतार्य ।
मात्रा कालोपहिता रसक्रियैषा जयति रक्तम् ॥ १८६ ॥
छागलिपयसा पीता पेया मण्डेन वा यथाग्निबलम् ।
जीर्णौषधश्च शालीन्पयसा छागेन भुञ्जीत ॥ १८९ ॥
रक्तार्शांस्यतिसारं रक्तं सासृग्रुजो निहन्याशु ।
बलवञ्च रक्तपित्तं रसक्रियैषा जयत्युभयभागम् ॥ १९० ॥

सर्व दुष्ट रक्त वाहून गेलें ह्मणजे अग्नि प्रदीप्त करण्याकरितां, रक्त बंद होण्याकरितां व आम दोषाचें पाचन करण्याकरितां तिक्तरसाच्या औषधींचा उपयोग करावा. ज्याचे दोष क्षीण झाले आहेत किंवा ज्याच्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रकृतींत वात दोषाचा जोर आहे अशा मनुष्यास रक्तस्राव होत असतां तो स्निग्ध उपचारांनीं ह्मणजे स्नेहपान, अभ्यङ्ग व अनुवासनबस्ती या उपायांनीं बंद करावा. पित्तदोषाच्या आधिक्यानें ग्रीष्म ऋतूंत वाहणारें रक्त मात्र जर त्यांत वात किंवा कफाचा संसर्ग नसेल तर, तत्काल अवश्य बंदच करावें. कारण त्यापासून फार लवकर भयंकर परिणाम होण्याची धास्ती असते. वातकफाचा संसर्ग असल्यास लंघन वगैरे उपाय करावे. कुडयाची साल व सुंठ, किंवा डाळिंबाची साल व सुंठ, सुंठ व रक्तचंदन किंवा रक्त चंदन, कडू किराईत, धमासा व सुंठ यांचा काढा घेतला असतां चिकट व रक्तस्राव बंद होतो. दारूहळद, दालचिनी, वाळा व कडूनिंबाची साल यांच्या काढ्यानें रक्तस्राव बंद होतो. अतिविष, कुडयाची साल, इंद्रजव व रसांजन यांचें चूर्ण मधांतून दिलें असतां रक्तस्राव बंद होतो. रोग्यास तहान फार लागत असल्यास हेंच औषध तांदुळांच्या धुवणांतून द्यावें. कुटजादिरसक्रिया—कुडयाची ओली साल ४०० तोळे घेऊन ती पावसाच्या पाण्यांत उकळावी. त्यांतील सर्व रस[1] पाण्यांत उतरला ह्मणजे तो काढा गाळून घेऊन त्यांत सावरीचा डीक ( मोचरस ), लाजाळू, व गहुला या तीन पदार्थांचें चूर्ण समभाग व या सर्वांच्या बरोबरीनें इंद्रजवांचें चूर्ण मिळवून तो काढा पळीनें ढवळीत राहून आटवावा. आटतां आटतां तो पळीस चिकटूं लागला ह्मणजे अवलेह तयार झाला असें समजून उतरून घ्यावा. हा अवलेह योग्य प्रमाणांत योग्यकाळीं घेत गेल्यानें रक्तस्राव बंद होतो. हा अवलेह घेऊन त्यावर यथाशक्ति बकरीचें दूध किंवा पेज अथवा मंड प्यावें. औषध जिरलें ह्मणजे बकरीच्या दुधाबरोबर साळींचा भात जेवावा. या लेहाच्या योगानें रक्तीमूळव्याध, रक्तातिसार, मलद्वारांतील सूज व जबरदस्त उभयगामी रक्तपित्त हे सर्व विकार नाहींसे होतात.

---

१. बहुशः अष्टमांश काढा केला असतां औषधांचा सर्व रस त्यांत उतरतो.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नीलोत्पलं समङ्गा मोचरसश्चन्दनं तिला लोध्रम् ।
पीत्वा छागलिपयसा भोज्यं पयसैव शाल्यन्नम् ॥ १९१ ॥
छागलिपयः प्रयुक्तं निहन्ति रक्तं सवास्तुकरसश्च ।
धन्वविहंगमृगाणां रसो निरम्लः कदम्लो वा ॥ १९२ ॥
पाठा वत्सकबीजं रसाञ्जनं नागरं यमान्यश्च ।
बिल्वमिति चार्शसैश्चूर्णितानि पेयानि सशूलेषु ॥ १९३ ॥
दार्वी किराततिक्तं मुस्तं दुःस्पर्शकश्च रुधिरघ्नम् ।
रक्तेऽतिवर्तमाने शूले च घृतं विधातव्यम् ॥ १९४ ॥
कुटजफलवल्ककेशरनीलोत्पललोध्रधातकीकल्कैः ।
सिद्धं घृतं विधेयं शूले रक्तार्शसां भिषजा ॥ १९५ ॥
सर्पिः सदाडिमरसं सयावशूकं जयत्याशु ।
रक्तं सशूलमथवा निदिग्धिकादुग्धिकासिद्धम् ॥ १९६ ॥
लाजापेया पीता चुक्रिकाकेशरोत्पलैः सिद्धा ।
हन्त्याशु रक्तरोगं तथा बलापृश्निपर्णीभ्याम् ॥ १९७ ॥
ऱ्हीबेरबिल्वनागरनिर्यूहे साधितां सनवनीताम् ।
वृक्षाम्लदाडिमाम्लामम्लीकाम्लां सकोलाम्लाम् ॥ १९८ ॥
गृञ्जनकसुरासिद्धां भृष्टां यमकेन वा पिबेत्पेयाम् ।
रक्तातिसारशूलप्रवाहिकाशोथनिग्रहणीम् ॥ १९९ ॥

निळें कमळ, लाजाळू, सांवरीचा डीक, रक्तचंदन, तीळ व लोध्र, यांचें चूर्ण बकरीच्या दुधांतून घेऊन वर बकरीच्याच दुधाशीं साळीचा भात जेवावा. नुस्तें बकरीचें दूध (लोणी व तूप) सेवन केल्यानेंही रक्त बंद होतें. जांगल पशु-पक्ष्यांच्या मांसाचे शोरुवे त्यांत चाकवताचा रस मिळवून बिन आंबटाचे किंवा थोडी आंबटाण टाकून द्यावें ह्मणजे रक्त बंद होतें. मूळव्याधींत ठणका असल्यास पहाडमूळ, इंद्रजव, रसांजन, सुंठ, ओंवा व बेलफळाचा गर यांचें चूर्ण करून तें पाण्याशीं द्यावें. रक्त फार जात असेल तर दारुहळद, कडू किराईत, नागरमोथा व घमासा, या द्रव्यांनीं तूप सिद्ध करून तें द्यावें. इंद्रजव, कुडयाची साल, नागकेशर, निळें कमळ, लोध्र व धायटीचीं फुलें, या सर्व औषधांचा कल्क मिळवून तूप तयार करावें व तें ठणकणाऱ्या रक्त्या मूळव्याधींत द्यावें. डाळिंबाचा रस व जवखार घालून तयार

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

केलेलें तूप किंवा रिंगळीमूळ व दुधी यांसह तयार केलेलें तूप सेवन केल्यानें ठणका व रक्तस्राव बंद होतो. चुक्याची भाजी, नागकेशर व निळें कमळ यांसह किंवा चिकणा व रानभाल यांचीं मुळें टाकून तयार केलेली लाह्यांची पेज प्याल्यानें रक्त वाहणें बंद होतें. वाळा, बेलफळ व सुंठ यांच्या काढ्यांत लोणी व कोकम, डाळिंब, चिंच किंवा बोरें यांची आंबटाण टाकून तयार केलेली लाह्यांची पेज प्यावी, किंवा लसूण व मद्य यांसह तयार केलेली पेज तेल-तुपाच्या मिश्रणाची फोडणी देऊन प्यावी. यापासून रक्तातिसार, शूळ, अतिसार व सूज हीं नाहींशी होतात.

काश्मर्यामलकानां सकर्बुदारफलाम्लानाम् ।
गृञ्जनकशाल्मलीनां क्षीरिण्याश्चुक्रिकायाश्च ॥ २०० ॥
न्यग्रोधशुङ्गकानां खडाँस्तथा कोविदारपुष्पाणाम् ।
दध्नः सरेण सिद्धान्दद्याद्रक्ते प्रवृत्तेऽति ॥ २०१ ॥
सिद्धं पलाण्डुशाकं तक्रेणोपोदिकां सबदराम्लाम् ।
रुधिरस्रवे प्रदद्यान्मसुरसूपं च तक्राम्लम् ॥ २०२ ॥
पयसा शृतेन यूषैर्मसूरमुद्गाढकीमकुष्ठानाम् ।
भोजनमद्यादम्लैः शालिश्यामाककोद्रवजम् ॥ २०३ ॥
शशहरिणलावमांसैः कपिञ्जलैणेयैः सुसिद्धैश्च ।
भोजनमद्यादम्लैर्मधुरैरीषत्समरिचैर्वा ॥ २०४ ॥
दक्षशिखितित्तिरिरसैर्द्विककुल्लोपाकजैश्च मधुराम्लैः ।
अद्याद्रसैरतिवहेष्वर्शःस्वनिलोल्बणशरीरः ॥ २०५ ॥
रसखडयवागूसंयुक्तः केवलोऽथवा जयति ।
रक्तमतिवर्तमानं वातश्च पलाण्डुरुपयुक्तः ॥ २०६ ॥
छागान्तराधितरुणं सरुधिरमुपसाधितं बहुपलाण्डु ।
व्यत्यासान्मधुराम्लं विट्शोणितसङ्क्षये देयम् ॥ २०७ ॥

रक्तस्राव फार होत असतां शिवण, आवळे, पांढरा कांचन, डाळिंब, लसूण, सांबर, रांजण, चुका यांचीं फळें, वडाच्या डिम्या व तांबड्या कचनाराचीं फुलें यांचें दह्यांच्या मलाईबरोबर खडयूष बनवून तें द्यावें. ताकांत तयार केलेली कांद्याची भाजी, बोरांची आंबटाण टाकून तयार केलेली थोर मयाळीची भाजी आणि ताकमिश्रित मसुराच्या डाळीचें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वरण रक्तस्रावांत द्यावें. मसुरा, मूग, तूर व मठ यांच्या आंबट वरणाशीं साळी, कांग व कोद्रू यांचें जेवण जेवावें. ससा, हरिण, लाव, कवडा व काळें हरण यांच्या मांसाचे आंबट किंवा गोड शोरुवे बनवून त्यांत थोडी मिरपूड टाकून त्याबरोबर भात वगैरे जेवावा. ज्याच्या प्रकृतींत वाताचा जोर आहे अशा मनुष्यास अतिशय रक्तस्राव होत असतां त्यानें कोंबडा, मोर, तित्तिर, उंट व खोंकड यांच्या मांसाच्या शोरुव्याबरोबर भोजन करावें. शोरुवा, आमटी, कण्हेरी यांत मिळवून किंवा नुस्त्याच कांद्याचा खाण्यांत उपयोग केला असतां फार वाहत असलेलें रक्त बंद होतें. मूळव्याधींत मल व रक्ताचा क्षय झाला असतां बोकडाच्या कोठ्यांतील ताज्या ताज्या रक्तासहित मांसाचा, पुष्कळसे कांदे घालून शोरुवा करून तो खावयास द्यावा. हा शोरुवा एकदां आंबट व एकदां गोड असा आलटून पालटून देत असावें.

नवनीततिलाभ्यासात्केशरनवनीतशर्कराभ्यासात्।
दधिसरमथिताभ्यासादर्शांस्यपयान्ति रक्तानि ॥ २०८ ॥
नवनीतं घृतं छागं मांसं सषष्ठिकः शालिः।
तरुणश्च सुरामण्डस्तरुणा च सुरा निहत्यस्रम् ॥ २०९ ॥
प्रायेण वातबहुलान्यर्शांसि भवन्त्यतिस्रुते रक्ते।
दुष्टेऽपि कफपित्ते तस्मादनिलो विशेषतो ज्ञेयः ॥ २१० ॥
दृष्ट्वा तु रक्तपित्तं प्रबलं कफवातलिंगमल्पञ्च।
शीताः क्रियाः प्रयोज्या यथेरिता वक्ष्यते चान्याः ॥ २११ ॥
मधुकं सपञ्चवल्कं बदरीत्वगुदुम्बरं धवपटोलम्।
परिषेचने विदध्याद्वृषककुभयवासनिम्बाँश्च ॥ २१२ ॥
रक्तेऽतिवर्तमाने दाहे क्लेदेच गाहयेच्चापि।
मधुकमृणालपद्मकचन्दनकुशकाशनिःक्काथे ॥ २१३ ॥
इक्षुरसमधुकवेतसनिर्यूहे शीतले पयसि वातम्।
अवगाहयेत्प्रदिग्धं पूर्वं शिशिरेण तैलेन ॥ २१४ ॥
दत्त्वा घृतं सशर्करमुपस्थदेशे गुदे च त्रिकदेशे।
शिशिरजलस्पर्शसुखा धारा प्रस्तम्भनी योज्या ॥ २१५ ॥
कदलीदलैरभिनवैः पुष्करपत्रैश्च शीतजलसिक्तैः।
प्रच्छादनं मुहुर्मुहुरिष्टं पद्मोत्पलदलैश्च ॥ २१६ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दूर्वाघृतप्रदेहः शतधौतसहस्रधौतमपि सर्पिः ।
व्यजनपवनश्च शीतो रक्तस्रावं जयत्याशु ॥ २१७ ॥

लोणी व तीळ; नागकेशर, लोणी व खडीसाखर; किंवा दह्यांवरची साय व पाणी न घालतां घुसळलेलें नुसतें दहीं प्रति दिवशीं नियमानें सेवन केल्यानें रक्तमूळव्याध नाहींशी होते. बकरीचें लोणी, तूप, बोकडाचें मांस, साठेतांदूळ, साळीचे तांदूळ, ताजा सुरामंड व ताजी[1] सुरा हे रक्त बंद करणारे पदार्थ आहेत. अतिशय रक्तस्राव झाल्यानें मूळव्याधींत वायूचा जोर फार वाढतो, म्हणून कफ व पित्त हेही दूषित झाले असले तरी वातासच प्रधान समजून त्याचीच विशेष चिकित्सा करावी. . ज्या मूळव्याधींत रक्त-पित्ताचा जोर दिसून येईल आणि कफ व वायु या दोषांचीं लक्षणें दुर्बल असतील त्यांत पूर्वोक्त व आतां यापुढें सांगितले जाणारे थंड उपचार करावे. ज्येष्ठमध, वड, पिंपळ, उंबर, पायरी व वेत यांच्या साली, बोरीची साल, उंबराचीं फळें, धावड्याची साल, कडू पडवळ, अडुळसा, अर्जुन-सादड्याची साल, धमासा व कडू लिंबाची साल या सर्वांचा काढा करून तो मलद्वारावर शिंपडावा. रक्त फार वाहत असेल, गुदद्वारीं आग होत असेल व चिकटाही असेल तर ज्येष्ठमध, कमळाची देंठी, पद्मकाष्ठ, चन्दन, दर्भ व कसईचें मूळ यांच्या काढ्यांत रोग्यास बसवावा. किंवा प्रथम रोग्याचे अंगास थंड तेल चोळून त्यास उंसाचा रस, ज्येष्ठीमध व वेत यांच्या निवलेल्या काढ्यांत किंवा दुधांत बसवावा. शिश्न, मलद्वार व माकडहाडावर तूप साखरेच्या लुगद्या बसवून वर थंड पाण्याची हलकी धार धरावी. यापासून स्तंभन होतें. केळीचीं कोंवळीं पानें, कमळाचीं पानें (तांबड्या?) किंचित् पांढऱ्या किंवा किंचित् निळ्या रंगाच्या कमळाचीं पानें त्यांवर वरचेवर थंड पाणी शिंपडून मूळव्याधीवर ठेवावी. दूर्वांचा रस घालून तयार केलेलें तूप, शंभर वेळां किंवा हजार वेळां धुतलेलें तूप, हीं मोडावर लावणें आणि थंड पंख्यांनीं वारा घालणें या उपायांनीं रक्तस्राव लवकरच बंद होतो.

१. ताजी म्हणजे जिच्यांत माधुर्याचा अंश विशेष आहे अशी.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

समङ्गामधुकाभ्यां तिलमधुकाभ्यां रसांजनघृताभ्याम् ।
सर्जरसघृताभ्यां वा निम्बघृताभ्यां मधुघृताभ्याम् ॥ २१८ ॥
दार्वीत्वक्सर्पिर्भ्यां सचन्दनाभ्यामथोत्पलघृताभ्याम् ।
दाहे क्लेदे भ्रंशे गुदजाः प्रतिसारणीयाः स्युः ॥ २१९ ॥
आभिः क्रियाभिरथवा शीताभिर्यस्य तिष्ठति न रक्तम् ।
तं काले स्निग्धोष्णैर्मांसैस्तर्पयेन्मतिमान् ॥ २२० ॥
अवपीडकसर्पिर्भिः कोष्णैर्घृततैलिकैस्तथाभ्यङ्गैः ।
क्षीरघृततैलसेकैः कोष्णैः समुपाचरेदाशु ॥ २२१ ॥
कोष्णेन वातप्रबले घृतमण्डेनानुवासयेच्छीघ्रम् ।
पिच्छाबस्तिं दद्याद्बस्तिं काले तस्याथवा सिद्धम् ॥ २२२ ॥
यवासकुशकाशानां मूलं पुष्पञ्च शाल्मलम् ।
न्यग्रोधोदुम्बराश्वत्थशुङ्गाश्च द्विपलोन्मिताः ॥ २२३ ॥
त्रिपस्थे सलिलस्यैतत्क्षीरप्रस्थंच साधयेत् ।
क्षीरशेषं कषायञ्च पूतं कल्कैर्विमिश्रयेत् ॥ २२४ ॥
कल्काः शाल्मलिनिर्याससमंगाचन्दनोत्पलम् ।
वत्सकस्य च बीजानि प्रियंगुः पद्मकेशरम् ॥ २२५ ॥
पिच्छावस्तिरयं सिद्धः सघृतक्षौद्रशर्करः ।
प्रवाहिकागुदभ्रंशरक्तस्रावज्वरापहः ॥ २२६ ॥

मूळव्याधीची आग होत असेल, चिकटा असेल, व मलद्वार बाहेर आलें असेल तर लाजाळू व ज्येष्ठमध, रसांजन व तूप, राळ व तूप, कडू लिंबाचा पाला व तूप, मध-तूप, दारुहळद व तूप, दालचिनी-तूप, चंदन-तूप, किंवा किंचित् निळ्या रंगाचें कमळ व तूप यांचें मलम करून तें मोडांस हळू हळू चोळावें. हें सर्व व इतर शीत उपचार करूनही जर रक्त थांबलें नाहीं तर रोग्यास कालमान पाहून स्निग्ध व उष्ण मांसाचे शोरवे यथेच्छ खाऊं घालावे. पूर्वोक्त अवपीड तुपाचा प्रयोग करावा. कोमट तूप-तेलाची मालिश करावी. आणि कोमट दूध, तूप किंवा तेल यांचा योग्यतेनुरूप शिडकाव करीत असावें. अशा प्रकारच्या रोग्यास वाताचा जोर असल्यास तत्काल कोमट अशा तुपाच्या निवळीचा अनुवासन बस्ती द्यावा, किंवा पुढील खात्रीलायक पिच्छाबस्ती द्यावा. परंतु यांत उशीर लागतां कामा नये.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पिच्छाबस्ती-धमासा, दर्भ, कसई यांचीं मुळें, सांवरीचीं फुलें, वड, उंबर, पिंपळ यांच्या कोंकळ्या डिऱ्या हीं सर्व द्रव्यें प्रत्येकीं आठ आठ तोळे घेऊन तीन शेर पाणी व एक शेर दूध मिळवून त्यांत उकळावीं. सर्व पाणी जळून फक्त दूध शिल्लक राहिलें ह्मणजे तो काढा गाळून घ्यावा. आणि त्यांत सांवरीचा डीक, लाजाळू, चंदन, निळें कमळ, इंद्रजव, गहुला व कमळकेसर या औषधांचा वाटलेला गोळा मिळवावा. नंतर त्यांत तूप, मध व खडीसाखर मिळवावी ह्मणजे हा पिच्छाबस्ति तयार झाला. याच्या प्रयोगानें अतिसार, मलद्वार बाहेर येणें, रक्तस्राव व ताप हे विकार नाहींसे होतात.

प्रपौण्डरीकं मधुकं पिच्छाबस्तो यथेरितम् ।
पिष्ट्वानुवासनं स्नेहं क्षीरद्विगुणितं पचेत् ॥ २२७ ॥

पुंडरीक, ज्येष्ठमध आणि वरील पिच्छाबस्तींत सांगितलेलीं सांवरीचा डीक वगैरे वाटून घालावयाचीं औषधें हीं सर्व घेऊन वाटावीं. आणि दुप्पट दूध घालून यांसहित तूप तयार करून त्याचा बस्ति द्यावा.

ह्रीवेरमुत्पलं लोध्रं समंगाचव्यचन्दनम् ।
पाठा सातिविषा बिल्वं धातकी देवदारुच ॥ २२८ ॥
दार्वी त्वंनागरं मांसी मुस्तं क्षारो यवाग्रजः ।
चित्रकश्चेति पेष्याणि चांगेरीस्वरसे घृतम् ॥ २२९ ॥
ऐकध्यं साधयेत्सर्वं तत्सर्पिः परमौषधम् ।
अर्शोतिसारग्रहणीपाण्डुरोगज्वरारुचौ ॥ २३० ॥
मूत्रकृच्छ्रे गुदभ्रंशे बस्त्यानाहे प्रवाहणे ।
पिच्छास्रावेऽर्शसां शूले योज्यमेतत्रिदोषनुत् ॥ २३१ ॥

ऱ्हीवेरादिघृत-वाळा, निळें कमळ, लोध्र, लाजाळू, चवक, चंदन, पहाडमूळ, अतिविष, बेलफळाचा गर, धायटीचीं फुलें, देवदार, दारुहळद, दालचिनी, सुंठ, जटामांशी, नागरमोथा, जवखार व चित्रक हीं सर्व औषधें वांटून, यांच्या चौपट तूप व तुपाच्या चौपट चुक्याचा अंगरस यांत मिळवून तें तूप सिद्ध करून घेत जावें. हें तूप एक मोठेंच औषध आहे. यापासून मूळव्याध, अतिसार, संग्रहणी, पांडुरोग; ताप;

 CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अरुचि, मूत्रकृच्छ्र, मलद्वार बाहेर येणें, बस्तीचा फुगवटा, मळ झिरपणें, बुळबुळीत स्राव होणें व मोड ठणकणें इतके सर्व विकार नाश पावतात. हें त्रिदोषनाशक आहे.

अवाक्पुष्पी बलादार्वी पृश्निपर्णी त्रिकण्टकः ।
न्यग्रोधोदुम्बराश्वत्थशुंगाश्च द्विपलोन्मिताः ॥ २३२ ॥
कषाय एषां पेशास्तु जीवन्ती कटुरोहिणी ।
पिप्पली पिप्पलीमूलं नागरं सुरदारु च ॥ २३३ ॥
कलिङ्गाः शाल्मलं पुष्पं वीरा चन्दनमुत्पलम् ।
कट्फलं चित्रकं मुस्तं प्रियंग्वतिविषा स्थिराः ॥ २३४ ॥
पद्मोत्पलानां किञ्जल्कं समंगा सनिदिग्धिका ।
बिल्वं मोचरसः पाठा भागाः कर्षसमन्विताः ॥ २३५ ॥
चतुःप्रस्थे शृतं प्रस्थं कषायमवतारयेत् ।
त्रिंशत्पलानि प्रस्तोऽत्र विज्ञेयो द्विपलाधिकः ॥ २३६ ॥
सुनिषण्णकचांगेर्योः प्रस्थौ द्वौ स्वरसस्य च ।
सर्वैरेतैर्यथोद्दिष्टैर्घृतप्रस्थं विपाचयेत् ॥ २३७ ॥
एतदर्शःस्वतीसारे रक्तस्रावे त्रिदोषजे ।
प्रवाहणे गुदभ्रंशे पिच्छासु विविधासु च ॥ २३८ ॥
उत्थाने चातिबहुशः शोथशूले गुदाश्रये ।
मूत्रग्रहे मूढवाते मन्देऽग्नावरुचावपि ॥ २३९ ॥
प्रयोज्यं विधिवत्सर्पिर्बलवर्णाग्निवर्धनम् ।
विविधेष्वन्नपानेषु केवलं वा निरत्ययम् ॥ २४० ॥

**सुनिषण्णकचांगेरी घृत**—चडीशेप, चिकणामूळ, दारुहळद, रानभालमूळ, गोखरू, वड, उंबर, पिंपळ यांच्या कोंवळ्या डिऱ्या हीं सर्व द्रव्यें प्रत्येकीं आठ आठ तोळे घेऊन त्यांचा ४ शेर पाण्यांत काढा करावा. एक चतुर्थांश राहिला ह्मणजे उतरून घ्यावा. या ठिकाणीं शेर १२८ तोळ्यांचा घ्यावयाचा. वरील काढ्यांत हरणदोडी, कुटकी, पिंपळी, पिंपळमूळ, सुंठ, देवदार, इंद्रजव, सांवरीचीं फुलें, क्षीरकाकोली किंवा डुक्करकंद, चंदन, निळें कमळ, कायफळ, चित्रक, नागरमोथा, गहुला, अतिविष, रानगांजामूळ, पांढऱ्या व निळ्या कमळाचें केशर, मंजिष्ठ किंवा लाजाळू, रिंगणीमूळ, बेलफळ, सांवरीचा डीक व पहाडमूळ यांचा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रत्येकीं दोन दोन तोळे कल्क, आणि कुरडू व चुका यांचा दोन शेर अंगरस आणि एक शेर तूप मिळवून तूप सिद्ध करावें. हें तूप मूळव्याध, अतिसार, त्रिदोषजन्य रक्तस्राव, मलस्राव, मलद्वार बाहेर येणें नानाप्रकारचे चिकट स्राव, वरचेवर थोडा थोडा मळ झिरपणें, मलद्वाराची सूज व ठणका, लघवी बंद होणें, मूढवात, अग्निमांद्य व अरुचि या विकारांवर यथाविधि योजावें. यापासून शक्ति, कांति व अग्नि हीं वाढतात. हें निरनिराळ्या खाण्यापिण्याच्या पदार्थांत किंवा नुस्तेंच वापरलें तरी चालतें. यापासून कोणताही अपाय होत नाहीं.

भवन्ति चात्र

व्यत्यासान्मधुराम्लानि शीतोष्णानि च योजयेत् ।
नित्यमग्निबलापेक्षी जयत्यर्शः कृतान्गदान् ॥ २४१ ॥
त्रयो विकाराः प्रायेण ये परस्परहेतवः ।
अर्शांसि चातिसारश्च ग्रहणी दोष एव च ॥ २४२ ॥
एषामग्निबले हीने वृद्धिर्वृद्धे परिक्षयः ।
तस्मादग्निबलं रक्ष्यमेषु त्रिषु विशेषतः ॥ २४३ ॥
भृष्टैः शाकैर्यवागूभिर्यूषैर्मांसरसैः खडैः ।
क्षीरतक्रप्रयोगैश्च विचित्रैर्गुदजाञ्जयेत् ॥ २४४ ॥
यद्वायोरानुलोम्याय यदग्निबलवृद्धये ।
अन्नपानौषधं द्रव्यं तत्सेव्यं नित्यमर्शसैः ॥ २४५ ॥
यदतो विपरीतं स्यान्निदाने यत्प्रदर्शितम् ।
गुदजाभिपरीतेन तत्सेव्यं न कथञ्चन ॥ २४६ ॥

मूळव्याधींत गोड व आंबट, थंड व उष्ण अशीं अदलून बदलून अन्नपानें वगैरे द्यावीं. मूळव्याधीच्या रोग्याचा जठराग्नि कायम राहील अशीं नेहमीं खबरदारी घेऊन जो चिकित्सा करितो तो यशस्वी होतो. मूळव्याध, अतिसार व संग्रहणी हे तीन रोग आपसांत एकमेकांपासून उत्पन्न होणारे आहेत. आणि यांचा हा नियम आहे कीं, रोग्याचा जठराग्नि मंद झाला कीं, हे रोग वाढतात. आणि तो प्रदीप्त असला ह्मणजे ते कमी होतात. ह्मणून या तीन रोगांत जठराग्नि प्रदीप्त राखण्याची विशेष खबरदारी घ्यावी. फोडणीच्या भाज्या, कण्हेरी, कढणें, मांसाचे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शोरवे, खडयूष आणि दूध व ताकाचे नानाप्रकारचे पदार्थ खाण्यापिण्यास देऊन मूळव्याध बरी करावी. ज्यापासून वायूची गति सारखी राहील, आणि अग्नि वाढेल अशा प्रकारचें खाणें पिणें व औषधें मूळव्याधींच्या रोग्यानें नेहमीं सेवन करावीं. याच्या उलट गुणाचें आहार ज्यांपासून या रोग्याची उत्पत्ति होते ते निदानस्थानांत सांगितलेच आहेत. ते मूळव्याधीच्या रोग्यानें कधीं उपयोगांत आणूं नयेत.

तत्र श्लोकाः

अर्शसां द्विविधं जन्य पृथगायतनानि च ।
स्थानसंस्थानलिंगानि साध्यासाध्यविनिश्चयः॥ २४७ ॥
अभ्यंगाः स्वेदनं धूमाः सावगाहाः प्रलेपनाः ।
शोणितस्यावसेकश्च योगा दीपनपाचनाः ॥ २४८ ॥
पानान्नविधिरग्र्यश्च वातवर्चोऽनुलोमनः ।
योगाः संशमनीयाश्च सर्पींषि विविधानि च ॥ २४९ ॥
बस्तयस्तक्रयोगाश्च वरारिष्टाः सशर्कराः ।
शुष्काणामर्शसां शस्ताः स्राविणां लक्षणानि च ॥ २५० ॥
द्विविधं सानुबंधानां तेषां चेष्टं यदौषधम् ।
रक्तसंग्रहणा योगाः पेष्याश्च विविधात्मकः ॥ २५१ ॥
स्नेहपानविधिश्चाग्र्यो विधिः पानान्नयोश्च यः ।
परिषेकावगाहाश्च प्रदेहाः प्रतिसारणम् ॥ २५२ ॥
अतिवृत्तस्य रक्तस्य विधातव्यं यदुत्तरम् ।
तत्सर्वमिह निर्दिष्टं गुदजानां चिकित्सितम् ॥ २५३ ॥

मूळव्याधीचे दोन प्रकार, निरनिराळीं कारणें, स्थानें, आकृति, लक्षणें, साध्यासाध्य विचार, अभ्यंग, स्वेदनक्रिया, औषधी—पाण्यांत बसविणें, लेप, रक्त काढणें, दीपक-पाचक औषधें, वायु व मलाचें अनुलोमन करणारे खाण्यापिण्याचे पदार्थ, शोधनप्रयोग, निरनिराळीं मूळव्याधनाशक घृतें, बस्ती, ताकाचे प्रयोग, आसवें, अरिष्टें, याप्रमाणें सुक्या मूळव्याधीची चिकित्सा; आणि रक्त्या मूळव्याधीचीं लक्षणें, त्यांत दोन दोषांचा संसर्ग; त्यांची यथाक्रम औषधें, रक्तस्राव बंद करणारीं औषधें व इतर निरनिराळे उपाय, स्नेहपान व अन्नपानविधि, परिषेक, अवगाह, लेप,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मलमें चोळणें, आणि फारच रक्त वाहूं लागलें असतां करावयाचे उपचार इतके सर्व विषय या अध्यायांत सांगितले आहेत.

अर्शश्चिकित्सितो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

---

## अथ दशमोऽध्यायः

अथातोऽतीसारचिकित्सितं व्याख्यास्यामः।
इति हस्माह भगवानात्रेयः ॥ १ ॥

आतां आपण अतीसारचिकित्सा निरूपण करूं. आत्रेयऋषि असेंच सांगते झाले.

भगवन्तं खल्वात्रेयं कृताह्विकं कृताग्निहोत्रमासीनमृषिगणपरिवृतमुत्तरे हिमवतः पार्श्वे विनयादुपेत्याभिवाद्याग्निवेश उवाच—भगवन्नतीसारस्य प्रागुत्पत्तिनिमित्तलक्षणोपशमनानि प्रजानुग्रहार्थमाख्यातुमर्हसीति ॥ २ ॥

एके दिवशीं, अत्रिऋषि हिमालयाच्या उत्तर भागीं आपलें नित्यकर्म व अग्निहोत्रादिक आटपून ऋषिगणांसहवर्तमान स्वस्थ बसले असतां, अग्निवेशांनीं नम्रतापूर्वक प्रणाम करून त्यांस विनंती केली कीं, हे ऋषिवर्य! आपण कृपा करून, लोककल्याणाकरितां, अतीसाराची मूळ उत्पत्ति त्याचीं कारणें, लक्षणें व चिकित्सा हीं सांगावीं.

अथ भगवानात्रेयस्तदग्निवेशवचनमनुनिशम्योवाच-श्रूयतामग्निवेश-सर्वमेतदखिलेन व्याख्यायमानम् । आदिकाले खलु यज्ञेषु पशवः समालभनीया बभूवुर्नारम्भाय प्रक्रियन्तेस्म । ततो दक्षयज्ञप्रत्यवरकालं मनोः पुत्राणां मरिष्यन्नाभागेक्ष्वाकुकुविडचर्यैत्यादीनाञ्च क्रतुषु पशूनामेवाभ्यनुज्ञानात्पशवः प्रोक्षणमवापुः । अतश्च प्रत्यवरकालं पृषध्रेण दीर्घसूत्रेण यजमानेन पशूनामलाभाद्गवामालम्भः प्रावर्तितः । तन्दृष्ट्वाप्रव्यथिता भूतगणास्तेषाञ्चोपयोगादुपकृतानां गवां गौरवादौष्ण्यादसात्म्यत्वादशस्तोपयोगाच्चोपहताग्नीनामुपहतमनसामतीसारः पूर्वमुत्पन्नः पृषध्रयज्ञे ॥ ३ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

याप्रमाणें अग्निवेशाचें भाषण श्रवण करून आत्रेयऋषि म्हणाले, हे अग्निवेश! तूं विचारिलेल्या प्रश्नावर मी सविस्तर निरूपण करितों तें मन लावून ऐक. फार प्राचीन काळीं यज्ञांत पशूंचा वध करीत नसत. फक्त त्यांचा परिग्रह केला जात असे. पुढें दक्षयज्ञानंतर मनूच्या मरिष्यन्, नाभाग, इक्ष्वाकु, कुविडचर्य इत्यादि पुत्रांच्या यज्ञांत व त्यानंतर पशूंच्या अनुमतीनेंच त्यांचा बलि देण्याची प्रथा सुरू झाली. पुढें कांहीं काळानंतर पृषध्रानें एक दीर्घसूत्री यज्ञ केला. त्यावेळीं पशु न मिळाल्यामुळें त्यानें गोवध सुरू केला. याप्रमाणें आपल्यास अत्यंत उपयोगी पडणाऱ्या गाईची ही दशा पाहून सर्व प्राणिमात्रांस अतिशय दुःख झालें. आणि गोमांस खाणाऱ्यांस, तें जड, उष्ण व मनुष्य प्रकृतीस न मानवणारें असल्यामुळें आणि त्याचा अयोग्य उपयोग केल्यामुळें, त्यांचा जठराग्नि मंद होऊन व मनही विकृत होऊन या पृषध्र यज्ञांतच प्रथम अतीसार उत्पन्न झाला.

अथापरं कालं वातलस्य वातातपव्यायामातिमात्रनिषेविणो रूक्षाल्पप्रमिताशिनस्तीक्ष्णमद्यव्यवायनित्यस्योदावर्तयतश्च वेगाद्वायुः प्रकोपमापद्यते पक्ता चोपहन्यते स वायुः कुपितोऽग्नावुपहते मूत्रस्वेदौ पुरीषाशयमुपहृत्य ताभ्यां पुरीषं द्रवीकृत्यातीसाराय प्रकल्पते ॥ ४ ॥

वर अतिसाराची मूळ उत्पत्ति सांगितली. त्यानंतर पुढें हा रोग खालील कारणांनीं उत्पन्न होऊं लागला. वातप्रकृतीच्या मनुष्यानें वारा, ऊन किंवा व्यायाम यांचें अतिशय सेवन; रूक्ष, थोडें व एकाच प्रकारचें (रसाचें) भोजन करणें, नेहमीं कडक दारूचें सेवन करणें, अतिशय स्त्रीसंभोग, किंवा मलमूत्रादिकांचे वेग थांबविल्यानें वायु कुपित होऊन जठराग्नि मंद पडतो. तो प्रकुपित झालेला वायु, अग्नि मंद झाल्याकारणानें मूत्र व घाम यांस मलाशयांत घेऊन जातो व त्यांच्यायोगानें मलास पातळ करून अतिसार उत्पन्न करितो.

---

१ वातातिसारांत रोग्यास लघ्वी व घाम हीं कमी येतात याचें कारण हेंच आहे. शरीरांतील एकंदर जलधातु जो मूत्र व घामरूपानें बाहेर पडावयाचा, त्यांचा मलांत लय होत असल्यामुळें तो मलरूपानेंच बाहेर पडतो असें म्हटलें असतां चालेल.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तस्य रूपाणि विड्जलमाभचिप्लुतमवसादितं रूक्षं द्रवं स शब्दमशब्दं वा विबद्धमूत्रवातमतिसार्यते पुरीषं वायुश्चान्तः कोष्ठस्य सशब्दशूलस्तिर्यक्चरति विबद्ध इत्यामातिसारः ॥ ५ ॥

**आमातिसाराचें लक्षण**—ज्या अतिसारांत मल पाणी व आंवमिश्रित, पाण्यांत पडला असतां बुडणारा, रूक्ष व पातळ असतो, शौचास होतांना पोटांतून गुडगुड शब्द होतो किंवा क्वचित् होतही नाहीं, ज्यांत लघ्वी न होतां व अधोवायु न सरतां शौचास होतें, आणि कोठ्यांत वायु सांचून, तो गुडगुड शब्द व शूल उत्पन्न करून तिरपा फिरतो त्यास आमातिसार ह्मणावें.

वातात्पक्वं विबद्धमल्पाल्पं सशब्दं सशूलफेनपिच्छापरिकर्तिकं हृष्टरोमा विनिश्वसन् शुष्कमुखः कट्यूरुत्रिकजानुशूलपृष्ठशूलीभ्रष्टगुदो मुहुर्मुहुर्विग्रंथितमुपवेश्यते पुरीषं वातात्तमाहुरनुग्रन्थमित्येके वातानुग्रन्थितवर्चस्त्वात् ॥ ६ ॥

**वातातिसाराचें लक्षण**—ज्या अतिसारांत, पक्व, अडखळत, थोडथोडें, पोटांत गुडगुड आवाज करून, पोटांत दुखून, फेंसाळ, बुळबुळीत, मुरडा होऊन वरचेवर व गांठदार किंवा खडा बनून परसाकडे होतें, ज्यांत रोग्याच्या अंगावर कांटा उभा राहतो, दम लागतो, तोंड कोरडें पडतें, आणि कमर, मांड्या, माकडहाड, गुडघे व पाठ या भागांत दुखतें, त्यास वातातिसार म्हणतात. या अतिसारांत वातानें मलांच्या गांठी होत असल्यामुळें, कित्येकांनीं यास अनुग्रन्थातिसार हें नांव दिलें आहे.

पित्तलस्य पुनरम्ललवणकटुकक्षारोष्णतीक्ष्णातिमात्रनिषेविणः प्रतताग्निसूर्यसन्तापोपहतमारुतोपहतगात्रस्य क्रोधेर्ष्याबहुलस्य पित्तं प्रकोपमापद्यते। तत्प्रकुपितं द्रवत्वादूष्माणमुपहत्य पुरीषाशयमाश्रितमौष्ण्याद्द्रवत्वात्सरत्वाच्च भित्वा पुरीषमतिसाराय प्रकल्पते। तस्य रूपाणि हरिद्रहरितनीलकृष्णपित्तोपहितमतिदुर्गंधमतिसार्यते पुरीषं तृष्णा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दाहस्वेदमूर्च्छाशूलब्रध्नसन्तापपाकपरीत इति पित्तातिसारः ॥ ७ ॥

पित्तप्रकृतीच्या मनुष्यानें आंबट, खारट, तिखट, क्षारयुक्त, उष्ण व तीक्ष्ण पदार्थांचें अत्यंत सेवन केल्यानें, अग्नि अथवा सूर्याचें प्रखर ऊन, व गरम वाऱ्याचा शरीरावर परिणाम झाल्यानें आणि फार राग व ईर्षा बाळगल्यानें, त्याचें पित्त कुपित होतें. तें कुपित झालेलें पित्त आपल्या पातळपणाच्या योगानें अग्नीस मंद करून मलाशयांत जातें व तेथें आपली उष्णता, पातळपणा व वाहकता किंवा रेचकतेच्या योगानें मलास पातळ करून अतिसार उत्पन्न करितें. यास पित्तातिसार ह्मणतात. पित्तातिसाराचीं लक्षणें—यांत मलाचा रंग हळदीसारखा, हिरवा, निळा किंवा काळा असतो. यांत पित्त मिश्रित असतें व यास फार दुर्गंधि येते. यांत तहान लागते, दाह होतो घाम येतो, मूर्च्छा येते, मलद्वारांत दुखतें व आग होते, जांघाडे फुगतात व दुखतात आणि गुदद्वार पिकतें.

श्लेष्मलस्य तु गुरुमधुरशीतस्निग्धोपसेविनः सम्पूरकस्याचिन्तयतो दिवास्वप्नपरस्यालसस्य श्लेष्मा कोपमापद्यते । स स्वभावाद्गुरुमधुरशीतस्निग्धः स्रस्तोऽग्निमुपहत्यसौम्यस्वभावात्पुरीषाशयमुपहत्योपक्लेद्य पुरीषमतिसाराय कल्पते । तस्य रूपाणि स्निग्धंश्वेतं पिच्छिलं तन्तुमदामं गुरुदुर्गन्धश्लेष्मोपहितमनुबद्धशूलमल्पाल्पमभीक्ष्णमतिसार्यते सप्रवाहिकं गुरूदरगुदबस्तिवंक्षणोद्देशः कृतेप्यकृतसंज्ञो भवति सलोमहर्षः सोत्क्लेशो निद्रालस्यपरितः सादनोऽन्नद्वेषी चेति श्लेष्मातिसारः ॥ ८ ॥

पित्तप्रकृतीच्या मनुष्यानें जड, गोड, थंड व चिकणे पदार्थ फार खाल्ल्यानें, पोटभर किंवा त्याहूनही थोडें अधिक जेऊन निश्चिन्तपणें दिवसा निजण्याचा अभ्यास ठेवल्यानें व नेहमीं आळशी राहिल्यानें, त्याचा कफ कुपित होतो. कफ स्वाभाविकच जड, मधुर, थंड, चिकणा व शिथिल असल्यामुळें जठराग्नीस क्षीण करून, आपल्या सौम्य स्वभावानें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मलाशयांत जाऊन मलास पातळ करून अतिसार उत्पन्न करितो. कफा-तिसाराचीं लक्षणें—या अतिसारांत चिकट ( स्निग्ध ), पांढरें, बुळ-बुळीत, तारदार ( तन्तुयुक्त ) अपक्व, दुर्गंधी, कफयुक्त असें वरचेवर थोडें थोडें, मुरडा होऊन व पाण्यासारखें पातळ परसाकडे होतें. पोट, गुद, बस्ति व जांघाडे जड होतात, शौचास झालें तरी झालेंसें वाटत नाहीं, अंगावर कांटे उभे राहतात, मळमळ होते, झोंप व सुस्ति येते, अंग गळतें आणि अन्नावर रुचि उत्पन्न होते.

अतिशीत-स्निग्ध रूक्षोष्ण-गुरु-खर-कठिन-विषम विरुद्धा-सात्म्यभोजनाद्भोजनात्कालातीतभोजनाद्यत्किञ्चिदभ्य-वहरणाद्दुष्टमद्यपीनायपानादितमद्यपानादसंशोधनात्प्र-तिकर्मणांविषमगमनादनुपचाराज्ज्वलनादित्यपवनसलि-लातिसेवनादस्वप्नादतिस्वप्नोद्वेगविधारणादृतुविपर्ययाद-यथाबलमारंभाद्भयशोक चित्तोद्वेगातियोगात्क्रमिशो-षज्वराशोंविकारातिकर्शनाद्वा विपन्नाग्नेस्त्रयो दोषाः प्रकुपिता भूय एवाग्निमुपहत्यामपक्वाशयमनुप्रविश्या-तीसारं सर्वदोषलिङ्गं जनयन्ति ॥ ९ ॥

अतिशय थंड, स्निग्ध, रूक्ष, उष्ण, जड, तीक्ष्ण, कठिण, अवेळीं, अप्रमाणांत, परस्पर विरुद्ध किंवा प्रकृतीस न मानणारें असें भोजन केल्यानें, उपास केल्यानें, अकाली जेवल्यानें, थोडें जेवल्यानें अर्थात् भूक मारल्यानें, बिघडलेलें मद्य किंवा पाणी प्याल्यानें, अतिशय मद्यपानानें, मलशुद्धि न झाल्यानें, वमन-विरेचनादिकांचा विपरीत योग झाल्यानें, त्याची उपचार न करितां उपेक्षा केल्यानें, अग्नि, सूर्य, वायु किंवा पाणी यांचें अतिसेवन केल्यानें, जागरणानें अति झोंपण्यानें, मलमूत्रादिकांचे वेग थांबविल्यानें, ऋतुविपर्ययानें, आपल्या शक्तीच्या बाहेरचें काम करण्यानें, अतिशय भय, शोक किंवा उद्विग्नता प्राप्त झाल्यानें, पोटांत जंत वगैरे कृमि झाल्यानें, क्षयानें, ज्वरानें, किंवा मूळव्याधीपासून अति-शय कृशता आल्यानें, मंदाग्नि मनुष्याचे तिन्ही दोष प्रकुपित होऊन ते अग्नीस अधिक क्षीण करितात आणि पक्वाशयांत प्रवेश करून अतिसार

 CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

उत्पन्न करितात. हा त्रिदोषातिसार होय. यांत पूर्वीं तिन्ही दोषांचीं निरनिराळीं सांगितलेलीं सर्व लक्षणें एकत्र होतात.

अपि च शोणितादीन्धातूनतिप्रदुष्टान्दूषयन्तो धातुदोषस्वभावकृतानतीसारवर्णानुपदर्शयन्ति ॥ तत्र शोणितादिषु धातुष्वतिप्रदुष्टेषु हारिद्रहरितनीलमाञ्जिष्ठमांसधावनसन्निकाशं रक्तं कृष्णं श्वेतं वराहमेदःसदृशमनुवद्धवेदनमवेदनं वा समासव्यत्यासादुपवेश्यते शकृद्ग्रथितमामं सकृत्सकृदपि पक्वमनतिक्षीणमांसशोणितवलो मन्दाग्निर्विहितमुखरसस्तादृशमातुरं कृच्छ्रसाध्यं विद्यात् ॥१०॥

प्रकुपित झालेले त्रिदोष अगोदरच अतिशय दूषित झालेल्या रक्तादि धातूंस अधिक दूषित करितात व त्या धातूंच्या दोषाच्या स्वभावानुसार अतिसाराचा ( मलाचा ) निरनिराळा रंग बनतो. रक्तादि धातु अत्यंत दूषित झाले असतां मलाचा रंग हळदीसारखा, हिरवा, निळा, मंजिष्ठासारखा, मांसाच्या धुवणासारखा तांबडा, काळा, पांढरा, किंवा डुकराच्या चरबीच्या रंगाचा असा होतो. शौचास बसतांना पोटांत मुरडा होतो किंवा क्वचित् होतही नाहीं. शौचास कधीं घट्ट होतें व कधीं पातळ होतें. कधीं आंव पडते. कधीं पक्व मल निघतो. अशा प्रकारच्या रोग्याच्या शरीरांतील रक्त, मांस व बल हीं अत्यन्त क्षीण झालेलीं असतात, अग्नि मंद असतो व तोंडास रुचि नसते. अशा प्रकारचा रोगी कष्टसाध्य समजावा.

एभिर्वर्णैरतिसार्यमाणं सोपद्रवमातुरमसाध्योयमिति प्रत्याचक्षीत । तद्यथा—काथशोणिताभं यकृत्पिण्डोपममांसोदकसन्निकाशं दधिघृतमज्जतैलवसाक्षीरवेसवाराभमतिनीलमतिरक्तमतिकृष्णमुदकमिवाच्छं पुनर्मेचकाभमतिस्निग्धं हरितनीलकषायवर्णं कर्बुरमाविलं तन्तुमदाम चंद्रकोपहितमतिकुणपपूतिपूयगन्धमाममत्स्यगन्धं मक्षिकाक्रान्तं कथितवहुधातुद्रवमल्पपुरीषमपुरीषं हातिसार्यमाणं तृष्णादाज्वरभ्रमतमकहिक्काश्वासानुबद्धमतिवेदनमवेदनं वा स्रस्तपक्वगुदं पतितगुदवालिं मुक्तनालमतिक्षीणबलमांसशोणितबलं सर्वपार्श्वास्थिशूलिनमरोचिकार्तिप्रलापसंमोहपरीतं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सहसोपरतविकारमतिसारिममचिकित्स्यं विद्यादिति सन्निपातातिसारः ॥ ११ ॥

ज्या अतिसारी रोग्याच्या विष्ठेचा रंग पुढें लिहिल्याप्रमाणें असतो व त्या अतिसारांत उपद्रवही होत असतात, तो रोगी असाध्य जाणावा. विष्ठेचा रंग काळा, रक्त, यकृत् ( Liver ), मांसाचें धुवण, दही, तूप, मज्जा, तेल, चर्बी, दूध किंवा मसाला ( आमटींत घालावयाचा ) यांच्या सारखा असेल; अतिशय निळा, अतिशय तांबडा, अत्यंत काळा, पाण्याप्रमाणें स्वच्छ, गाढ निळा अर्थात् मोराच्या पिसाऱ्यावरील डोळ्यांच्या रंगाप्रमाणें, अतिशय चिकचिकीत, हिरवा, निळा, गाढ तांबूस, अनेकरंगमिश्रित किंवा पाऱ्याच्या रंगासारखा, गढूळ, तारदार किंवा अपंक असा असेल, पाण्यांत तेलाचा थेंब टाकिला असतां जसें चंद्राकृति वर्तुल बनतें त्या स्वरूपाची विष्टा असली, त्यास जळणाऱ्या प्रेताप्रमाणें, सडकी किंवा पुवाप्रमाणें घाण येत असली, कच्च्या माशांप्रमाणें वास येत असला, त्याच्यावर माशा फार जमत असल्या, अनेक धातु कथित् केल्या असतां त्याच्या रंगाप्रमाणें असल्यास, शौचांत विष्टा थोडी असल्यास किंवा मुळींच नसून नुस्तेंच पाणी असल्यास, आणि अशा प्रकारच्या अतिसारी रोग्यास तृषा, दाह, ताप, भ्रम, तमक ( श्वास ), उचकी, श्वास हे विकार होत असल्यास, शूल होऊन किंवा क्वचित् शूलावांचूनही शौचास होत असल्यास, गुदद्वार शिथिल पडलें असल्यास किंवा पिकलें असल्यास, गुदद्वारांतील वळ्या पडून गेल्या असल्यास, नाल ( गुदद्वाराचें मुख ) बाहेर निघून आलें असल्यास; शरीरांतील रक्त, मांस, बल अत्यंत क्षीण झालें असल्यास आणि बरगड्यांत व हाडांत शूल, अरुचि, अतिशय बडबड, भ्रम इत्यादि विकार होत असल्यास किंवा होत असलेले हे सर्व विकार एकाएकीं बंद झाल्यास तो रोगी असाध्य समजावा. हीं सन्निपातिक अतिसाराचीं लक्षणें होत.

तमसाध्यतामसंप्राप्तं चिकित्सेद्यथा प्रथानोपक्रमेण हेतूपशयदोषविशेषपरीक्षया चेति ॥ १२ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अतिसार असाध्य झाला नाहीं तोंच त्याची हेतु उपशय व दोष यांच्या द्वारां परीक्षा करून जो प्रधानदोष असेल त्याची चिकित्सा करावी.

आगन्तू द्वावतीसारौ मानसौ भयशोकजौ ।
तत्तयोर्लक्षणं वायोर्यदतीसारलक्षणम् ॥ १३ ॥

आगन्तु अतिसार—वर जे चार प्रकारचे अतिसार सांगितले ते शारीरिक अतिसार होत. त्यांशिवाय भय व शोकापासून होणारे अथवा मानसिक असे आणखीं दोन प्रकारचे अतिसार आहेत. त्यांचीं लक्षणें वातजन्य अतिसाराच्या लक्षणांप्रमाणेंच समजावीं.

मारुतो भयशोकाभ्यां शीघ्रं हि परिकुप्यति ।
तयोः क्रिया वातहरा हर्षणाश्वासनानि च ॥ १४ ॥

भय व शोकाच्या योगानें वायु तत्काल प्रकुपित होऊन अतिसार उत्पन्न करितो. यांत वातनाशक क्रिया कराव्या, रोग्यास हर्ष उत्पन्न होईल अशा गोष्टी कराव्या आणि त्याचें सांत्वन करावें.

इत्युक्तः षडतीसाराः साध्यानां साधनं त्वतः ।
प्रवक्ष्याम्यानुपूर्वेण यथावत्तन्निबोधत ॥ १५ ॥
दोषाः सन्निचिता यस्य विदग्धाहारमूर्च्छिताः ।
अतीसाराय कल्पन्ते भूयस्तान्सम्प्रवर्तयेत् ॥ १६ ॥
न तु संग्रहणं देयं पूर्वमामातिसारिणे ।
विबध्यमानाः प्राग्दोषा जनयन्त्यामयान्बहून् ॥ १७ ॥
शोथपाण्ड्वामयप्लीहकुष्ठगुल्मोदरज्वरान् ।
दण्डकालसकाध्मानग्रहण्यर्शोगदांस्तथा ॥ १८ ॥
तस्मादुपेक्षेतोत्क्लिष्टान्वर्तमानान्स्वयं मलान् ।
कृच्छ्रं वा वहतान्दद्यादभयां सम्प्रवर्तिनीम् ॥ १९ ॥
तया प्रवाहिते दोषे प्रशाम्यत्युदरामयः ।
जायते देहलघुता जठराग्निश्च वर्धते ॥ २० ॥

याप्रमाणें हे सहा प्रकारचे अतिसार वर्णन केले. आतां यापुढें क्रमानें साध्य अतिसारांची चिकित्सा निरूपण करितों. ती लक्ष्यपूर्वक श्रवण कर. ज्या मनुष्याचे वाढलेले वातादिक दोष पक्व व अपक्व आहाराच्या मिश्रणाशीं मिळून अतिसार उत्पन्न करितात, त्याचे ते दोष

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चांगले प्रवृत्त करावे ह्मणजे रेचनद्वारां ते चालू करावे. या आमातिसारांत प्रथम जुलाब बंद करणारीं ( स्तंभक ) औषधें अगदीं देऊं नयेत. कारण या पहिल्या अवस्थेंतील अपक दोषांचा अवरोध केल्यास–त्यापासून पांडुरोग, प्लीहा, कुष्ठ, गुल्म, उदर, ताप, दंडक (वायूनें सर्व शरीर लांकडांप्रमाणें ताठणें ), अलसक, पोटफुगी, संग्रहणी व मूळव्याध इत्यादि नानाप्रकारचे रोग उत्पन्न होतात. ह्मणून आपोआपच रेचन होऊन दूषित मल बाहेर निघून जात आहेत हें फार चांगलें असें समजून त्यास बंद करण्याचा उपाय करूं नये. इतकेंच नव्हे, तर जर शौचास थोडथोडें होत असेल तर त्यायोगानें पोट फुगून राहील व जडपणा येईल ह्मणून साफ रेचनाकरितां हिरड्याचा उपयोग करावा. याच्या योगानें सर्व दोष साफ निघून जाऊन उदरस्थ विकार नाहींसा होतो, अंग हलकें होतें व जठराग्नि प्रदीप्त होतो.

प्रमथ्यां मध्यदोषाणां दद्याद्दीपनपाचनीम् ।
लंघनञ्चाल्पदोषाणां प्रशस्तमतिसारिणाम् ॥ २१ ॥
पिप्पली नागरं धान्यं भूतीकमभया वचा ।
ऱ्हीवेरं भद्रमुस्तानि बिल्वं नागरधान्यकम् ॥ २२ ॥
पृश्निपर्णीश्वदंष्ट्रा च समंगा कण्टकारिका ।
तिस्रः प्रमथ्या विहिताः श्लोकार्धेष्वतिसारिणाम् ॥ २३ ॥

ज्या अतिसारी रोग्याचे दोष मध्यम प्रमाणानें वाढलेले असतील त्यांस दीपन व पाचनार्थ प्रमथ्या द्यावी. अल्पदोषी रोग्यानें उपास करणें हा उत्तम उपाय होय. १ पिंपळी, सुंठ, धने, ओवा, बाळहिरडे व वेखंड; २ वाळा, भद्रमोथा, बेलफळाचा गर, सुंठ, व धने; ३ आणि पिठवण, गोखरूं, मंजिष्ठ व रिंगणमूळ, हे अर्ध्या अर्ध्या श्लोकांत सांगितलेले तीन प्रमथ्या प्रयोग अतिसारांत योजावे.

वचाप्रतिविषाभ्यां वा मुस्तपर्पटकेन वा ।
ऱ्हीवेरशृङ्गवेराभ्यां पक्कं वा पाययेज्जलम् ॥ २४ ॥

---

१ वाटलेल्या द्रव्यांच्या काढयास प्रमथ्या असें नांव आहे. " कृतयूषः प्रमथ्याच द्रव्य स्कल्कीकृताच्छृतः " असें याचें लक्षण आहे. यास कृतयूष असेंही ह्मणतात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

युक्तेऽन्नकाले क्षुत्क्षामं लघून्यन्नानि भोजयेत् ।
तथा स शीघ्रमाप्नोति रुचिमग्निबलं बलम् ॥ २५ ॥
तक्रेणावन्ति सोमेन यवाग्वा तर्पणेन वा ।
सुरया मधुना चादौ यथासात्म्यमुपाचरेत् ॥ २६ ॥
यवागूभिर्विलेपीभिः खडैर्यूषैरसौदनैः ।
दीपनग्राहिसंयुक्तैः क्रमश्च स्यादतः परम् ॥ २७ ॥

अथवा वेखंड व अतिविष, किंवा नागरमोथा आणि पित्तपापडा अथवा वाळा व माळें हीं औषधें टाकून उकळलेलें पाणी प्यावयास द्यावें. अतिसारांत चांगली भूक लागल्यावर हलकें अन्न खावयास द्यावें ह्मणजे लवकरच रोग्याच्या तोंडास रुचि येते, त्याचा अग्नि प्रदीप्त होतो व शरीरही बळवान् होतें. अशा प्रकारच्या जेवणावर रोग्याचें सात्म्य पाहून ताक, कांजी, यवागु, तर्पण, सुरा किंवा द्राक्षमद्य यांपैकीं जें जें योग्य दिसेल तें बदलून बदलून द्यावें. यानंतर पुढें सांगितलेलीं दीपक व संग्राहक औषधें मिळवून तयार केलेली कण्हेरी, आटवल, खडयूषें, मांसरस व भात वगैरे द्यावा.

शालिपर्णीं पृश्निपर्णीं बृहतीं कण्टकारिकाम् ।
बलां श्वदंष्ट्रां बिल्वानि पाठां नागरधान्यकम् ॥ २८ ॥
शुंठी पलाशं हपुषां वचाजीरकपिप्पलीम् ।
यवानीं पिप्पलीमूलं चित्रकं हस्तिपिप्पलीम् ॥ २९ ॥
वृक्षाम्लं दाडिमाम्लञ्च सहिंगुविडसैन्धवम् ।
प्रयोजयेदन्नपाने विधिना सूपकल्पितम् ॥ ३० ॥
वातश्लेष्महरो ह्येष गणो दीपनपाचनः ।
ग्राही बल्यो रोचनश्च तस्माच्छस्तोऽतिसारिणाम् ॥ ३१ ॥

रानगांजा, रानभाल, रिंगणी, चिकणा, गोखरू, बेलफळाचा गर, पहाडमूळ, सुंठ, धने, पळस, शेरणी, वेखंड, जिरें, पिंपळी, ओंवा, पिंपळीमूळ, चित्रक, गजपिंपळी, आमसोल ( कोकम ) व डाळिंब या द्रव्यांचा हिंग, बिडलोण व सैंधव यांबरोबर खाण्यापिण्याच्या पदार्थांत यथाविधि उपयोग करावा. हीं सर्व औषधें वात व कफनाशक, दीपक, पाचक, संग्राहक, बलकारक, व रुचिकर आहेत; आणि ह्मणूनच अतिसारांत वापरण्यास प्रशस्त आहेत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आमे परिणते यस्तु विबद्धमतिसार्यते ।
सशूलपिच्छमल्पाल्पं बहुशः सप्रवाहिकम् ॥ ३२ ॥
तं मूलकानां यूषेण बदराणामथापि वा ।
उपोदिकायाः क्षीरिण्या यवान्या वास्तुकस्य वा ॥ ३३ ॥
सुवर्चलायाश्चञ्चोर्वा शाकेनावल्गुजस्यवा ।
शट्याः कर्कारुकाणां वा जीवन्त्याश्चिर्भटस्य वा ॥ ३४ ॥
लोणीकायाः सपाठायाः शुष्कशाकेन वा पुनः ।
दधिदाडिमसिद्धेन बहुस्नेहेन भोजयेत् ॥ ३५ ॥
कल्कः स्याद्बालबिल्वानां तिलकल्कश्च तत्समः ।
दध्नः सरोऽम्लस्नेहाढ्यः खडो हन्यात्प्रवाहिकाम् ॥ ३६ ॥
यवानां मुद्गमाषाणां शालीनाञ्च तिलस्य च ।
कोलानां बालबिल्वानां धान्ययूषं प्रकल्पयेत् ॥ ३७ ॥
ऐकध्यं यमके भृष्टं दधिदाडिमसाधितम् ।
वर्चः क्षये शुष्कमुखं शाल्यन्नं तेन भोजयेत् ॥ ३८ ॥
दध्नःसरं वा यमके भृष्टं सगुडनागरम् ।
सुरां वा यमके भृष्टां व्यञ्जनार्थं प्रदापयेत् ॥ ३९ ॥
फलाम्लं यमके भृष्टं यूषं गृञ्जनकस्य वा ।
लोपाकरसमम्लं वा स्निग्धाम्लं कच्छपस्य वा ॥ ४० ॥
बर्हितित्तिरिदक्षाणां वर्तकानां तथा रसः ।
स्निग्धाम्लः शालयश्चाग्र्या वर्चःक्षयरुजापहाः ॥ ४१ ॥

ज्याचा आम पक्क होऊन त्यास कुंथत कुंथत, मुरडा होऊन, बुळबुळीत, थोडथोडें, वरचेवर व नुसत्या फेंसदार पाण्याचे जुलाब होऊं लागतात त्यास मुळे किंवा बोरांचें कढण अथवा थोर मायाळु, रांजणी, ओंवा, चाकवत, सूर्यमुखी, चोंच, बावची, कचोरा, कोहोळा, धाकटी हरणदोडी, चिंवूड, चुका व पहाडमूळ यांची सुकी भाजी, दहीं, डाळिंबाच्या दाण्याची आंबटाण व पुष्कळसें तूप घालून तयार करून खावयास द्यावी. कोंवळ्या बेलफळाचा गर आणि तीळ समभाग घेऊन वाटावे आणि त्यांत दह्यावरची साय, डाळिंबाचा रस व तूप वगैरें टाकून त्याचा खडयूष करून दिला असतां प्रवाहिका ह्मणजे नुस्तें फेंसाळ पाणी पडणें बंद होतें. अतिशय जुलाब होऊन ज्याच्या शरी-

१ गंगाधर शास्त्र्यांच्या मतें गोरखकांकडी.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रांतील मल नाहींसा झाला असेल अर्थात् परसाकडच्या वेळीं नुस्तें फेंसाळ पाणी पडत असेल व ज्याच्या तोंडास कोरड पडत असेल, अशा रोग्यास जव, मूग, उडीद, साळी, तीळ, बोरें व बाळबेलफळें, यांचा कल्क करून त्यांत दहीं व डाळिंबाचा रस मिळवून कढण करून त्यास तेलतुपाच्या मिश्रणाची फोडणी देऊन त्याबरोबर तांबड्या साळींच्या तांदळाचा भात खाऊं घालावा. किंवा तेल-तुपाच्या मिश्रणांत गूळ व सुंठमिश्रित दह्यावरची साय फोडणीस टाकून तिच्याबरोबर साळींचा भात जेऊं घालावा. अथवा तेल-तुपाच्या मिश्रणांत सुरा तयार करून भाताबरोबर द्यावी. अथवा डाळिंबाची आंबटाण टाकून लसणीचें कढण करून त्यास तेल-तुपाची फोडणी देऊन त्याच्या बरोबर भात जेवावा. खोंकडाच्या मांसाचा डाळिंबाची आंबटाण टाकून केलेला शोरुवा, किंवा कांसव, मोर, तित्तिर, कोंबडा, बटेर यांच्या मांसाचे स्निग्ध व आंबट शोरुवे करून त्यांबरोबर तांबड्या साळींचा भात जेवावा म्हणजे मलक्षयापासून होणारे सर्व विकार नाहींसे होतात.

अन्तराधिरसं पुत्वा रक्तं मेषस्य चोभयम् ।
पचेद्दाडिमसाराम्लं सधान्यस्नेहनागरम् ॥ ४२ ॥
भोजनं रक्तशालीनां तेनाद्यात्प्रपिबेच्च तत् ।
तथा वर्चः क्षयकृतैर्व्याधिभिर्विप्रमुच्यते ॥ ४३ ॥
गुदनिःसरणे शूले पानमम्लस्य सर्पिषः ।
प्रशस्यते निरामाणामथवाऽप्यनुवासनम् ॥ ४४ ॥

मेंढ्याच्या कोठ्यांतील मांसाचा शोरुवा करून त्यांत मेंढ्याचेंच रक्त मिळवून तें मिश्रण गाळून घ्यावें आणि त्यांत डाळिंबाचा रस, धने व सुंठ हीं टाकून तें मिश्रण शिजवावें आणि शेवटीं त्यास तुपाची फोडणी देऊन त्याबरोबर तांबड्या साळींचा भात खावा व तें नुसतेंही प्यावें. याच्या योगानें फार जुलाब होऊन मल क्षीण झाल्या कारणानें होणारे विकार नाहींसे होतात. जुलाबांच्या योगानें गुदद्वाराचें मांस बाहेर निघालें असल्यास व शूल होत असल्यास तुपांत डाळिंबाचा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रस अथवा दुसरी आंबटाण टाकून तें प्यावयास द्यावें किंवा जर त्या रोग्याच्या उदरांतून सर्व आमदोष निघून गेला असेल तर त्यास अनुवासन बस्ति द्यावा.

चाङ्गेरीकोलदध्यम्लनागरक्षारसंयुतम् ।
घृतमुत्कथितं पेयं गुदभ्रंशरुजापहम् ॥ ४५ ॥

चाङ्गेरीघृत— चुका, बोरें, दहीं, डाळिंबाचा रस, सुंठ व जवखार हीं औषधें मिळवून कढविलेलें तूप प्यावयास दिलें असतां गुदद्वार बाहेर येणें व त्यापासून होणारे अन्य विकार नाहींसे होतात.

सचव्यपिप्पलीमूलं सव्योषविडदाडिमम् ।
पेयमम्लं घृतं युक्त्या साधान्याजाजिचित्रकम् ॥ ४६ ॥

चव्यादिघृत—चवक, पिंपळीमूळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, बिडलोण, डाळिंबाचा रस, धने, जिरें व चित्रक या औषधांनीं सिद्ध केलेलें घृतही उपरोक्त गुण करितें.

दशमूलोपसिद्धं वा सबिल्वमनुवासनम् ।
शताह्वाशटिबिल्वैर्वा वचया चित्रकेण वा ॥ ४७ ॥
स्तब्धभ्रष्टो गुदे पूर्वं स्नेहस्वेदौ प्रयोजयेत् ।
सुस्विन्नश्च मृदुभूतं पिचुना संप्रवेशयेत् ॥ ४८ ॥

रानगांजा, रानभाल, रिंगणी, डोरली, गोखरूं, बेल, ऐरण, टेंटू, पहाड, व शीवण ही दशमुळें व कोंवळ्या बेलफळाचा गर यांनीं सिद्ध केलेला अथवा शोपा, कचोरा व बेलफळाचा गर यांचा, किंवा वेखंड व चित्रक यांनीं तयार केलेला अनुवासनबस्ति दिल्यानें गुदभ्रंश इत्यादि विकार नाहींसे होतात. मलद्वार ताठरलें असेल अथवा बाहेर आलें असेल तर त्यास तेल किंवा तूप लावून शेकून घाम आणावा ह्मणजे तें नरम होईल. आणि नरम झालें ह्मणजे मग कापसाच्या बोळ्यानें आंत सारावें.

विबद्धवातवर्चास्तु बहुशूलप्रवाहिकः ।
सरक्तपिच्छस्तृष्णार्तः क्षीरसौहित्यमर्हति ॥ ४९ ॥


CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यमकस्योपरिक्षीरं धारोष्णं वा पिबेन्नरः ।
शृतमैरण्डमूलेन बालबिल्वेन वा पयाः ॥ ५० ॥
एवं क्षीरप्रयोगेण रक्तंपिच्छाऽवशाम्यति ।
शूलं प्रवाहिका चैव विबन्धश्चोपशाम्यति ॥ ५१ ॥

ज्याचा अधोवायु व मल बद्ध झाला असेल, ज्यास फार शूल होऊन नुस्त्या फेंसाळ पाण्याचे जुलाब होत असतील, ज्यास रक्त व आंव पडत असेल व तहान फार लागत असेल त्यानें यथेच्छ—पोटभर दूध प्यावें किंवा तूप व तेल यांचें मिश्रण पिऊन त्यावर धारोष्ण ( काढतां क्षणींच जसें असतें तसें ) दूध प्यावें. किंवा एरंडमूळ अथवा कोंवळ्या बेल-फळाचा गर दुधांत टाकून तें आटवून प्यावें. या दुधाच्या प्रयोगांनीं वर सांगितलेले रक्त, आंव, शूल, फेंसाळ पाण्याचे जुलाब व मलावरोध हे विकार शांत होतात.

पित्तातिसारं पुनर्दिदानोपशयाकृतिभिरामान्वयमुप-लभ्य यथाबलं लंघनपाचनाभ्यामुपाचरेत् तृष्यतस्तु मुस्तपर्पटकोशीरशारिवाचन्दनकिराततिक्तकोदीच्य-वारिभिरुपचारो लंघितस्य चाहारकाले बलातिबला-सूप्यशालिपर्णीपृश्निपर्णीबृहतीकण्टकारिकाशतावरी-श्वदंष्ट्रा निर्यूहसंयुक्तेन यथासात्म्यं यवागूमण्डादिना तर्पणादिना वा क्रमेणोपचारः। मुद्गमसुरहरेणुमकुष्ठक-यूषैर्वा वकपिञ्जलशशहरिणैणयकालपुच्छकरसैरी-षदम्लैर्वाक्रमशोऽग्निं सन्धुक्षयेदनुबन्धत्वे त्वस्य दीप-नीयपाचनीयोपशमनीयसंग्रहणीयान्योगान्प्रयोजयेदिति ॥५२॥

पित्तातिसारांत निदान, उपशय ( अनुकूलप्रतिकूल आहारविहार ) व लक्षणें यांच्या द्वारा जर रोग्याच्या उदरांत आम भरलेला आहे असें कळून आलें तर त्याच्याकडून प्रथम त्याच्या शक्त्यनुसार लंघन, पाचन करवावें. फार तहान लागत असल्यास नागरमोथा, पित्तपापडा, काळा वाळा, उपळसरी, चन्दन, कडूकिराईत व वाळा ( सुगंधी ) हीं औषधें पाण्यांत उकळून तें पाणी प्यावयास द्यावें. लंघनानंतर खावयास द्याव-याचें तें यवागू पेज वगैरेपैकीं जें जें ज्यास मानवत असेल तें चिकण

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पेटारी, रानगांजा, रानभाल, रिंगणी, शतावरी व गोखरूं यांच्या मुळांच्या काढ्यांत तयार करून द्यावें. किंवा तर्पण वगैरे क्रमानें उपचार करावे. नंतर मूग, मसुर, वाटाणे, यांचीं कढणें, किंवा लावा, तित्तिर, ससा, हरिण, काळें हरिण, व कालपुच्छ यांचे मांसरस, किंचित् आंबटाण टाकून किंवा आंबटपणावांचून, क्रमाक्रमानें देऊन जठराग्नि प्रदीप्त करावा. हे सर्व उपाय करूनही कांहीं विकार शिल्लक राहिल्यास दीपक, पाचक, शामक व संग्राहक औषधांचा उपयोग करावा.

सक्षौद्रातिविषं पिष्ट्वा वत्सकस्य फलत्वचम् ।
पिबेत्पित्तातिसारघ्नं तण्डुलोदकसंयुतम् ॥ ५३ ॥
किराततिक्तकं मुस्तं वत्सकः सरसाञ्जनः ।
बिल्वं दारुहरिद्राञ्च त्वग्ह्रीवेरं दुरालभम् ॥ ५४ ॥
चन्दनञ्च मृणालञ्च नागरं रोध्रमुत्पलम् ।
तिला मोचरसो रोध्रं समङ्गा कमलोत्पलम् ॥ ५५ ॥
उत्पलं धातकीपुष्पं दाडिमत्वङ्महौषधम् ।
कट्फलं नागरं पाठा जंब्वाम्रास्थि दुरालभाः ॥ ५६ ॥
योगाः षडेते सक्षौद्रास्तण्डुलोदकसंयुताः ।
पेयाः पित्तातिसारघ्नाः श्लोकार्धेन निदर्शिताः ॥ ५७ ॥

अतिविष, इंद्रजव व कुड्याची साल पाण्यांत वाटून तांदळांचें धुवण व मधांतून घेतल्यानें पित्तातिसार नाहींसा होतो. ( १ ) कडूकिराईत, नागरमोथा, इंद्रजव व रसांजन, ( २ ) बेलफळाचा गर, दारुहळद, दालचिनी, वाळा व धमासा ( ३ ) चन्दन, कमळाची देठी, सुंठ, लोध्र व निळें कमळ, ( ४ ) तीळ, सांवरीचा डीक, लोध्र, लाजाळू आणि पांढरें व निळें कमळ, ( ५ ) निळें कमळ, धायटीचीं फुलें, डांळिंबाची साल व सुंठ, ( ६ ) कायफळ, सुंठ, पहाडमूळ, जांभळाची बी, आंब्याची कोय, व धमासा; याप्रमाणें अर्ध्या अर्ध्या श्लोकांत सांगितलेले हे सहा औषधिप्रयोग मध व तांदुळांचें धुवण यांबरोबर सेवन केल्यानें पित्तातिसार दूर होतो.

जीर्णौषधानां शस्यन्ते यथायोगं प्रकल्पितैः ।
रसैः सांग्राहिकैर्युक्ताः पुराणा रक्तशालयः ॥ ५८ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पित्तातिसारो दीप्ताग्नेः क्षिप्रं समुपशाम्यति।
आजक्षीरप्रयोगेन बलं वर्णश्च वर्द्धते ॥ ५९ ॥
बहुदोषस्य दीप्ताग्नेः सप्राणस्य न तिष्ठति।
पैत्तिको यद्यतीसारः पयसा तं विरेचयेत् ॥ ६० ॥
पलाशफलनिर्यूहं पयसा पाययेत तम्।
ततोऽनुपाययेत्कोष्णां क्षीरमेव यथाबलम् ॥ ६१ ॥
प्रवाहिते तेन मले प्रशाम्यत्युदरामयः
पलाशवत्प्रयोज्या वा त्रायमाणा विशोधिनि ॥ ६२ ॥

हीं औषधें पचल्यानंतर त्या त्या औषधांच्या संयोगानें तयार केलेल्या अशा संग्राहक मांसरसांबरोबर जुन्या लाल साळीच्या तांदुळांचा भात खावयास द्यावा. अग्नि प्रदीप्त झाला म्हणजे पित्तातिसार त्वरित बरा होतो. नंतर त्यास बकरीचें दूध देत जावें. त्याच्या योगानें त्याचें बल व वर्ण हीं वाढतील. जर एखाद्या रोग्याचे दोष फारच वाढलेले असल्यामुळें पित्तातिसार इतर उपायांनीं थांबत नसेल आणि रोगी सशक्त असून त्याचा जठराग्नि प्रदीप्त असेल तर त्यास दुधाबरोबर विरेचन द्यावें. त्यास पळसाच्या फळांचा काढा दुधाबरोबर द्यावा व वरूनही कोमट दूध रोग्याच्या शक्तीप्रमाणें पाजावें. यापासून जुलाब होऊन मल निघून जाऊन उदररोग शांत होतो. रेचनाकरितां पळसाच्या फळाऐवजीं त्रायमाणाचा उपयोग केला तरी चालेल.

संसर्ग्यां क्रियमाणायां शूलं यद्यनुवर्तते।
स्रुतदोषस्य तं शीघ्रं यथावह्न्यनुवासयेत् ॥ ६३ ॥
शतपुष्पावरीभ्याश्च पयसा मधुकेन च।
तैलपादं घृतं सिद्धं सबिल्वमनुवासनम् ॥ ६४ ॥
कृतानुवासनस्यापि कृतसंसर्जनस्य च।
वर्तते यद्यतीसारः पिच्छाबस्तिरतः परम् ॥ ६५ ॥

विरेचन होऊन पेयादिक्रम आटोपल्यानंतर ही जर पोटांतील शूल बंद झाला नाहीं तर रोग्यास त्याच्या जठराग्नीच्या शक्तीच्या मानानें अनुवासनबस्ति द्यावा. तो बडीशोप, शतावरी, दूध, ज्येष्ठमध, तेल, तेलाच्या चतुर्थांश तूप आणि बेलफळाचा गर या औषधांचा तयार करावा.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

याप्रमाणें अनुवासनबस्ति व तदनंतर करावयाचे पेयादिक्रम हे करूनही जर अतिसार निवृत्त झाला नाहीं तर पुढें लिहिल्या पिच्छाबस्तीचा प्रयोग करावा.

परिवेष्ट्य कुशैरार्द्रैरार्द्रवृंतानि शाल्मलेः ।
कृष्णमृत्तिकयालिप्य स्वेदयोद्गोमयाग्निना ॥ ६६ ॥
सुशुष्कां मृत्तिकां ज्ञात्वा तानि वृन्तानि शाल्मलेः ।
शृते पयसि मृद्नीयादापोथ्योलूखले ततः ॥ ६७ ॥
पिष्टं मुष्टिसमं प्रस्थे तत्प्लुतं तैलसर्पिषा ।
योजितं मात्रया युक्तं कल्केन मधुकस्य च ॥ ६८ ॥
बस्तिमभ्यक्तगात्राय दद्यात्प्रत्यागतेततः ।
स्नात्वा भुञ्जीत पयसा जाङ्गलानां रसेन वा ॥ ६९ ॥
पित्तातिसारज्वरशोथगुल्मजीर्णातिसारग्रहणी प्रदोषान् ।
जयत्ययं शीघ्रमतिप्रवृद्धान्विरेचनास्थापनयोश्च बस्तिः ॥ ७० ॥

सांवरीचे कोवळे देंठ ओल्या दर्भांत गुंडाळून वरून काळ्या मातीचा लेप करावा आणि ते शेणीच्या अग्नींत वाफण्याकरितां ठेवावे. वरची माती चांगली सुकली ह्मणजे ते बाहेर काढून घेऊन माती काढून टाकावीं व ते देंठ उखळींत कुटावे. आणि त्यापैकीं चार तोळे घेऊन तें एक शेर तापलेल्या दुधांत कोळून घ्यावे. नंतर त्यांत प्रमाणानुसार तेल, तूप व ज्येष्ठमधाचा कल्क टाकून त्याचा बस्ति द्यावा, हा बस्ति देण्यापूर्वी रोग्याच्या सर्वांगास तेलाचें मर्दन करावें. बस्ति परत आल्यावर रोग्यास स्नान घालून दूध किंवा जांगल पशूंच्या मांसाच्या शोरव्याबरोबर जेवूं घालावें. या पिच्छाबस्तीच्या योगानें पित्तातिसार, ज्वर, सूज, गुल्म, अजीर्णातिसार, संग्रहणी, इत्यादि रोग आणि विरेचन व अस्थापन बस्तीच्या अतियोगानें होणारे विकार फार वाढलेल्या दशेंत असले तरी लवकर बरे होतात.

पित्तातिसारी यस्त्वेतां क्रियां मुक्त्वा निषेवते ।
पित्तलान्यन्नपानानि तस्य पित्तं महाबलम् ॥ ७१ ॥
कुर्याद्रक्तातिसारन्तु रक्तमाशु प्रदूषयन् ।
तृष्णां शूलं विदाहञ्च गुदपाकञ्च दारुणम् ॥ ७२ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

छागं तत्र पयःशस्तं शीतं समधुशर्करम् ।
पानार्थं व्यञ्जनार्थंच गुदप्रक्षालनंतथा ॥ ७३ ॥
भोजनं रक्तशालीनां पयसा तेन भोजयेत् ।
रसैःपारावतादीनां घृतभ्रष्टैः सशर्करैः ॥ ७४ ॥
शशपक्षिमृगाणांच शीतानां वनचारिणाम् ।
रसैरनम्लैः सघृतैर्भोजयेत्तं सशर्करैः ॥ ७५ ॥
रुधिरं मार्गमाजं वा घृतभ्रष्टं प्रशस्यते ।
काश्मर्योः फलयूषो वा किञ्चिदम्लः सशर्करः ॥ ७६ ॥

पित्तातिसार झालेल्या रोग्यानें वर सांगितलेले उपचार न करितां उलट पित्तकारक पदार्थांचा उपयोग केल्यास त्यापासून तत्काल त्याचें पित्त फार वाढून त्यापासून रक्त अतिशय दूषित होऊन रक्तातिसार व तदंगभूत तहान, शूल, दाह व प्रबल गुदपाक हे विकार उत्पन्न होतात. यांवर शेळीच्या थंड दुधांत मध व साखर टाकून तें प्यावयास देणें प्रशस्त आहे. हें दूध प्यावयास द्यावें, इतर पदार्थांतही मिळवावें व गुदाही यानेंच धुवावी. तसेंच या दुधाबरोबर लाल साळीच्या तांदळांचा भात जेवूं घालावा. किंवा पारवा वगैरेच्या मांसरसास तुपाची फोडणी देऊन त्यांत साखर टाकून त्याबरोबर खाऊं घालावें. अथवा ससा, हरिण किंवा इतर शीतवीर्य वनचरांच्या मांसरसांत आंबटाण न घालतां तुपाची फोडणी देऊन साखर टाकून त्याबरोबर जेऊं घालावें. किंवा हरिण अथवा बोकडाचें रक्त तुपांत फोडणी देऊन घेणें हें ही प्रशस्त आहे. किंवा शिवणीच्या फळाचें कढण त्यांत किंचित् आंबटाण व साखर टाकून तें घ्यावें.

नीलोत्पलं मोचरसः समङ्गा पद्मकेसरम् ।
अजाक्षीरयुतं दद्याज्जीर्णेच पयसौदनम् ॥ ७७ ॥
दुर्बलं पाययित्वा वा तस्यैवोपरि भोजयेत् ।
प्रागुक्तं नवनीतं वा दद्यात्समधुशर्करम् ॥ ७८ ॥
प्राश्य क्षीरोत्थितं सर्पिः कपिञ्जलरसाशनः ।
त्र्यहादारोग्यमाप्नोति पयसाक्षीरभुक्तथा ॥ ७९ ॥
पीत्वा शतावरी कल्कं पयसा क्षीर भुग्जयेत् ।
रक्तातिसारं पीत्वा वा तथा सिद्धं घृतंनरः ॥ ८० ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

घृतं यवागूमण्डेन कुटजस्य फलैःतश्शृम् ।
पेयं तस्यानुपातव्या पेया रक्तोपशान्तये ॥ ८१ ॥
त्वक्च दारुहरिद्रायाः कुटजस्य फलानिच ।
पिप्पली श्रृङ्गवेरञ्च द्राक्षाकटुकरोहिणी ॥ ८२ ॥
षड्भिरेतैर्घृतं सिद्धं पेयामण्डावचारितम् ।
अतिसारं जयेच्छीघ्रं त्रिदोषमपि दारुणम् ॥ ८३ ॥
कृष्णमृन्मधुकंशंखं रुधिरं तण्डुलोदकम् ।
पीतमेकत्र सक्षौद्रं रक्तसंग्रहणं परम् ॥ ८४ ॥
पीतः प्रियंगुकाकल्कः सक्षौद्रस्तण्डुलाम्भसा ।
रक्तस्रावं जयेच्छीघ्रं धन्वमांसरसाशिनः ॥ ८५ ॥
कल्कस्तिलानां कृष्णानां शर्करा पञ्चभागिकः ।
आजेन पयसा पीतः सद्यो रक्तं नियच्छति ॥ ८६ ॥
पल वत्सकबीजस्य श्रपयित्वा रसं पिबेत् ।
यो रसाशी जयेच्छीघ्रं सपैत्तं जठरामयम् ॥ ८७ ॥
पीत्वा सशर्कराक्षौद्रं चन्दनं तण्डुलाम्भसा ।
दाह तृष्णाप्रमेहेभ्यो रक्तस्रावाद्विमुच्यते ॥ ८८ ॥

निळें कमळ, सांवरीचा डीक, लाजाळू व कमळकेशर बकरीच्या दुधांतून द्यावें व तें पचलें ह्मणजे वर दूधभात खाऊं घालावा. रोगी अशक्त असल्यास औषध देऊन त्यावर लागलेंच जेऊं घालावें. किंवा बकरीच्या दुधाचें लोणी, मध व साखर मिळवून द्यावें. अथवा बकरीच्या कच्च्या दुधावरून काढलेल्या लोण्याचें तूप पिऊन त्यावर तित्तिर पक्षाच्या मांसाच्या शोरुव्याबरोबर जेवावें. त्याचप्रमाणें पाणी व बकरीचें दूध मिळवून प्याल्यानें तीन दिवसांत विकार बंद होतो. किंवा शतावरीचा कल्क बकरीच्या दूधांतून पिऊन त्यावर बकरीच्याच दुधाबरोबर भात जेवावा. अथवा शतावरीच्या कल्कांत तयार केलेलें तूप प्याल्यानेंही रक्तातिसार नाहींसा होतो. इंद्रजव घालून शिजविलेलें तूप यवागूमण्डाबरोबर पिऊन त्यावर पेज प्यावी. दारुहळदीची साल, इंद्रजव, पिंपळी, सुंठ, काळीं द्राक्षें व कुटकी या सहा औषधांनीं सिद्ध केलेलें तूप घेऊन त्यावर कण्हेरी व पेजेचें अनुपान ठेविल्यास बलवान् त्रिदो-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

षज अतिसारही लवकर बरा होतो. काळी माती, ज्येष्ठीमध, शंखभस्म केशर, तांदुळाचें धुवण व मध हीं एकत्र करून घेतल्यास त्यापासून रक्तातिसार बंद होतो. गहुल्याचा कल्क व मध तांदळांच्या धुवणांतून घेऊन त्यावर जांगल पशूंच्या मांसाच्या शोरुव्याबरोबर भात जेवल्यानें रक्तस्राव लवकरच बंद होतो. एकभाग काळ्या तिळांचा कल्क व पांच भाग साखर मिळवून तो बकरीच्या दूधांतून प्याल्यानें तत्काल रक्तस्राव बंद होतो. चार तोळे इंद्रजवांचा काढा करून तो प्यावा व त्यावर उक्त मांसरसांचें सेवन करावें ह्मणजे पित्तातिसार व रक्तातिसार लवकर बंद होतो. तांदळाचे धुवणांतून साखर व मध मिळवून चंदन घेतल्यानें दाह, तृषा, प्रमेह व रक्तातिसार हे विकार नाहींसे होतात.

गुदो बहुभिरुत्थानैर्यस्य पित्तेन पच्यते ।
सेचयेत्तं सुशीतेन पटोलमधुकाम्बुना ॥ ८९ ॥
पञ्चवल्कमधूकानां रसैरिक्षुरसैर्घृतैः ।
छागैर्गव्यैः पयोभिर्वा शर्कराक्षौद्रसंयुतैः ॥ ९० ॥
प्रक्षालनानां कल्कैर्वा ससर्पिष्कैः प्रलेपयेत् ।
एषांवा सुकृतैश्चूर्णैस्तं गुद प्रतिसारयेत् ॥ ९१ ॥
धातकीरोध्रचूर्णैर्वा समांशैः प्रतिसारयेत् ।
तथा तत्र स्रवत्यस्रं गुदस्तैः प्रतिसारितम् ॥ ९२ ॥
यथोक्तसेचनैः शीतैः शोणिते निःस्रवत्यति ।
गुदवंक्षणकट्यरु सेचयेद्घृतभावितम् ॥ ९३ ॥
चन्दनाद्येनतैलेन शतधौतेन सर्पिषा ।
कार्पाससहयोगेन सेचयेद्गुदवंक्षणौ ॥ ९४ ॥

जर पित्तातिसारी रोग्याचें मलद्वार फार जुलाब झाल्यापासून पिकलें असेल तर त्यावर कडू पडवळ व ज्येष्ठीमधाचा काढा थंड करून त्याचा शिडकाव करावा. किंवा पंचवल्क ह्मणजे वड, पिंपळ, उंबर, पिंपरी व वेत यांच्या साली व ज्येष्ठीमध यांच्या काढ्याचा, उंसाचा रस व तूप यांचा किंवा बकरीच्या अथवा गाईच्या दुधांत मध व साखर टाकून त्याचा शिडकाव करावा. अर्थात् मलद्वार या काढ्यांनीं वरचेवर धुवावें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

किंवा याच औषधांचा कल्क तुपांत कालवून त्याचा लेप करावा. अथवा याच औषधांचें किंवा धायटीचीं फुलें व लोध्र समभाग घेऊन त्यांचें बारीक चूर्ण करून तें मलद्वारावर चोळावें. या चोळण्यापासून गुदेंतून रक्तस्राव होतो. रक्त निघत असतांना गुदद्वार, जांघाडे, कंबर व मांड्या यांस तूप लावून पूर्वोक्त काढे थंड करून त्यांनीं हे भाग धुवावे. पूर्वोक्त चन्दनादि तेल अथवा शंभर वेळां धुतलेल्या तुपांत कापसाचा बोळा भिजवून तें गुदद्वार व जांघाड्यावर लावीत असावें.

अल्पाल्पं बहुशो रक्तं सशूलमुपवेश्यते ।
यदा वायुर्विबद्धश्च कृच्छ्रश्चरति वा नवा ॥ ९५ ॥
पिच्छावस्तिं तदा तस्य यथोक्तमुपकल्पयेत् ।
प्रपुण्डरीकसिद्धेन सर्पिषा चानुवासयेत् ॥ ९६ ॥
प्रायशो दुर्बलगुदाश्चिरकालातिसारिणः ।
तस्मादभीक्ष्णशस्तेषां गुदस्नेहं प्रयोजयेत् ॥ ९७ ॥
पवनोऽतिप्रवृत्तो हि स्वेस्थाने लभतेऽधिकम् ।
वलं तस्य सपित्तस्य जयार्थे बस्तिरुत्तमः ॥ ९८ ॥

ज्या रोग्यास पोटांत मुरडा होऊन वरचेवर थोडें थोडें रक्त पडतें आणि ज्याच्या कोठ्यांत वायु बद्ध होऊन तो फार कष्टानें फिरतो किंवा मुळींच न फिरतां एके जागीं अवष्टंभ होऊन राहतो, त्यास मागें सांगितलेल्या पिच्छाबस्तीचा प्रयोग करावा व पुण्डरीक काष्ठ घालून सिद्ध केलेल्या तुपाचा अनुवासनबस्तिही द्यावा. ज्यांचा पुष्कळ दिवसांचा जुना अतिसार असतो त्यांची गुदा बहुतकरून अशक्त झालेली असते; म्हणून गुदद्वारावर वरचेवर स्नेहाचा उपयोग करीत असावें. अतिसारांत वायु सर्वत्रच फार वाढत असल्यामुळें तो आपल्या स्वतःच्या स्थानांत तर अधिकच बलवान् होऊन पित्ताशीं मिळतो. अशा स्थितींत वात व पित्त या दोहोंस ही हटविण्याकरितां बस्तिप्रयोग करणें हा उत्तम उपाय आहे.

रक्तं विट्सहितं पूर्वं पश्चाद्वायोऽतिसार्यते ।
शतावरी घृतं तस्य लेहार्थमुपकल्पयेत् ॥ ९९ ॥
शर्कराधांशिकं लीढ्वा नवनीतं नवोध्दृतम् ।
क्षौद्रपादं जयेच्छीघ्रं तं विकारं हिताशिनः ॥ १०० ॥


CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

न्यग्रोधोदुम्बराश्वत्थशुङ्गानापोथ्य वासयेत् ।
अहोरात्रं जले तृप्ते घृतं तेनाम्भसा पचेत् ॥ १०१ ॥
तदर्द्धं शर्करायुक्तं लिह्यात्सक्षौद्रपादिकम् ।
अधो वा यदि वाऽप्यूर्ध्वं यस्य रक्तं प्रवर्तते ॥ १०२ ॥
यस्त्वेवं दुर्बलो मोहात्पित्तलान्येव सेवते ।
शीघ्रं विपद्यते प्राप्य वलीपाकं सुदारुणम् ॥ १०३ ॥

ज्यास जुलाबाच्या आरंभी किंवा शेवटीं रक्त पडतें त्यास शतावरी घालून सिद्ध केलेलें तूप चाटण्याकरितां द्यावें. किंवा एक भाग साखर, अर्धा हिस्सा ताजें लोणी चतुर्थांश मध मिळवून द्यावें आणि त्यावर हितकारक आहार करावा, ह्मणजे रक्तस्राव त्वरित बंद होतो. अथवा वड, उंबर व पिंपळ यांचे कोंवळे पल्लव कुटून ऊन पाण्यांत एक दिवसरात्र भिजत ठेवावे आणि दुसऱ्या दिवशीं त्या पाण्यांत तूप शिजवून त्यांत अर्धा भाग साखर व चतुर्थांश मध मिळवून तें ज्या अतिसारी रोग्यास जुलाब किंवा उलटीच्या द्वारें रक्त पडत असेल त्यास चाटावयास द्यावें. ज्या रोग्यास अतिशय रक्त पडून अशक्तता आली असेल तो प्रमादानें पित्तकारक पदार्थांचें सेवन करील, तर त्यास भयंकर गुदवलीपाक होऊन अर्थात् मलद्वारांतील वळ्या पिकून तो लवकरच मरण पावतो.

श्लेष्मातिसारे प्रथमं हितं लंघनपाचनम् ।
योज्यश्चामातिसारघ्नो यथोक्तो दीपनो गणः ॥ १०४ ॥
लंघितस्यानुपूर्व्याच्च कृतायान्न निवर्तते ।
कफजो यद्यतीसारः कफघ्नैस्तमुपाचरेत् ॥ १०५ ॥

कफातिसारांत प्रथम लंघन व पाचन करावें; नंतर आमातिसारावर सांगितलेल्या दीपनीय औषधिगणांचा उपयोग करावा. लंघनपाचनादि उक्त क्रिया करून व तदनंतर पेयादि क्रम आटोपूनही जर कफातिसार बंद न झाला तर त्याची कफनाशक औषधांनीं चिकित्सा करावी.

बिल्वकर्कटिकामुस्तमभयाविश्वभेषजम् ।
वचा विडङ्गं भूतीकं धान्यकं देवदारु च ॥ १०६ ॥
कुष्ठं सातिविषापाठा चव्यं कटुकरोहिणी ।
पिप्पलीपिप्पलीमूलं [illegible] हस्तिपिप्पली ॥ १०७ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

योगान् श्लोकार्द्धविहिताँश्चतुरस्तान्प्रयोजयेत् ।
शृतान् श्लेष्मातिसारेषु कायाग्निबलवर्द्धनान् ॥ १०८ ॥

( १ ) बेलफळाचा गर, काकडशिंगी, नागरमोथा, हिरडे व सुंठ ( २ ) वेखंड, वावडिंग, ओवा, धने व देवदारु ( ३ ) कोष्ठ, अतिविष, पहाडमूळ, चवक व कुटकी ( ४ ) आणि पिंपळीं, पिंपळीमूळ, चित्रक व गजपिंपळी; याप्रमाणें अर्ध्या अर्ध्या श्लोकांत सांगितलेले हे चार काढे दिले असतां त्यापासून कफातिसार दूर होऊन जठराग्नीची शक्ति वाढते.

अजाजीं सासितां पाठां नागरं मरिचानि च ।
धातकी द्विगुणं दद्यान्मातुलुंगरसाप्लुतम् ॥ १०९ ॥
रसांजनं सातिविषं कुटजस्य फलानि च ।
धातकी द्विगुणं दद्यात्पातुं सक्षौद्रनागरम् ॥ ११० ॥

जिरें, खडीसाखर, पहाडमूळ, सुंठ, काळींमिरें व या सर्वांच्या दुप्पट धायटीचीं फुलें, या सर्वांचें चूर्ण करून तें माहळुंगाच्या रसांतून द्यावें. किंवा रसांजन, अतिविष, इंद्रजव व या सर्वांच्या दुप्पट धायटीचीं फुलें, याचें चूर्ण करून तें सुंठ व मध मिळवून द्यावें.

धातकी नागरं बिल्वं लोध्रं पद्मस्य केसरम् ।
जम्बूत्वंनागरं धान्यं पाठा मोचरसं बला ॥ १११ ॥
समङ्गा धातकी बिल्वमध्यं जम्ब्वाम्रयोस्त्वचा ।
कपित्थानि विडङ्गानि नागरं मरिचानि च ॥ ११२ ॥
चांगेरीकोलतक्राम्लाँश्चतुरस्तान्कफातुरे ।
श्लोकार्द्धविहितान्दद्यात्सस्नेहलवणान्खडान् ॥ ११३ ॥

( १ ) धायटीचीं फुलें, सुंठ, बेलफळाचा गर, लोध्र, कमळकेसर; ( २ ) जांभळाची साल, सुंठ, धने, पहाडमूळ, सांवरीचा डीक व चिकणामूळ, ( ३ ) लाजाळू, धायटीचीं फुलें, बेलफळाचा गर आणि जांभळाची व आंब्याची साल, ( ४ ) आणि कवठ, वावडिंग, सुंठ व काळीं मिरें या अर्ध्या अर्ध्या श्लोकांत सांगितलेल्या चार औषधिप्रयोगांचे चुका, बोरें किंवा ताक यांची आंबटाण, मीठ व तुपाची फोडणी देऊन खडयूष ( कढणें ) बनवून ते कफातिसारावर द्यावे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कपित्थमध्यं लीढ्वा तु सव्योषक्षौद्रशर्करम् ।
कट्फलं मधुयुक्तं वा मुच्यते जठरामयात् ॥ ११४ ॥

कवठाचा गर, सुंठ, मिरीं, पिंपळी, मध व साखर हीं एकत्र करून घ्यावीं किंवा मधांतून कायफळाचें चूर्ण घ्यावें, म्हणजे उदररोगाची निवृत्ति होते.

कणां मधुयुतां पीत्वा तक्रं पीत्वा सचित्रकम् ।
जग्ध्वा बालबिल्वानि मुच्यते जठरामयात् ॥ ११५ ॥

मधांतून पिंपळी घेतल्यानें, चित्रकमूळाचें चूर्ण घालून ताक प्याल्यानें किंवा कोंवळ्या बेलफळांचा गर खाल्यानें उदररोग नाहींसा होतो.

बालबिल्वं गुडं तैलं पिप्पलीं विश्वभेषजम् ।
लिह्याद्वाते प्रतिहते सशूलः सप्रवाहिकः ॥ ११६ ॥
भोज्यं मूलकषायेण वातघ्नैश्चोपसेवनैः ।
वातातिसारविहितैर्यूषैर्मांसरसैः खडैः ॥ ११७ ॥
पूर्वोक्तमम्लसर्पिर्वा षट्पलं वा यथाबलम् ।
पुराणं वा घृतं दद्याद्यवागूमण्डमिश्रितम् ॥ ११८ ॥
वातश्लेष्मविबन्धे वा कफे वाति स्रवत्यपि ।
शूले प्रवाहिकायां वा पिच्छाबस्तिं प्रकल्पयेत् ॥ ११९ ॥

कच्च्या बेलफळाचा गर, गूळ, तेल, पिंपळी व सुंठ, यांचें चाटण करून घेतल्यानें वातनिबंध, मुरडा व फेंसाळ पाण्याचे जुलाब बंद होतात. मुळ्यांच्या कढणाबरोबर, वातनाशक तोंडीलावण्याबरोबर किंवा वातातिसारावर सांगितलेलीं कढणें व मांसरसादिकांबरोबर जेवावें, किंवा पूर्वीं सांगितलेलें डाळिंबाचा रस किंवा इतर आंबटण घालून तयार केलेलें तूप, राजयक्ष्मचिकित्सेंत सांगितलेलें षट्पलघृत किंवा कण्हेरी, पेज वगैरेंतून जुनें तूप रोग्याच्या शक्तीप्रमाणें प्यावयास द्यावें. अवष्टंभ असेल किंवा अतिशय कफ पडत असेल, मुरडा होत असेल व फेंसाळ पाण्याचे जुलाब होत असतील तर मागें सांगितलेल्या पिच्छाबस्तीचा उपयोग करावा.

पिप्पलीबिल्वकुष्ठानां शताह्वावचयोरपि ।
कल्कैः सलवणैर्युक्तं पूर्वोक्तं सन्निधापयेत् ॥ १२० ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रत्यागते सुखस्नातं कृताहारं दिनात्यये।
बिल्वतैलेन मतिमान् सुखोष्णेनानुवासयेत् ॥ १२१ ॥
वचान्तैरथवा कल्कैस्तैलं पक्त्वानुवासयेत्।
बहुशः कफवातार्तं तथा स लभते सुखम् ॥ १२२ ॥

पिंपळी, बेलफळाचा गर, कोष्ठ, बडीशेप व वेखंड या औषधांचा कल्क आणि मीठ टाकून पूर्वोक्त पिच्छाबस्ति द्यावा. तो परत आल्यानंतर स्नान, जेवण वगैरे घालून संध्याकाळच्या वेळीं बिल्वतेलाचा सुखोष्ण अनुवासन बस्ति द्यावा. अथवा पिंपळीपासून वेखंडापर्यंतच्या सर्व औषधांचा कल्क तेलांत टाकून तें उकळावें व कफवातार्त रोग्यास वरचेवर त्याचा अनुवासन बस्ती द्यावा. याच्या योगानें कफवातविकार नाहींसे होतात.

स्वेस्थाने मारुतोऽवश्यं वर्धते कफसंक्षये।
सवृद्धः सहसा हन्यात्तस्मात्तं त्वरया जयेत् ॥ १२३ ॥
वातस्यानुजयेत्पित्तं पित्तस्यानुजयेत्कफम्।
त्रयाणां वा जयेत्पूर्वं यो भवेद्बलवत्तमः ॥ १२४ ॥

कफातिसारांत कफ फार निघून जाऊन तो अतिशय क्षीण होतो व त्याच्या योगानें मलद्वारांत वायु अतिशय वाढतो. हा वाढलेला वायु एकाएकीं रोग्याचे प्राण हरण करण्याचें भय असतें ह्मणून अगोदर या वायूस हटविलें पाहिजे. वायु हटविल्यानंतर पित्त व त्याच्या मागून कफ या क्रमानें दोषास जिंकित जावें. किंवा या तिहींपैकीं जो दोष सर्वांत अधिक जोरदार असेल तो प्रथम दूर करावा.

प्रागुत्पत्तिनिमित्तानि लक्षणं साध्यता तथा।
क्रिया चावस्थिकी सिद्धा निर्दिष्टा ह्यतिसारिणाम् ॥ १२५ ॥

या अध्यायांत अतिसाराची मूळ उत्पत्ति, तिचे हेतु, लक्षणें साध्यासाध्यविचार, व अनुभविक चिकित्सा इतक्या विषयांचें निरूपण केलें आहे.

दशमोऽध्यायः समाप्तः

---

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# अथ एकादशोऽध्यायः

अथातो विसर्पं चिकित्सितं व्याख्यास्यामः ।
इति ह स्माह भगवानात्रेयः ॥ १ ॥

आतां आपण विसर्पचिकित्सा निरूपण करूं. आत्रेय ऋषि असेंच सांगते झाले.

कैलासे किन्नराकीर्णे बहुप्रस्रवणौषधे ।
पादपैर्विविधैः स्निग्धैर्नित्यं कुसुमसम्पदैः ॥ २ ॥
वमद्भिर्मधुरान्गन्धान्सर्वतः स्वभ्यलंकृते ।
विहरन्तं जितात्मानमात्रेयमृषिवन्दितम् ॥ ३ ॥
महर्षिभिः परिवृतं विभुं भूतहिते रतम् ।
अग्निवेशो गुरुं काले विनयादिदमुक्तवान् ॥ ४ ॥
भगवन् दारुणं रोगमाशीविषविशोपमम् ।
विसर्पन्तं शरीरेषु देहिनामुपलक्षये ॥ ५ ॥
सहसैव नरास्तेन परीताः शीघ्रकारिणा ।
विनश्यत्यनुपक्रान्तस्तत्र नः संशयो महान् ॥ ६ ॥
स नाम्ना केन विज्ञेयः संज्ञितः केन हेतुना ।
कतिभेदः कियद्धातुः किं निदानः किमाश्रयः ॥ ७ ॥
सुखसाध्यो कृच्छ्रसाध्यो ज्ञेयो यश्चानुपक्रमः
कथं कैर्लक्षणैः किञ्च भगवँस्तस्य भेषजम् ॥ ८ ॥

एकदां, ज्या ठिकाणीं किन्नरांचे समूह वास करीत आहेत, अनेक लहान मोठे झरे वाहत आहेत, नानाप्रकारच्या उत्तमोत्तम औषधि विपुल आहेत, नानाप्रकारचे वृक्ष नेहमीं पुष्पश्रीनें सुशोभित राहत असून त्यांतून मधुर सुगंध सुटत आहेत, अशा रम्य व शोभायमान कैलासपर्वतावर जितेन्द्रिय, ऋषिपूज्य, विज्ञानसंपन्न व जगाच्या कल्याणाकरितां सदा झटणारे असे आत्रेयमहर्षि ऋषिगणासहवर्तमान विहार करीत असतां योग्य वेळ पाहून त्यांचा पट्टशिष्य अग्निवेश त्यांस वंदन करून नम्रतापूर्वक विचारिता झाला कीं, हे भगवन्! महर्षे! मनुष्यांच्या शरीरावर सर्पाच्या विषाप्रमाणें पसरत जाणारा एक भयंकर रोग पाहण्यांत येतो. तो फारच लवकर पसरत जातो आणि त्याची

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तावडतोब चिकित्सा न केल्यास त्यापासून मनुष्य एकदम मरण पावतो. तर या रोगाविषयीं मला पुढील शंका आहेत. त्यांचें आपण कृपा करून उत्तर द्यावें. या रोगाचें नांव काय, तें कशावरून पडलें, याचे किती प्रकार आहेत, हा कोणत्या धातूंच्या दोषापासून होतो, याचें कारण काय याचें अधिष्ठान कोणतें, हा सुखसाध्य आहे—कष्टसाध्य आहे किंवा मुळींच असाध्य आहे, हा कोणत्या लक्षणांनीं कसा ओळखावा आणि याची चिकित्सा काय ?

> तदग्निवेशस्यवचः श्रुत्वाऽऽत्रेयः सुदुर्वचम् ।
> यथावदखिलं सर्वं प्रोवाच मुनिसत्तमः ॥ ९ ॥
> विविधं सर्पति यतो विसर्पस्तेन स स्मृतः ।
> परिसर्पोऽथवा नाम्ना सर्वतः परिसर्पणात् ॥ १० ॥
> स च सप्तविधो दोषैर्विज्ञेयः सप्तधातुकः ।
> पृथक्त्रयस्त्रिभिश्चैको विसर्पो द्वन्द्वजास्त्रयः ॥ ११ ॥
> वातिकः पैत्तिकश्चैव कफजः सान्निपातिकः ।
> चत्वार एते वीसर्पा वक्ष्यन्ते द्वन्द्वजास्त्रयः ॥ १२ ॥
> आग्नेयो वातपित्ताभ्यां ग्रन्थ्याख्यः कफवातजः ।
> यस्तु कर्दमको घोरः सपित्तकसम्भवः ॥ १३ ॥
> रक्तं लसीकात्वङ्मांसं दूष्यं दोषास्त्रयोमलाः ।
> विसर्पाणां समुत्पत्तौ विज्ञेयाः सप्तधातवः ॥ १४ ॥

याप्रमाणें अग्निवेशाची कठिण प्रश्नावली ऐकून आत्रेय महर्षि त्याचें संपूर्ण विवेचन यथावत् करते झाले. हा निरनिराळ्या प्रकारांनीं शरीरावर पसरतो ( वि—सर्प ) म्हणून यास 'विसर्प' असें ह्मणतात. किंवा हा शरीरांत चोहोंकडून पसरतो. ( परितःसर्पणम् ) ह्मणून यास 'परिसर्प' असेंही नांव आहे. यास मराठींत धांवरें ह्मणतात. विसर्प दोषभेदानें सात प्रकारचा आहे. १ वातज, २ पित्तज, ३ कफज, ४ सान्निपातिक, ५ वात—पैत्तिक, ६ वात—कफज, ७ पित्त—कफज. वातपित्तजन्य विसर्पास आग्नेय, कफवातजास ग्रन्थिविसर्प आणि पित्तकफजन्यास कर्दमक अशीं नांवें आहेत. कर्दमकविसर्प भयंकर आहे. रक्त, लस, त्वचा व मांस हीं चार

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दूष्यें आणि वात-पित्त-कफ हे तीन दोष मिळून हे एकंदर सात धातु बिघडण्यापासून विसर्प उत्पन्न होतो

लवणाम्लकटूष्णानां रसानामतिसेवनात् ।
दध्यम्लमस्तुशुक्तानां सुरासौवीरकस्य च ॥ १५ ॥
व्यापन्नबहुमद्योष्णरागषाडवसेवनात् ।
शाकानां हरितानाञ्च सेवनाच्च विदाहिनाम् ॥ १६ ॥
कूर्चिकानां किलाटानां सेवनान्मन्दकस्य च ।
दध्नः शाण्डाकिपूर्वाणामासुतानाञ्च सेवनात् ॥ १७ ॥
तिलमाषकुलत्थानां तैलानां पैष्टिकस्य च ।
ग्राम्यानूपौदकानाञ्च मांसानां लशुनस्य च ॥ १८ ॥
प्रस्विन्नानामसात्म्यानां विरुद्धानाञ्च सेवनात् ।
अत्यादानाद्दिवास्वप्नादजीर्णाध्यशनात्क्षतात् ॥ १९ ॥
वधबन्धप्रपतनाद्घर्मकर्मातिसेवनात् ।
विषवाताग्निदोषाच्च विसर्पाणां समुद्भवः ॥ २० ॥
एतैर्निदानैर्व्यामिश्रैः कुपिता मारुतादयः ।
दूष्यं सन्दूष्य रक्तादि विसर्पन्त्यहिताशिनाम् ॥ २१ ॥
बहिःश्रितः श्रितश्चान्तस्तथाचोभयसंश्रितः ।
विसर्पो बलमेतेषां ज्ञेयं गुरु यथोत्तरम् ॥ २२ ॥
बहिर्मार्गाश्रितं साध्यमसाध्यमुभयाश्रितम् ।
विसर्पं दारुणं विद्यात्सुकृच्छ्रं त्वन्तराश्रयम् ॥ २३ ॥
अन्तः प्रकुपिता दोषा विसर्पन्त्यन्तराश्रये ।
बहिर्बहिः प्रकुपिताः सर्वत्रोभयसंश्रिताः ॥ २४ ॥
मर्मोपघातात्सम्मोहादयनानां विघट्टनात् ।
तृष्णातियोगाद्वेगानां विषमञ्च प्रवर्तनात् ॥ २५ ॥
विद्याद्विसर्पमन्तर्यदाशु चाग्निबलक्षयात् ।
अतोविपर्ययाद्बाह्यमन्यैर्विद्यात्स्वलक्षणैः ॥ २६ ॥
यस्य लिंगानि सर्वाणि बलवद्यस्य कारणम् ।
यस्य चोपद्रवाः कष्टा मर्मगो यश्च हन्ति सः ॥ २७ ॥

खारट, आंबट, तिखट व उष्ण पदार्थांचें अतिसेवन; दहीं, दह्याची निवळी, शिरका, मद्य, धान्य, कांजी, बिघडलेलें मद्य, फार मद्य, उष्ण रागषाडव; विदाहि भाज्या व लोणचीं वगैरे तोंडी लावण्याचे पदार्थ; कूर्चिका, किलाट, मन्दक वगैरे दुधास आंबटपणा टाकून केलेले पदार्थ;

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दहीं, शाण्डाकि वगैरे आसवें; तीळ, उडीद, कुळीथ यांचे पदार्थ; तेलाचे व पिठाचे पदार्थ; ग्राम्य, आनूप व जलचर प्राण्यांचें मांस, लसूण, उकडलेले, ( किंवा आंबलेले ? ) आपल्या प्रकृतीस न सोसणारे, परस्पर विरुद्ध अशा पदार्थांचें अतिसेवन, अति रूक्षण, दिवसा निजणें अजीर्णावर जेवणें, फार जेवणें, जखम होणें, चिरणें, बंधन पडणें, अतिशय ऊन घेणें, वमनादि पंचकर्मांचें किंवा परिश्रमाचें अतिसेवन, आणि विष, वायु, अग्नि, यांचे दोष इतक्या कारणांनीं विसर्प उत्पन्न होतो. वरील कारणें मिश्रित होऊन कुपित झालेले वातादि दोष पूर्वोक्त रक्तादि चार धातूंस दूषित करून त्यांत अहित भोजन करणारांच्या शरीरावर पसरवितात अर्थात् विसर्प उत्पन्न होतो. बाह्य, अभ्यन्तर व बाह्याभ्यंतर ह्मणजे बाहेरच्या बाजूस होणारा, आंत होणारा व आंत बाहेर दोन्ही ठिकाणीं होणारा, असे विसर्पाचे तीन प्रकार आहेत. ते उत्तरोउत्तर अधिक जोरदार आहेत. ह्मणजे बाह्यापेक्षां अभ्यन्तर व अभ्यंतरापेक्षां बाह्याभ्यंतर विसर्प अधिक बलवान् समजावे. बाहेरचा विसर्प सुसाध्य आहे, उभयमार्गाश्रित असाध्य आहे अन्तराश्रितविसर्प दारुण कष्टसाध्य आहे. शरीराच्या अन्तर्भागीं दोष कुपित झाले असतां ते आंतल्या बाजूस विसर्प उत्पन्न करितात. बाह्य दोष कुपित झाले असतां बाह्यविसर्प उत्पन्न होतो आणि अन्तर्बाह्य दोन्ही ठिकाणचे दोष प्रकुपित झाल्यानें उभयत्र विसर्प होतो. हृदयादि मर्मस्थानीं पीडा होणें, मूर्च्छा येणें, कान—नाक वगैरे शरीरद्वाराचें अतिशय स्फुरण पावणें; फार तहान लागणें, मलमूत्रादिक तुटक—तुटक व अडखळत होणें आणि एकदम जठराग्नि मंद होणें या लक्षणांवरून अन्तर्विसर्प आहे असें ओळखावें. याच्या उलट लक्षणें झालीं असतां बाह्यविसर्प असें समजावें. त्याच्या दोषपरत्वें निरनिराळ्या लक्षणांवरून त्यांची परीक्षा करावी. ज्या विसर्पांत एकंदर सर्व लक्षणें असतात, ज्याचें उत्पत्तिकारण ही जोरदार असतें, ज्याचे उपद्रवही फार कष्टदायक असतात व ज्यानें मर्मस्थान घेरलेलें असतें तो असाध्य असें समजावें. त्यापासून रोग्याचा मृत्युच होतो.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रुक्षोष्णैः केवलो वायुः पूरणैर्वा समाचितः ।
प्रदुष्टो दूषयन्दूष्यं विसर्पति यथाबलम् ॥ २८ ॥

तस्यस्वरूपाणि–भ्रमदवथुपिपासानिस्तोदशूलाङ्गमर्दोद्वेष्टन-कम्पज्वरतमककासास्थिसन्धिभेदविश्लेषणवेपनारोचका-विपाकाश्चक्षुषोराकुलत्वमस्रागमनं पिपीलिकासंचार इव चांगेषु यस्मिंश्चावकाशे विसर्पो विसर्पति सोऽवकाशः श्यावारुणावभासः श्वयथुमान्निस्तोदभेदशूलायाससंकोच हर्षस्फुरणैरतिमात्रं प्रपीड्यते । अनुपक्रान्तश्चोपचीयते शीघ्रं भेदैः स्फोटकैस्तनुभिररुणाभैः श्यावैर्वा तनुविशदारुणाल्पस्रावैर्विबद्धवातमूत्रवर्चस्तानि निदानोक्तानि चास्य नोपशेरते विपरीतानि चोपशेरत इति वातविसर्पः ॥ २९ ॥

रूक्ष व उष्ण अन्न–पान किंवा अतिभोजन यायोगानें वायु वाढून, तो स्वयंदूषित होऊन, रक्तादि धातूंस दूषित करून त्याच्या जोराच्या मानानें शरीरभर पसरतो. अर्थात् वातविसर्प उत्पन्न होतो. त्याचीं लक्षणें पुढें लिहिल्याप्रमाणें होतात. भ्रम, डोळ्याची अतिशय आग होणें, तहान, टोंचण, शूल, अंग मोडणें, कंबरेचें फळे दुखणें, कांपरें, ताप, तमक, (श्वास), खोकला, हाडें व सांधे फुटणें ढिलें पडून दुखणें, सळसळणें, अरुचि, अपचन, डोळे व्याकुळ होणें व त्यांतून पाणी गळणें, अंगावर मुंग्या चावल्यासारखा भास होणें. ज्या जागीं विसर्प फैलत असेल त्या जागेचा रंग काळसर–पांढरुक किंवा पिंगट होतो, ती जागा सुजते, त्यांत टोंचण, फूठ, शूल, ताण, सुकडणें, गुदगुल्या होणें, फुरफुरणें हे विकार होतात. याची चिकित्सा न केल्यास हा लवकरच वाढून त्या ठिकाणीं भेगा पडतात, पिंगट किंवा काळसर–पांढरुक रंगाचे बारीक ( पातळ ) फोड येऊन त्यांतून पातळ, स्वच्छ, (चिकट नव्हे असा) पिंगट रंगाचा थोडथोडा स्राव होतो. या विसर्पांत अधोवायु–मलमूत्र यांचा अवरोध होतो. वर निदानांत सांगितलेल्या आहारविहारांनीं रोग वाढतो व त्याच्या उलट आहारविहारांनीं रोग कमी होत जातो. हीं वातजन्य विसर्पाचीं लक्षणें सांगितलीं.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पित्तमुष्णोपचारादि विदाह्यम्लाशनैश्चितम् ।
दूष्यं सन्दूष्य मार्गांश्च पूरयन्वै विसर्पति ॥ ३० ॥

तस्यरूपाणि–ज्वरस्तृष्णा मूर्च्छामोहश्छर्दिररोचकोऽङ्गभेदः स्वेदोऽतिमात्रमन्तर्दाहः प्रलापः शिरोरुक्चक्षुषोराकुलत्वमस्वप्नमरतिर्भ्रमः शीतवातवारितर्षोऽतिमात्रं हरितनेत्रमूत्रवर्चस्त्वक्केषां हरितहारिद्ररूपदर्शनं यस्मिश्चावकाशे विसर्पोऽनुसर्पति सोऽवकाशस्ताम्रहरित हरिद्रनीलकृष्णरक्तानां वर्णानामन्यतमं पुष्यति । सोत्सेधैश्चातिमात्रं दाहसम्भेदनपरीतैः स्फोटकैरुपचीयते तुल्यवर्णस्रावैरचिरपाकैर्निदानोक्तानि नोपशेरते विपरीतानि चोपशेरत इति पित्तविसर्पः ॥ ३१ ॥

उष्ण उपचार आणि विदाही व आंबट पदार्थांच्या अतिसेवनानें पित्त वाढून तें रक्तादि धातूंस दूषित करून आणि स्रोतसांचे मार्ग भरून टाकून विसर्प उत्पन्न करितें त्याचीं लक्षणें पुढें लिहिल्याप्रमाणें जाणावीं. ताप, तहान, मूर्च्छा, मोह, ओकारी, अरुचि, अंग फुटणें, फार घाम येणें, अन्तर्भागीं अतिशय दाह होणें, बडबड, डोकें दुखणें, डोळे व्याकुळ होणें, झोंप न येणें, मळमळ, भ्रम, थंड वारा व थंड पाण्याची अतिशय इच्छा, डोळे, लघ्वी, शौच व अंगावरची चामडी यांचा रंग हिरवा होणें, सर्व वस्तु हिरव्या किंवा पिंवळ्या दिसणें आणि ज्या जागीं विसर्प असेल ती जागा तांब्यासारखी तांबूस, हिरवी, पिंवळी, निळी, काळी किंवा लाल यापैकीं कोणत्या तरी एका रंगाची होणें. पित्तजन्य विसर्पांत वर उभरलेले फोड येत असून त्यांत अतिशय आग व फूट होत असते आणि फोडाच्या रंगाप्रमाणेंच त्यांतून स्राव होत असतो. हे फोड लवकर पिकत नाहींत. वर निदानांत सांगितलेल्या आहारविहारांनीं रोग वाढतो आणि त्याच्या प्रतिकूळ आहारविहारांनीं त्याची शांति होते. हा पित्तजन्य विसर्प सांगितला.

स्वाद्वम्ललवणस्निग्धगुर्वन्नस्वप्नसंचितः ।
कफः सन्दूषयन्दूष्यं कृच्छ्रमङ्गे विसर्पति ॥ ३२ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तस्य रूपाणि-शीतकः शीतकज्वरो गौरवं निद्रातन्द्रारोचको मधुरास्यत्वमास्योपलेपोनिष्ठीविका छर्दिरालस्यं स्तैमित्यमग्निनाशो दौर्बल्यं यस्मिंश्चावकाशे विसर्पति सोऽवकाशः श्वयथुमान्पाण्डुर्मात्रातिरक्तस्नेहः सुप्तिस्तम्भगौरवैरन्वितोऽल्पवेदनः कृच्छ्रपाकैश्चिरकारिभिः बहुलत्वगुपलेपैः स्फोटैः श्वेतपाण्डुभिरनुबध्यते प्रभिन्नस्तु श्वेतं पिच्छिलं तन्तुमद्धनमनुबद्धं स्निग्धमास्रावं स्रवत्यूर्ध्वंश्च गुरुभिः स्निग्धैर्जलावततैः स्निग्धैर्बहुलत्वगुपलेपैर्व्रणैरनुबध्यतेऽनुषङ्गीश्वेतनखनयनवदनत्वङ्मूत्रवर्चस्तानि निदानोक्तानि नोपशेरते विपरीतानिचोपशेरत इति श्लेष्मविसर्पः ॥ ३३ ॥

मधुर, आंबट, खारट, स्निग्ध व जड अन्नपान आणि झोंप यांच्या अत्यंत सेवनानें कफ वाढून रक्तादि धातूंस दूषित करून सर्वांगावर कष्टपूर्वक पसरतो. म्हणजे कफ–विसर्प उत्पन्न होतो. त्याचीं लक्षणें पुढें लिहिल्याप्रमाणें होतात. थंडी लागणें, हिंवताप येणें, अंग जड होणें, झोंप येणें, डोळ्यांवर झांपड येणें, अरुचि, तोंड गुळमट होणें, तोंडास चिकटा राहणें, वरचेवर थुंकी येणें, ओकारी, आळस, शरीरावर ओलें वस्त्र पांघरल्याप्रमाणें भास होणें, भूक मरणें व अशक्तता येणें. ज्या जागीं विसर्प पसरत असेल ती जागा सुजते व तिचा रंग फिकट किंवा किंचित् लाल होतो. ती जागा बधिर, चलनवलनशून्य व जड होते, व तींत थोडथोडी वेदना होते. त्या ठिकाणीं कष्टानें पिकणारे, फार दिवस राहणारे, जाड त्वचेचे व चिकटा बसणारे पांढऱ्या किंवा फिकट रंगाचे फोड उत्पन्न होतात. ते फुटले असतां त्यांतून पांढरा, बुळबुळीत तारदार, जाड, एकसारखा चालू रहाणारा व चिकट स्राव होत असतो. पुढें या फोडांच्या जागीं जड, चिकट, पाण्यानें भरलेले व जाड त्वचेस चिकटा बसविणारे व्रण उत्पन्न होतात. रोग्याचीं नखें, डोळे, तोंड, त्वचा, मूत्र व मल यांचा रंग पांढरा होतो. निदानांत सांगितलेल्या आहारविहारांनीं रोग वाढतो व त्याच्या प्रतिकूळ आहारविहारानीं त्याचें शमन होतें. हीं कफविसर्पाचीं लक्षणें सांगितलीं.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वातपित्तं प्रकुपितमतिमात्रं स्वहेतुभिः।
परस्परं लब्धबलं दहद्गात्रं विसर्पति ॥ ३४ ॥

तदुपतापादातुरः सर्वशरीरमङ्गारैरिवाकीर्यमानं मन्यते। छर्द्यतीसारमूर्च्छादाहमोहज्वरतमकारोचकास्थिसन्धिभेद-तृष्णाविपाकाङ्गभेदादिभिश्चाभिभूयते। यं यं चावकाशं विसर्पोऽनुसर्पति सोऽवकाशः शान्तांगारप्रकाशोऽतिरिक्तो वा भवत्यग्निदग्धप्रकारैश्च स्फोटैरुपचीयते सशीघ्रगत्वादा-शु एव मर्मानुसारी भवति मर्मणि चोपतप्तपवनोऽतिबलो भिनत्त्यंगान्यतिमात्रं प्रमोहयति संज्ञांहिक्काश्वासो जनयति नाशयति निद्रां स नष्टनिद्रः प्रमूढसंज्ञो व्यथितचेता न क्वचन सुखमुपलभतेऽरतिपरीतः स्थानादासनाच्छय्यां क्रान्तुमि-च्छति क्लिष्टभूयिष्ठश्चाशुनिद्रां भजत्यबलो दुःखप्रबोधश्च तमेवंविधमाग्निविसर्पपरीतमचिकित्स्यं विद्यात् ॥ ३५ ॥

वात व पित्त हे दोन दोष आपापल्या कारणांनीं कुपित होऊन पर-स्परांच्या संयोगानें अधिक बळवान होत्साते शरीराचा दाह करीत करी-त सर्वांगांत पसरतात; अर्थात् वातपित्तजन्य विसर्प उत्पन्न होतो. याच्या योगानें सर्वांगावर जळतें निखारे ठेविल्याप्रमाणें अंगाचा भडका होतो. ओकारी, अतिसार, मूर्च्छा, आग, मोह, ताप, अरुचि, हाडें व सांधें फुटणें, तहान, अपचन, अंग फुटणें वगैरे विकार जोराचे होतात. ज्या ज्या जागीं हा विसर्प फैलावत जातो ती ती जागा विझलेल्या निखाऱ्या-प्रमाणें किंवा त्याहून अधिक काळी होत जाते. त्या ठिकाणीं विस्तवानें जळल्याप्रमाणें फोड येतात. हा फार लवकर पसरणारा असल्यामुळें तत्काळ मर्मस्थानीं जाऊन पोंचतो. त्या ठिकाणीं तो गेल्यानें वाताचा जोर अतिशय वाढून त्यापासून अत्यंत अंग फुटतें, संज्ञानाश होतो, उचकी व दमा लागतो आणि झोंप येत नाहीं. याप्रमाणें झोंप न येतां श्रम होऊन चित्त व्याकुळ होऊन त्यास कोळत्याही रीतीनें चैन पडेनासें होतें. बसलें किंवा फिरत असतां बिछान्यावर पडावें असें वाटतें. परंतु त्याही ठिकाणीं चैन पडत नाहीं. याप्रमाणें तळमळ करीत जमिनीवर, बिछान्यावर वगैरे इकडे तिकडे लोळून शेवटीं अतिशय थकून जाऊन त्यास

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

झोंप लागते. आणि एकदां झोंप लागली ह्मणजे त्यास मोठ्या कष्टानें जागें करावें लागतें. अशा प्रकारच्या विसर्पास अग्निविसर्प ह्मणावें. हा असाध्य आहे.

कफपित्तंप्रकुपितं बलवत्स्वेन हेतुना ।
विसर्पत्येकदेशन्तु प्रक्लेदयति देहिनः ॥ ३६ ॥
तद्विकाराः–शीतज्वरः शिरोगुरुत्वं दाहः स्तैमित्यमङ्गाव-सादनं निद्रातन्द्रा मोहोऽन्नद्वेषःप्रलापोऽग्निनाशो दौर्बल्य-मस्थिभेदो मूर्च्छा पिपासा स्रोतसां प्रलेपो जाड्यमिन्द्रि-याणां प्रायोप्रवेशनमङ्गविक्षेपोऽङ्गमर्दोऽरतिरौत्सुक्यश्चोप-जायते प्रायश्चामाशये विसर्पत्येकदेशग्राही यस्मिंश्चावकाशे विसर्पति सोऽवकाशो रक्तपीतपाण्डुपिडकापकीर्ण इव मेचकाभः कालो मलिनः स्निग्धो बहूष्मागुरुः स्तिमितवे-दनः श्वयथुमान्गम्भीरपाको गिरास्रावः शीघ्रक्लेदः स्विन्न-क्लिन्नपूतिमांसत्वक्क्रमेणाल्परुक्परामृष्टोऽवदीर्यते कर्दम इवावपीडितोऽनन्तरं प्रयच्छत्युपक्लिन्नपूतमांसत्यागी शि-रास्नायुसंदर्शी कुणपगंधी च भवति संज्ञास्मृतिहर्ता तं कर्दमविसर्पपरीतमचिकित्स्यं विद्यात् ॥ ३७ ॥

कफ व पित्त हे दोन दोष आपापल्या कारणांनीं प्रकुपित होऊन व परस्परांच्या संयोगानें बलवान् होऊन शरीराच्या एका भागास क्लिन्न करून नंतर सर्व शरीरभर पसरतात. अर्थात् कफ-पित्तजन्य विसर्प उत्पन्न होतो. या विसर्पांत हिंवताप येतो, डोकें जड होतें, अंगाची आग होते, अंगावर ओलें वस्त्र पांघरल्याप्रमाणें भास होतो, अंग गळतें, झोंप, झांपड, मोह, अन्नाचा तिटकारा, बडबड, भूक मरणें, अशक्तता, हाडें फुटणें, मूर्च्छा, तहान, स्रोतसांत चिकटा बसणें, शरी-रावयव जड होणें, वरचेवर शौचास होऊन आम पडणें, अंग अस्ताव्यस्त टाकणें, तळमळ व उत्सुकता हे विकार होतात. हा विसर्प प्रथम नाभि व स्तन यांच्या मधील जागेंत ह्मणजे आमाशयांत कोणता तरी एक भाग धरून नंतर सर्वत्र पसरतो. ज्या ज्या ठिकाणीं हा विसर्प पसरत जातो ती ती जागा तांबड्या, पिवळ्या किंवा फिकट रंगाच्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पुटकुळयांनीं भरल्याप्रमाणें, मोराच्या गळ्याच्या रंगासारखी, काळी किंवा मळकट, तुळतुळीत, अतिशय उष्ण व जड अशी होते. त्यांत मंद मंद वेदना होतात व सूज येते, फोड आंत पिकतात, बाहेर वाहत नाहींत, लवकर चिघळतात; मांस व चामडी ओली, चिघळलेली व दुर्गंधयुक्त असते, यांत फार ठणका होत नाहीं. हात लावला असतां फुटतात व दाबलें असतां चिखलाप्रमाणें बोट रुततें व सडलेलें, दुर्गंधी मांस बाहेर निघतें आणि आंतील शिरा व स्नायु बाहेर दिसूं लागतात. त्यास प्रेताप्रमाणें घाण येते. या विसर्पांत संज्ञा व स्मृति या नाहींशा होतात. या विसर्पास कर्दमविसर्प असें ह्मणतात. हा असाध्य आहे.

स्थिरगुरुकठिन--मधुरशीत--स्निग्धान्नपानाभिष्यन्दिसेविनामव्यायामसेविनामप्रतिकर्मशालिनां श्लेष्मा वायुश्च प्रकोपमापद्यते । तावुभौ दुष्टप्रवृद्धावतिबलौ प्रदूष्यदूष्यं विसर्पाय कल्पेते । तत्र वायुःश्लेष्मणा विबद्धमार्गस्तमेव श्लेष्माणमनेकधा भिन्दन्क्रमेण ग्रन्थिमालां कृच्छ्रपाकसाध्यां कफाशये सञ्जनयत्युत्सन्नरक्तस्य वा प्रदूष्यरक्तं शिरास्नायुमांसत्वगाश्रितं ग्रन्थिविसर्पं कुरुते तीव्ररुजःग्रन्थीनां स्थूलानामणूनां दीर्घवृत्तरक्तानाम् । तदुपतापाज्ज्वरातीसारकासहिक्काश्वासशोषप्रमेहवैवर्ण्यारोचकाविपाकछर्दिर्मूर्च्छांगभंगनिद्रारातिसंसदनाद्यः प्रादुर्भवन्त्युपद्रवास्तैरुपद्रुतः सर्वकर्मणां विषयमतिपतितो विवर्जनीयो भवतीति ग्रन्थिवीसर्पः ॥ ३८ ॥

घट्ट, जड, कठिण, गोड, थंड, स्निग्ध व कफकारक पदार्थांचें अति सेवन, परिश्रम न करणें व वमनविरेचनादि पंच कर्मांच्या द्वारां संचित मलाचें शोधन न करणें, या कारणांनीं कफ व वायु प्रकुपित होतात. हे दोन्ही दूषित होऊन वाढलेले दोष परस्पर संयोगानें अधिकच बलवान् होऊन विसर्प उत्पन्न करितात. वाढलेल्या कफानें स्रोतसें भरून गेलीं ह्मणजे वायूचा मार्ग बंद होऊन तो वायु कफास तोडून त्याचे पुष्कळ विभाग करितो. त्या योगानें कफाशयांत क्रमशः गाठीं उत्पन्न होतात. त्या मोठ्या कष्टानें पिकतात व फार कष्टसाध्य असतात. किंवा प्रकुपि-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त झालेले वात व कफ ज्याच्या शरीरांत रक्त वाढलेलें आहे अशा मनुष्याचें शिरा, स्नायु, मांस व त्वचा त्यांतील रक्त दूषित करून ग्रंथिविसर्प उत्पन्न करितात. यांत लहान, मोठ्या, लांबट किंवा वाटोळ्या, तांबड्या रंगाच्या गांठी येतात व त्यांत तीव्र पीडा होते. यापासून ताप, अतिसार, खोकला, उचकी, दमा, क्षय, प्रमेह, निस्तेजपणा, अरुचि, अपचन, उलटी, मूर्च्छा, अंग मोडणें, झोंप, तळमळ, अंग गळणें इत्यादि उपद्रव उत्पन्न होतात. हे उपद्रव झाले ह्मणजे रोगी वमन विरेचनादि किंवा अन्य कोणत्याही प्रकारच्या चिकित्सेच्या लायक राहात नाहीं. ह्मणून हा ग्रंथिविसर्प असाध्य आहे.

> उपद्रवस्तु खलु रोगोत्तरकालजो रोगाश्रयो रोग एव स्थूलोऽणुर्वा रोगात्पश्चाज्जायत इत्युपद्रवसंज्ञः। तत्रप्रधानो व्याधिर्व्याधेर्गुणीभूत उपद्रवस्तस्य प्रायः प्रधानप्रशमे प्रशमो भवति। स तु पीडाकरतरो भवतीति पश्चादुत्पद्यमानो व्याधि परिक्लिष्टशरीरत्वात्तस्मादुपद्रवंत्वरमाणोऽभिबाधेत्॥ ३९

मूळ रोगाच्या मागून त्याच्याच आश्रयानें उत्पन्न होणारा जो दुसरा लहान किंवा मोठा रोग त्यास उपद्रव म्हणतात. उपद्रव ह्मणजे रोगच–परंतु तो एका रोगाच्या मागून होतो ह्मणून त्यास उपद्रव हें नांव दिलें आहे. त्यांत मूळ रोग मुख्य असून उपद्रव त्याच्या अंगभूत असल्यानें गौण आहे. मूळ रोग बरा झाला ह्मणजे उपद्रव बहुत करून आपोआपच त्याच्या बरोबर बरे होतात. उपद्रव जरी मागाहून उत्पन्न होतात तरी ते मूळ रोगापेक्षां अधिक त्रास देतात. कारण मूळरोगानें अगोदरच शरीर जर्जर झालेलें असल्यामूळें उपद्रव सहन करण्याची शक्ति रोग्याच्या अंगीं नसते. ह्मणून प्रथम उपद्रव बंद करण्याचे उपाय करावे.

> सर्वायतनसमुत्थं सर्वलिंगव्यापिनं सर्वधात्वनुसारिणमाशुकारिणं महात्ययिकमिति सन्निपातविसर्पमचिकित्स्यंविद्यात्॥ ४०॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सर्व कारणांनीं उत्पन्न झालेला, सर्वलक्षणयुक्त, सर्व धातूंत प्रविष्ट झालेला, दारुण व महाभयंकर असा सन्निपात विसर्प असाध्य समजावा.

तत्र वातपित्तश्लेष्मनिमित्ता विसर्पास्त्रयःसाध्या भवन्त्यग्निकर्दमाख्यौ पुनरनुपसृष्टे मर्मण्यनुपहते वा शिरास्नायुमांसक्लेदे साधारणक्रियाभिरुपायैस्तावेवाभ्यस्यमानौ प्रशान्तिमापद्येयातामनादरोपक्रान्तं पुनस्तयोरन्यतरोहन्याद्देहमाश्वेवाशीविषवत् ॥ ४१ ॥

वातज, पित्तज व कफज हे तीन विसर्प सुसाध्य आहेत. अग्निविसर्प व कर्दमविसर्प जर ते मर्मस्थानीं पोंचले नसतील व त्यांत शिरा, स्नायु, मांस वगैरे सडलें नसेल तर तत्तद्दोषनाशक संयुक्त चिकित्सा सतत केल्यानें ते बरे होतात. आणि त्याची उपेक्षा केल्यास ते सर्पाप्रमाणें तत्काल प्राणहरण करितात.

तथा ग्रन्थिविसर्पमजातोपद्रवमारभेत चिकित्सितुमुपद्रवोद्धुतं त्वेनं परिहरेत् । सन्निपातजं सर्वधात्वनुसारित्वादाशुकारित्वाद्विरुद्धोपक्रमत्वाच्चासाध्यं विद्यात् ॥ ४२ ॥

ग्रंथिविसर्पांत ताप, अतिसार, खोकला वगैरे पूर्वोक्त उपद्रव सुरू झाले नसल्यास त्याची चिकित्सा करावी आणि उपद्रव सुरू झाले असल्यास चिकित्सा न करितां रोगी सोडून द्यावा. सान्निपातिक विसर्पांत सर्व धातु दूषित होत असतात, त्याची क्रिया फार तावडतोब होत असते व त्याची चिकित्सा करूं गेलें असतां ती परस्परविरुद्ध पडते. या कारणास्तव सन्निपात विसर्प असाध्य समजावा.

तत्र साध्यानां साधनमनुव्याख्यास्यामः ।
लङ्घनोल्लेखने शस्ते तिक्तकानाञ्च सेवनम् ॥ ४३ ॥
कफस्थानगते सामे रूक्षशीतैः प्रलेपयेत् ।
पित्तस्थानगतेऽप्येतत्सामे कुर्याच्चिकित्सितम् ।
शोणितस्यावसेकश्च विरेकश्च विशेषतः ॥ ४४ ॥
मारुताशयसम्भूतेऽप्यादितः स्याद्विरूक्षणम् ।
रक्तपित्तान्वयेऽप्यादौ स्नेहनं न हितं मतम् ॥ ४५ ॥
वातोल्बणे तिक्तघृतं पैत्तिके च प्रशस्यते ।
लघुदोषे महादोषे पैत्तिके स्याद्विरेचनम् ॥ ४६ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

न घृतं बहु दोषाय देयं यन्न विरेचनम् ।
तेन दोषो ह्युपस्तब्धस्त्वङ्मांसरुधिरं पचेत् ॥ ४७ ॥
तस्माद्विरेकमेवादौ शस्तं विद्याद्विसर्पिणः ।
रुधिरस्यावसेकश्च तद्ध्यस्याश्रयसंज्ञितम् ॥ ४८ ॥
इति वीसर्पनुत्प्रोक्तं समासेन चिकित्सितम् ।
एतदेव पुनः सर्वं व्यासतः सम्प्रवक्ष्यते ॥ ४९ ॥

आतां साध्य विसर्पाची चिकित्सा वर्णन करितों. वातदोष कफाशयांत असतां प्रथम लंघन, वांति व पोटांत कडू द्रव्यांचा उपयोग करणें प्रशस्त आहे. वरून रूक्ष व थंड औषधांचा लेप द्यावा, तोच आमदोष पित्तस्थानगत असतांना ही चिकित्सा करून याशिवाय रक्त काढवावें व जुलाब द्यावा. दोष वाताशयांत असले किंवा रक्त-पित्ताश्रित असले तर आरंभीं रूक्षणक्रिया करावी. विसर्पांत प्रथमारंभीं वातदोषांत देखील स्निग्ध क्रिया उपयोगी नाहीं. वातप्रधान विसर्पांत व अल्पदोषी पित्तजन्य विसर्पांत तिक्तौषधसिद्ध तूप द्यावें आणि फार वाढलेल्या दोषांच्या पित्तजन्य विसर्पांत विरेचन द्यावें. ज्या विसर्प रोग्याचे दोष फार वाढलेले असतील त्यास तूप द्यावयाचें असल्यास तें विरेचन करणारें असेंच असावें; कारण, विसर्पांत रक्त व पित्त यांचाच मुख्य बिघाड असतो, आणि पित्ताची मुख्य चिकित्सा ह्मणजे विरेचन, त्या अर्थीं विरेचक औषधांनीं तयार केलेलें तूप देणें प्रशस्त आहे. जर दिलेलें तूप विरेचन करणारें नसेल तर त्यापासून दोषांचा अवष्टंभ होऊन ते अवरुद्ध दोष त्वचा, मांस व रक्त हीं पिकवितील. ह्मणून विसर्पांत प्रथम विरेचन व रक्त काढणें हेच उपाय प्रशस्त आहेत. कारण विसर्पाचा मुख्य आश्रय ह्मणजे पित्त व रक्त-धातु हें वर सांगितलेंच आहे. याप्रमाणें ही विसर्पाची संक्षिप्त चिकित्सा सांगितली. आतां तीच विस्तारपूर्वक सांगतों.

मदनं मधुकं निम्बं वत्सकस्य फलानि च ।
वमनं सम्प्रदातव्यं विसर्पे कफपित्तजे ॥ ५० ॥
पटोलपिचुमर्दाभ्यां पिप्पल्या मदनेन च ।
विसर्पे वमनं शस्तं तथा चेन्द्रयवैः सह ॥ ५१ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

याँश्च योगान्प्रवक्ष्यामि कल्केषु कफपित्तिनाम् ।
विसर्पिणां प्रयोज्यास्ते दोषनिर्हरणाः परम् ॥ ५२ ॥
मुस्तनिम्बपटोलानां चन्दनोत्पलयोरपि ।
शारिवामलकोशीरमुस्तानां वा विचक्षणः ॥ ५३ ॥
पाययेत कषायान्हि सिद्धान्वीसर्पनाशनान् ।
किराततिक्तकं लोध्रं दुरालंभां सचन्दनाम् ॥ ५४ ॥
नागरं पद्मकिञ्जल्कमुत्पलं सबिभीतकम् ।
मधुकं नागपुष्पञ्च दद्याद्वीसर्पशान्तये ॥ ५५ ॥
प्रपौण्डरीकं मधुकं पद्मकिञ्जल्कमुत्पलम् ।
नागपुष्पञ्च लोध्रञ्च तेनैव विधिना पिबेत् ॥ ५६ ॥
द्राक्षां पर्पटकं शुण्ठीं गुडूचीं धन्वयासकम् ।
निशापर्युषितं दद्यात्तृष्णावीसर्पशान्तये ॥ ५७ ॥
पटोलपिचुमर्दं वा दार्वीं कटुकरोहिणीम् ।
यष्ट्याह्वां त्रायमाणाञ्च दद्याद्वीसर्पशान्तये ॥ ५८ ॥
पटोलादिकषायं वा पिबेत्त्रिफलयासह ।
मसूरावदलैर्युक्तं घृतमिश्रं प्रदापयेत् ॥ ५९ ॥
पटोलपत्रमुद्गानां रसमामलकस्य च ।
पाययेत घृतोन्मिश्रं नरं वीसर्पपीडितम् ॥ ६० ॥
यञ्च सर्पिर्महातिक्तं पित्तकुष्ठनिबर्हणम् ।
निर्दिष्टं तदपि प्राज्ञो दद्याद्वीसर्पशान्तये ॥ ६१ ॥
त्रायमाणाघृतं सिद्धं गौल्मिके यदुदाहृतम् ।
विसर्पाणां प्रशान्त्यर्थं दद्यात्तदपि बुद्धिमान् ॥ ६२ ॥
त्रिवृच्चूर्णं समालोड्य सर्पिषा पयसापि वा ।
घर्माम्बुनावा संयोज्य मृद्वीकानां रसेन वा ॥ ६३ ॥
विरेकार्थं प्रयोक्तव्यं सिद्धं वीसर्पनाशनम् ।
त्रायमाणाशृतं वाऽपि पयो दद्याद्विरेचनम् ॥ ६४ ॥
त्रिफलारससंयुक्तं सर्पिस्त्रिवृतया सह ।
प्रयोक्तव्यं विरेकार्थं विसर्पज्वरनाशनम् ॥ ६५ ॥
रसमामलकानां वा घृतमिश्रं प्रदापयेत् ।
स एव गुरुकोष्ठाय त्रिवृच्चूर्णयुतो हितः ॥ ६६ ॥

गेळफळ, ज्येष्ठमध, कडूलिंबाचीं पानें व इंद्रजव या औषधांचा काढा कफपित्तजन्य विसर्पांत वांति करण्याकारितां द्यावा. किंवा कडू-पडवळ, कडुलिंबाचीं पानें, पिंपळी, गेळफळ व इंद्रजव यांचा काढा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

द्यावा. पुढें कल्पस्थानांत कफ–पित्त रोग्याचे दोष काढून टाकणारे जे औषधिप्रयोग सांगितले जातील तेही विसर्परोगांत द्यावे. ज्या रोग्याचे दोष फार वाढले नसून त्यास वमन–विरेचन देण्याची आवश्यकता नसेल त्यास नागरमोथा, कडूलिंब, कडूपडवळ, चन्दन व निळें कमळ, किंवा उपळसरी, आंवळकठी, वाळा व नागरमोथा यांचा काढा द्यावा. किंवा कडूकिराइत, लोध्र, धमासा, चन्दन, सुंठ, कमळकेशर, निळें कमळ, वेहडा, ज्येष्ठमध व नागकेशर यांचा काढा द्यावा. अथवा पुण्डरीक, काष्ठ, ज्येष्ठमध, कमळकेशर, निळेंकमळ, नागकेशर व लोध्र यांचा काढा करून द्यावा. काळीं द्राक्षें, पित्तपापडा, सुंठ, गुळवेल व धमासा हीं औषधें रात्रीं पाण्यांत भिजत घालून तें पाणी दुसरे दिवशीं प्याल्यानें तृषायुक्त विसर्प शमन पावतो. किंवा कडूपडवळ, कडूलिंब दारुहळद, कुटकी, ज्येष्ठमध व त्रायमाण यांचा काढा द्यावा. किंवा या काढ्यांत आणखी त्रिफळा मिळवून तो घ्यावा. अथवा या त्रिफळ्यासह केलेल्या काढ्यांत आणखी मसूरांची डाळ मिळवून काढा करून त्यांत तूप मिळवून तो प्यावा. कडुपडवळाचीं पानें, मूग व आंवळकठी यांच्या काढ्यांत तूप मिळवून तो घ्यावा. मागें कुष्ठचिकित्सेंत जें महातिक्तघृत सांगितलें आहे तेंही विसर्पांत द्यावें. तसेंच गुल्मचिकित्सेंत जें त्रायमाणादि घृत सांगितलें आहे तेंही विसर्पांत गुणकारी आहे.* तूप, दूध, ऊन पाणी किंवा काळ्या द्राक्षांचा काढा यांतून निशोत्तराचें चूर्ण विरेचनार्थ द्यावें. किंवा त्रायमाण घालून कढविलेलें दूध घेतल्यानेंही विरेचन होतें अथवा त्रिफळ्याचा काढा, तूप व निशोत्तराचें चूर्ण मिळवून घेतल्यानें जुलाब होऊन विसर्प व तापाचें शमन होतें. किंवा आंवळकठीचा काढा तूप मिळवून द्यावा. जड कोठ्याच्या रोग्यास देणें झाल्यास यांतच निशोत्तराचें चूर्ण मिळवून द्यावें.

दोषे कोष्ठगते भूय एतत्कुर्याच्चिकित्सितम् ।
शाखादुष्टे तु रुधिरे रक्तमेवादितो हरेत् ॥ ६७ ॥

---

* हीं दो[illegible]त जोरदार विरेचन करणारीं आहेत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भिषग्वातान्वितं रक्तं विषाणेनाभिनिर्हरेत्।
पित्तान्वितं जलौकाभिः कफान्वितमलाबुभिः ॥ ६८ ॥
यथासन्नं विकारस्य व्यधयेदाशु वासिनाम्।
त्वंगमांसस्नायुसंगक्लेदो रक्तक्लेदाद्धि जायते ॥ ६९ ॥
अन्तःशरीरे संशुद्धे दोषे त्वङ्मांससंश्रिते।
आदितः स्वल्पदोषानां क्रिया बाह्या प्रवक्ष्यते ॥ ७० ॥

दोषांचा जमाव कोठ्यांत असल्यास येथपर्यंत सांगितलेले काढे, घृतें वगैरे द्यावीं. आणि तेच दोष रक्तादि धातूंत प्रविष्ट झाले असल्यास प्रथम रक्त काढवावें. वातदूषित रक्त शिंगानें, पित्तदूषित जळवा लावून व कफदूषित तुंबडी लावून काढवावें. तुंबडी, जळवा वगैरे लावावयाच्या त्या ज्या ठिकाणीं विकार असेल त्याच्याजवळ लावाव्या. रक्त नासल्या पासूनच त्वचा, मांस व स्नायु हीं सडतात, ह्मणून दूषित रक्त काढून टाकणें जरूर असतें. प्रथम सांगितलेलीं विरेचनें वगैरे देऊन व रक्त काढवून, कोठ्यांतील आणि त्वचा व मांस यांतील दोष काढून टाकून शरीराची अंतःशुद्धि झाली ह्मणजे मग पुढें सांगितलेले लेप वगैरे वरचे उपचार करावे.

उदुम्बरत्वङ्मधुकं पद्मकिञ्जल्कमुत्पलम्।
नागपुष्पं प्रियंगुश्च प्रमेहः सघृतां हितः ॥ ७१ ॥
न्यग्रोधपादास्तरुणाः कदलीगर्भसंयुताः।
विसग्रन्थिश्च लेपः स्याच्छतधौतघृताप्लुतः ॥ ७२ ॥
कालीयं मधुकं हेमवन्यश्चन्दनपद्मकम्।
पला मृणालं फलिनी प्रलेपः स्याद्घृताप्लुतः ॥ ७३ ॥
शाद्वलश्च मृणालश्च शङ्खचन्दनमुत्पलम्।
वेतसस्य च मूलानि प्रदेहः स्यात्सतण्डुलः ॥ ७४ ॥
शारिवा पद्मकिञ्जल्कमुशीरं नीलमुत्पलम्।
मञ्जिष्ठा चन्दनं लोध्रमभया च प्रलेपनम् ॥ ७५ ॥
नलदश्च हरेणुश्च लोध्रं मधुकपद्मकौ।
दूर्वा सर्जरसश्चैव सघृतं स्यात्प्रलेपनम् ॥ ७६ ॥
यावकाः सक्तवश्चैव सर्पिषासह योजिताः।
प्रदेहो मधुकं वीरा सघृता यवसक्तवः ॥ ७७ ॥
बलामुत्पलशालूकं वीरामगुरुचन्दनम्।
कुर्याद्वालेपनं वैद्यो मृणालञ्च बिसान्वितम् ॥ ७८ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यवचूर्णं समधुकं सघृतश्च प्रलेपनम् ।
हरेणवो मसूराश्च समुद्गाः श्वेतशालयः ।
पृथक्पृथक्प्रदेहाः स्युः सर्वे वा सर्पिषासह ॥ ७९ ॥
पद्मिनीकर्दमः शीतो मौक्तिकं पिष्टमेव वा ।
शंखः प्रवालः शुक्तिर्वा गैरिको वा घृताप्लुतः ॥ ८० ॥
प्रपौण्डरीकं मधुकं बला शालूकमुत्पलम् ।
न्यग्रोधपत्रं दुग्धाका सघृतं स्यात्प्रलेपनम् ॥ ८१ ॥
बिसानि च मृणालश्च सघृताच कशेरुका ।
शतावर्या विदार्याश्च कन्दौ धौतघृताप्लुतौ ॥ ८२ ॥
शैवालं नलमूलानि गोजिह्वा वृषकर्णिका ।
इन्द्राणिशाकं सघृतं शिरीषत्वग्बलाघृतम् ॥ ८३ ॥
न्यग्रोधोदुम्बरप्लक्षवेतसाश्वत्थपल्लवैः ।
त्वक्कल्कैर्बहुसर्पिष्कैस्तैरेवालेपनं हितम् ॥ ८४ ॥
प्रदेहाः सर्व एवैते वातपित्तोल्बणे शुभाः ।
सकफे तु प्रवक्ष्यामि प्रलेपानपराञ्छुभान् ॥ ८५ ॥

उंबराची साल, ज्येष्ठमध, पद्मकेशर, निळें कमळ, नागकेशर व गहुला हीं औषधें वाटून तुपांत मिळवून त्यांचा लेप द्यावा. वडाचीं कोंवळीं मुळें, केळीचा गाभा व कमळाचें मूळ या सर्वांचा शंभर वेळ धुतलेल्या तुपांतून लेप करावा. कालीय चंदन, ज्येष्ठमध, घोतऱ्याचें बीं, केवटीमोथा, चंदन, पद्मकाष्ठ, वेलची, कमळाची देंठी व गहुला या सर्वांचा धुतलेल्या तुपांतून लेप करावा. निळया दूर्वा, कमळदेंठी, शंख, चंदन, किंचित् निळेंकमळ, वेताचीं मुळें व वावडिंग किंवा तांदूळ यांचा लेप द्यावा. उपळसरी, कमळकेशर, वाळा, निळें कमळ, मंजिष्ठ, चंदन, लोध्र व हिरडे यांचा लेप करावा. वाळा, रेणुकबीज, लोध्र, ज्येष्ठमध, पद्मकाष्ठ, दूर्वा व राळ या सर्वांचा तुपांतून लेप करावा. जवांचे सातू तुपांत कालवून त्यांचा लेप करावा. ज्येष्ठमध, क्षीरकाकोली, जवांचे सातू व तूप यांचा लेप द्यावा. चिकणा, निळें कमळ, कमळकंद, क्षीरकाकोली, अगर, चंदन व कमळाची देंठी यांचा तुपांतून लेप करावा. जवांच्या सातूचें पीठ व ज्येष्ठमध यांचा तुपांतून लेप करावा. रेणुकबीज, मसूर, मूग व पांढऱ्या साळी यांचा लेप द्यावा. हे लेप

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

निरनिराळे किंवा सर्व एकत्र मिळवून तुपांतून लावावे. कमळिणीच्या कंदास लागलेला गारसा चिखल, मौक्तिकचूर्ण, शंख, प्रवाळ, शिंप यांची बारीक पूड किंवा गेरू तुपांत मिळवून त्याचा लेप लावावा. पुंडरीककाष्ठ, ज्येष्ठमध, चिकणा, कमळकंद, निळें कमळ, वडाचीं कोवळीं पानें व दुधी या सर्व द्रव्यांचा तुपांतून लेप लावावा. कमळाच्या देंठ्या ( कोंवळ्या ), दांडे ( जून ) व कचरा यांचा तुपांतून वाटून लेप करावा. शतावरी व भुईकोहळा यांच्या कंदांचा शतधौत घृतांतून वाटून लेप करावा. शेवाळ, देवनळाचीं मुळें, पाथरी, धाकटी उंदीरकानी व काळी निर्गुडी, यांचा तुपांतून लेप करावा. शिरसाच्या वृक्षाची साल व चिकणा यांचा तुपांतून लेप करावा. वड, उंबर, पिंपरी, वेत व पिंपळ यांचीं कोंवळीं पानें व साल वाटून त्यांत पुष्कळसें तूप* घालून त्याचा लेप करावा. हे सर्व लेप वातपित्तप्रधान विसर्पावर उत्तम आहेत. आतां वात-कफ-जन्य विसर्पावर गुणकारीं लेप सांगतों.

त्रिफलां पद्मकोशीरं समंगां करवीरकम् ।
नलमूलान्यनन्तंच प्रदेहमुपकल्पयेत् ॥ ८६ ॥
खदिरं सप्तपर्णञ्च मुस्तमारग्वधं धवम् ।
कुरण्टक देवदारु दद्यादालेपनं भिषक् ॥ ८७ ॥
आरग्वधस्य पत्राणि त्वचं श्लेष्मान्तकस्य च ।
इन्द्राणिशाकं काकाह्वां शिरीषकुसुमानि च ॥ ८८ ॥
शैवालं नलमूलानि वीरा गन्धप्रियंगुकौ ।
त्रिफलां मधुकं वीरां शिरीषकुसुमानि च ॥ ८९ ॥
प्रपौण्डरीकं ह्रीवेरं दार्वी त्वङ्मधुकं बलाम् ।
पृथगालेपनं कुर्याद्द्वन्द्वशः सर्वशोऽपि वा ॥ ९० ॥
प्रदेहाः सर्व एवैते देयाः स्वल्पघृतायुताः ।
वातपित्तोल्बणे ये तु प्रदेहास्ते घृताधिकाः ॥ ९१ ॥

त्रिफळा, पद्मकाष्ठ, वाळा, मंजिष्ठ, कण्हेरीचें मूळ, देवनळाचें मूळ व अनंतमूळ या सर्वांचा लेप लावावा. खैरसाल, सातविणाची साल,

---

* या लेपांत ज्या ज्या ठिकाणीं तूप सांगितलें आहे त्या त्या ठिकाणी तें शंभर वेळा धुतलेलें घ्यावें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नागरमोथा, बाहव्याचीं पानें, धावड्याची साल, गेळीची साल व देवदार, यांचा लेप करावा. १ बाहव्याची पानें, भोंकरीची साल, २ निगडीचीं पानें, कांगोणीचीं पानें, व शिरसाचीं फुलें; ३ शेवाळ, देवनळमूळ, भुईकोहळा व गहुला; ४ त्रिफळा, ज्येष्ठमध, क्षीरकाकोली, शिरसाचीं फुलें, ५ पुण्डरीककाष्ठ, वाळा, दारुहळद, दालचिनी, ज्येष्ठमध व चिकणा, हे पांच निरनिराळे अथवा यांपैकीं दोन दोन मिळवून किंवा सर्व औषधें एकत्र करून त्यांचा लेप करावा. या लेपांत तूप थोडें घालावें आणि वर जे वातपित्तविसर्पांत लावावयाचे लेप सांगितले आहेत त्यांत तें अधिक घालावें. हे सर्व लेप क्षणोक्षणीं बदलीत असावें. अर्थात् नेहमीं ताजा लेप असावा.

घृतेन शतधौतेन प्रदिह्यात्केवलेन च ।
घृतमण्डेन शीतेन पयसा मधुकाम्बुना ॥ ९२ ॥
पंचवल्ककषायेण सेचयेच्छीतलेन वा ।
वातासृक्पित्तबहुलं विसर्पं बहुशो भिषक् ॥ ९३ ॥
सेचनास्ते प्रदेहा ये त एव घृतसाधनाः ।
ते चूर्णयोगा वीसर्पचूर्णानामवचूर्णनाः ॥ ९४ ॥
दूर्वास्वरससिद्धं च घृतं स्याद्व्रणरोपणम् ।
दार्वीत्वंमधुकं लोध्रं केशरंश्चावचूर्णनम् ॥ ९५ ॥
पटोलः पिचुमर्दस्तु त्रिफलामधुकोत्पले ।
एतत्प्रक्षालनं सर्पिर्व्रणचूर्णं प्रलेपनम् ॥ ९६ ॥

नुसत्या शंभर वेळ धुतलेल्या तुपाचा लेप करावा. किंवा तुपाची निवळ, थंड दूध, ज्येष्ठमधाचा काढा, किंवा पूर्वोक्त वड, पिंपळ वगैरे पांच वृक्षांच्या सालींचा निवलेला काढा, यांनीं वातपित्त किंवा रक्तपित्तजन्य विसर्पांत वरचेवर सेचन करीत असावें. ज्या औषधांच्या काढ्यांनीं सेचन करावयास सांगितलें आहे त्याचाच लेप द्यावा, त्याच औषधांनीं घृत तयार करावें व त्यांचींच चूर्णें करून तीं विसर्पाच्या व्रणांत भरावीं. दूर्वांचा अंगरस घालून कढविलेलें तूप लावल्यानें विसर्पाची जखम भरून येतें. दारुहळद, दालचिनी, ज्येष्ठमध, लोध्राची साल व नागकेशर यांचें चूर्णही घाय भरून आणतें. कडूपडवळ, कडूलिंब, त्रिफळा, ज्येष्ठमध व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

किंचित् निळें कमळ यांच्या काढ्यानें व्रण धुवावे. हीं औषधें घालून तयार केलेलें तूप पोटांत घ्यावें. यांचेंच चूर्ण जखमेंत भरावें व यांच्याच वाटलेल्या गोळ्याचा वर लेप लावावा.

अनवीने घृते पूर्वे प्रदेहा बहुशोधनाः ।
देयाः प्रदेहाः कफजे पर्याधानोद्धृते घनाः ॥ ९७ ॥
त्रिभागांगुष्ठमात्रः स्यात्प्रलेपः कल्कपेषितः ।
नातिस्निग्धो न रूक्षश्च न पिण्डो न द्रवः समः ॥ ९८ ॥
न च पर्युषितं लेपं कदाचिदवचारयेत् ।
न च तेनैव लेपेन पुनर्जातु प्रलेपयेत् ॥ ९९ ॥
क्लेदवीसर्पशूलानि सोष्णभावात्प्रवर्तयेत् ।
लेपो ह्युपरि पट्टस्य कृतः स्वेदयति व्रणम् ॥ १०० ॥
स्वेदजा पिडकास्तस्य कण्डूश्चैवोपजायते ।
उपर्युपरि लेपस्य लेपो यद्यवचार्यते ॥ १०१ ॥
तानेव दोषाञ्जनयेत्पट्टस्योपरि यान्कृतः ।
अतिस्निग्धोऽतिद्रवश्च लेपो यद्यवचार्यते ॥ १०२ ॥
त्वचि न श्लिष्यते सम्यक् न दोषं शमयत्यपि ।
तन्वालिप्तं न कुर्वीत संशुष्को ह्युपुटायते ॥ १०३ ॥
न चौषधिरसो व्याधिं प्राप्नोत्यपि च शुष्यति ।
तन्वालिप्तेन ये दोषास्तानेव जनयेत्कृशम् ॥ १०४ ॥
संशुष्कः पीडयेद्व्याधिं निःस्नेहो ह्यवचारितः ।

पूर्वी सांगितलेल्या लेपांत जें तूप घ्यावयाचें तें जुनें असावें. लेप लावयाचे ते चांगले स्वच्छ केलेले असावे. त्यांत कचरा वगैरे अवांतर पदार्थ असूं नयेत. कफजन्य विसर्पांत आजूबाजूस देखील जाड लेप द्यावा. लेप लावावयाचीं औषधें चटणीसारखीं चांगलीं बारीक वाटावीं. लेपाची जाडी हाताच्या आंगठ्याच्या एक तृतीयांशाइतकी असावी. तो फार चिकटही नसावा किंवा फार भरभरीतही नसावा. फार घट्टही नसावा किंवा फार पातळही नसावा; तर सारखा असावा. शिळा लेप कधींही लावूं नये. एकदां लावलेला लेप दुसऱ्या वेळेस लावूं नये. दर वेळेस नवा तयार करावा. जुना लाविल्यानें विसर्पांत उष्णता उत्पन्न होऊन ते चिघळून त्यांत शूलही होऊं लागेल. कपड्यावर औषधाचा लेप लावून तो बांधूं नये—त्यायोगानें


CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जखमेंत घाम येतो, घामापासून पुटकुळ्या येतात व त्यांत खाज सुटते. हेच अवगुण लेपावर लेप लावल्यापासूनही होतात. फार चिकट किंवा फार पातळ लेप लावला असतां तो चामडीवर बरोबर चिकटून बसत नाहीं व त्यामुळें अर्थातूच दोषांचें शमन करूं शकत नाहीं. पातळ लेप लावूं नये. कारण तो सुकून जाऊन त्याचे पोपडे निघतात. अर्थात् औषधाचा रस रोगास न पोंचतां सुकून जातो. पातळ लेप लावल्यानें जें नुकसान होतें तेंच नुकसान, सुकलेला चिकटपणारहित असा लेप लावल्यानें, अधिक प्रमाणांत होतें. सुक्या लेपानें जखम तडतडते. सारांश, वर दर्शविलेले सर्व दोष टाळून योग्य अशा पद्धतीनें लेप लावला तरच त्यापासून गुण येतो.

अन्नपानानि वक्ष्यामि विसर्पाणां निवृत्तये ॥ १०५ ॥
लंघितेभ्यो हितो मन्थो रूक्षः सक्षौद्रशर्करः ।
मधुरः किञ्चिदम्लो वा दाडिमामलकान्वितः ॥ १०६ ॥
सपरूषकमृद्वीकः सखर्जूरः शृताम्बुना ।
तर्पणैर्यवशालीनां सस्नेहा वावलेहिका ॥ १०७ ॥
जीर्णे पुराणशालीनां यूषैर्भुञ्जीत भोजनम् ।
मुद्गान् मसूरांश्चणकान्यूषार्थमुपकल्पयेत् ॥ १०८ ॥
अनम्लान्दाडिमाम्लान्वा पटोलामलकैः सह ।
जांगलानां च मांसानां रसांस्तस्योपकल्पयेत् ॥ १०९ ॥
रूक्षान्परूषकद्राक्षादाडिमामलकान्वितान् ।
रक्ताः श्वेता महाह्वाश्च शालयः षष्टिकैः सह ॥ ११० ॥
भोजनार्थे प्रशस्यन्ते पुराणाः सुपरिस्त्रुताः ।
यवगोधूमशालीनां सात्म्यान्येव प्रदापयेत् ॥ १११ ॥
येषां नात्युचितः शालिर्नरा ये च कफाधिकाः ।
विदाहीन्यन्नपानानि विरुद्धं स्वपनं दिवा ॥ ११२ ॥
क्रोधव्यायामसूर्याग्निप्रवातांश्च विवर्जयेत् ।
कुर्याच्चिकित्सितान्यस्माच्छीतप्रायाणि पैत्तिके ॥ ११३ ॥
रूक्षप्रायाणि कफजे स्नैहिकान्यनिलात्मके ।
वातपित्तप्रशमनमग्निवीसर्पिणे हितम् ॥ ११४ ॥
क[illegible]गतं प्रायः कर्दमसंज्ञिते ।

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रक्तपित्तोत्तरं दृष्ट्वा ग्रन्थिवीसर्पमादितः ॥ ११५ ॥
रूक्षणैर्लंघनैः सेकैः प्रदेहैः पाञ्चवल्किकैः।
शिरामोक्षैर्जलौकाभिर्वमनैः सविरेचनैः ॥ ११६ ॥
घृतैः कषायतिक्तैश्च कालज्ञैः समुपाचरेत्।
ऊर्ध्वं चाधश्च शुद्धाय रक्ते चाप्यवसेचिते ॥ ११७ ॥
वातश्लेष्महरं कर्म ग्रन्थिवीसर्पिणे हितम्।

आतां विसर्पांत द्यावयाचें अन्नपान सांगतों. लंघन झाल्यानंतर विसर्प रोग्यास तूप न घालतां मध व साखर मिळवून मंथ द्यावा. किंवा डाळिंबाचा रस व आंवळ्यांचा रस मिळवून केलेला आंबटगोड मंथ द्यावा. किंवा फालसा, द्राक्षें व खजूर यांच्या काढ्यांत भिजवून द्यावा, किंवा जवाच्या तर्पणांतून द्यावा. अथवा तूप घालून त्याची लापशी करून द्यावी. मंथ जिरल्यानंतर जुन्या साळीचा भात कढणाबरोबर जेवावा. कढणें करावयाचीं तीं मूग, मसुरा व हरभरे या धान्यांचीं करावीं; त्यांत कडू पडवळ व आंवळे टाकावे. आंबटाणीकरितां डाळिंबाचा रस टाकावा किंवा आंबटाणीवांचूनच तीं द्यावीं. जांगल जनावरांच्या मांसाचे, फालसा, द्राक्षें, डाळिंबाचा रस किंवा आंवळे हीं फळें टाकून, बिनतुपाचे शोरुवे करून ते द्यावे. तांबड्या साळी, पांढऱ्या साळी, महासाळी किंवा साठेसाळी यांच्या जुन्या तांदुळाची चांगली पुष्कळशी पेज काढून केलेला भात खाऊं घालावा. ज्या रोग्यांस साळींचा भात चांगला मानवत नसेल किंवा ज्याच्या प्रकृतींत कफाचा जोर असेल त्यांनीं जव व गहूं यांचें सेवन करावें. सारांश—जव, गहूं व साळी यांपैकीं जें ज्यांस मानवत असेल तें त्यांस द्यावें. विदाही व परस्पर विरुद्ध मिश्रणाचे असे खाण्यापिण्याचे पदार्थ वर्ज्य करावे. दिवसा निजूं नये. रागाऊं नये. फार परिश्रम करूं नये. उन्हांत फिरूं नये. विस्तवाचा शेक घेऊं नये व जोराचा वारा लागूं देऊं नये. पित्तजन्य विसर्पांत शीतप्राय चिकित्सा करावी, कफ—जन्य विसर्पांत रूक्षप्राय करावी आणि वातज विसर्पांत स्निग्ध करावी. अग्निविसर्पांत वात—पित्तशामक चिकित्सा करावी आणि कर्दम विसर्पांत कफपित्तनाशक चिकित्सा करावी. ग्रंथिविसर्पांत रक्त पित्ताचा जोर अस-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by

त्यास आरंभीं रूक्षण, लंघन, वड–उंबर–पिंपळ–पिंपरी व वेत यांच्या सालीचें सेचन व लेप करणें, फांसण्या टाकून किंवा जळवा लावून रक्त काढविणें, वमन, विरेचन आणि मागें कुष्ठचिकित्साध्यायांत सांगितलेलीं कषाय व तिक्त घृतें देणें, या क्रमानें चिकित्सा करावी. वमनविरेचनांनीं शरीराचें शोधन करून व रक्त काढवून नंतर वातकफनाशक चिकित्सा करावी.

उत्कारिकाभिरुष्णाभिरुपनाहः प्रशस्यते ॥
स्निग्धाभिर्वेशवारैर्वा ग्रन्थिवीसर्पशूलिनः ॥ ११८ ॥
दशमूलोपसिद्धेन तैलेनोष्णेन सेचयेत् ।
कुष्ठतैलेन चोष्णेन यवाक्षारयुतेन च ॥ ११९ ॥
गोमूत्रैः पत्रनिर्युहैरुष्णैर्वा परिषेचयेत् ॥ १२० ॥
सुखोष्णया प्रदिह्याद्वा पिष्टया कृष्णगन्धया ।
शुष्कमूलककल्केन नक्तमालत्वचापि वा ॥ १२१ ॥
विभीतकस्य वा ग्रन्थिं कल्केनोष्णेन सेचयेत् ।
बलां नागबलां पथ्यां भूर्जग्रन्थिं विभीतकम् ॥ १२२ ॥
वंशपत्राण्यग्निमन्थं कुर्याद्ग्रन्थिप्रलेपनम् ।
दन्तीचित्रकमूलत्वक्सुधार्के पयसी गुडः ॥ १२३ ॥
भल्लातकास्थिकासीसं लेपो भिन्द्याच्छिलामपि ।
बहिर्मार्गस्थितं ग्रन्थिं किम्पुनः कफसम्भवम् ॥ १२४ ॥

ग्रन्थिविसर्पांत शूळ होत असल्यास पिठाचें गरम पोटीस बांधावें. किंवा वेशवारांत (मांसाचा कीमा) तूप घालून त्यानें शेकावें. दशमुळें घालून शिजविलेलें तेल लावावें किंवा कोष्ठ घालून तयार केलेलें तेल जवखार मिळवून गरम गरम लावावें. गोमूत्राच्या किंवा वायवरणा वगैरे वातनाशक पानांच्या उन्हून काढ्यानें सेचन करावें. शेवग्याची साल वाटून सोसण्याजोगी गरम करून गांठीवर लेप द्यावा. सुके मुळे, करंजाची साल किंवा बेहड्यांची साल वाटून सोसण्याजोगी गरम करून गांठीवर लेप द्यावा. चिकणा, गांगेटी, हिरडे, भोजपत्राच्या गांठी, बेहडे, वेळूची पानें व ऐरणीची साल, हीं वाटून त्यांचा गांठीवर लेप करावा. दन्तीमूळ व चित्रकमूळाची साल, निवडुंग व रुईचें दूध, गूळ, बिब्याची



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बी व हिराकस यांच्या लेपानें दगड देखील फुटेल; तर कफापासून उत्पन्न झालेली एक बहिर्मुखगांठ फुटेल यांत आश्चर्य काय?

दीर्घकालस्थितं ग्रन्थिं भिन्द्याद्वा भेषजैरिमैः ।
मूलकानां कुलत्थानां यूषैः साक्षारदाडिमैः ॥ १२५ ॥
गोधूमान्नैर्यवान्नैर्वा सशीधुमधुशर्करैः ।
सक्षौद्रैर्वारुणीमण्डैर्मातुलुंगरसान्वितैः ॥ १२६ ॥
त्रिफलायाः प्रयोगैश्च पिप्पलीक्षौद्रसंयुतैः ।
मुस्तभल्लातसक्तूनां प्रयोगैर्माक्षिकस्य च ॥ १२७ ॥
देवदारुगुडूच्योश्च प्रयोगैर्गिरिजस्य च ।
धूमैर्विरेकैः शिरसः पूर्वोक्तगुल्मभेदनैः ॥
अयोलवणपाषाणहेमताम्रप्रपीडनैः ॥ १२८ ॥
आभिः क्रियाभिः सिद्धाभिर्विविधाभिर्बली स्थिरः ॥ १२९ ॥
ग्रन्थिः पाषाणकठिनो यदा नैवोपशाम्यति ।
अथास्य दाहः क्षारेण शरैर्लोहेन वा हितः ।
पाकिभिः पाचयित्वा वा पाटयित्वा समुद्धरेत् ॥ १३० ॥
मोक्षयेद्बहुशश्चास्य रक्तमुत्क्लेशमागतम् ।
पुनश्चापहृते रक्ते वातश्लेष्मजिदौषधम् ॥ १३१ ॥
धूमो विरेकः शिरसः स्वेदनं परिमर्दनम् ।
अपशाम्यति दोषे च पाचनं वा प्रशस्यते ॥ १३२ ॥
प्रक्लिन्ने दाहपाकाभ्यां भिषक् शोधनरोपणैः ।
बाह्यैश्चाभ्यन्तरैश्चैव व्रणवत्समुपाचरेत् ॥ १३३ ॥
कम्पिल्यकं विडङ्गानि दार्वीकारञ्जकं फलम् ।
पिष्ट्वा तैलं विपक्तव्यं ग्रन्थिव्रणचिकित्सितम् ॥ १३४ ॥
द्विव्रणीयोपदिष्टेन कर्मणा चाप्युपाचरेत् ।
देशकालविभागज्ञो व्रणग्रन्थिविसर्पवत् ॥ १३५ ॥

पुष्कळ दिवसांची गांठ असल्यास ती पुढील उपायांनीं फोडावी. मुळें व कुळथांचीं कढणें, जवखार व डाळिंबाचा रस मिळवून प्यावीं. गहूं व जवांचे पदार्थ शीधु, मध व साखरेशीं मिळवून खावे. माहळुं-गाचा रस व मध मिळवून वारुणीमंड प्यावें. पिंपळी व मध मिळवून त्रिफळ्याचे प्रयोग करावे. नागरमोथा, बिब्बे, सातु व मध यांचे प्रयोग करावे. देवदार व गुळवेली किंवा शिलाजिताचे प्रयो[illegible] करावे. धुऱ्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by

द्याव्या, शिरोविरेचनें द्यावीं, मागें गुल्मचिकित्साध्यायांत गुल्माचा गोळा फोडण्याकरितां सांगितलेल्या क्रिया कराव्या, किंवा लोखंड, लवण, दगड, सोनें, तांबे वगैरे तापवून त्यानें विसर्पाची गांठ फोडावी. इतक्या निरनिराळ्या प्रकारच्या उपायांनीं देखील जर पुष्कळ दिवसांची जुनी गांठ मजबूत, अचल व दगडाप्रमाणें टणक असल्यामुळें न फुटली तर क्षारांनीं ( ॲसिटांनीं ) किंवा लोखंडाच्या सळईनें डाग द्यावा. किंवा पोटीस बांधून ती पिकवावी व चिरून आंतील सर्व दोष काढून टाकावा आणि साफ झाली ह्मणजे त्या जागीं झालेली जखम भरून आणावी. गांठींत पुन्हां रक्त भरून सांचूं लागलें असें दिसल्यास प्रत्येकवेळीं तें काढून टाकावें. रक्त काढलें ह्मणजे त्यावर वातकफनाशक औषधें द्यावीं. धुरी, शिरोविरेचन, घाम आणणें ( स्वेदन ) व मर्दन या क्रिया कराव्या. जितके वेळां रक्त काढलें जाईल तितके वेळां या क्रिया कराव्या. दोषांचें शमन बरोबर होत नसल्यास गांठ पिकविणें हा उत्तम उपाय आहे. डागल्यानें व पिकल्यानें गांठ चिघळून जखम झाल्यास आंतून वमनविरेचनादि उपायांनीं सर्व शरीराचें व बाह्य उपायांनीं जखमेचें चांगलें शोधन करून व्रणनाशक औषधांनीं तीं भरून आणावी. सारांश, अंतर्बाह्य इतर व्रणांवर जे उपचार करितात तेच सर्व विसर्पाच्या व्रणां-वर करावे. कापिला, वावडिंगें, दारुहळद व करंजाच्या बिया यांचा कल्क त्यांत मिळवून तेल शिजवावें व तें ग्रंथिविसर्पाच्या जखमेवर लावावें. तसेंच व्रण व ग्रन्थिविसर्प समजणाऱ्या व देशकालभेद जाणणाऱ्या वैद्यानें पुढें द्विव्रणीय चिकित्सा नांवाच्या अध्यायांत सांगितलेली व्रणांची चिकित्सा करावी.

य एव विधिरुद्दिष्टो ग्रन्थीनां विनिवृत्तये ।
स एव गलगण्डानां कफजानां निवृत्तये ॥ १३६ ॥
गलगण्डास्तु वातोत्था ये कफानुगता नृणाम् ।
घृतक्षीरकषायाणामभ्यासान्न भवन्ति ते ॥ १३७ ॥
यानीहोक्तानि कर्माणि विसर्पाणां निवृत्तये ।
एकानि सर्वाणि रक्तमोक्षणमेकतः ॥ १३८ ॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विसर्पो न ह्यसंसृष्टो रक्तपित्तेन जायते ।
तस्मात्साधारणं सर्वमुक्तमेतच्चिकित्सितम् ॥ १३९ ॥
विशेषो दोषवैषम्यान्न च नोक्तः समासतः ।
समासव्यासनिर्दिष्टां क्रियां विद्वानुपाचरेत् ॥ १४० ॥

ग्रंथिविसर्पावर जी चिकित्सा वर सांगितली आहे तीच कफापासून होणाऱ्या गलगण्डावरही योजावी. ज्या गलगण्डांत वातदोष प्रधान असून कफ त्याचा सहायकारी असेल त्यांत घृत, क्षार व कषाय यांचें सेवन केलें असतां ते नाहींसे होतात. या अध्यायांत जितके विसर्पनाशक उपाय सांगितले आहेत त्यांपैकीं एक रक्त काढविणें एका बाजूस व बाकी सर्व उपाय एका बाजूस आहेत. अर्थात् रक्त काढविणें हा सर्वांत मुख्य उपाय आहे. कारण विसर्पांत रक्तपित्त हें अवश्यमेव बिघडत असतें. असा विसर्पच नाहीं कीं ज्यांत रक्तपित्ताचा संबंध नाहीं. किंबहुना रक्तपित्त हाच विसर्पाचा आश्रय आहे. ह्मणून ही सर्वसाधारण चिकित्सा सांगितली. दोषभेदेंकरून विस्तारपूर्वक मागें सांगितलींच आहे. तर ही संक्षिप्त–विस्तृत दोन्ही तऱ्हेनें सांगितलेली चिकित्सा वैद्यानें करावी.

भवन्ति चात्र

निरुक्तनामभेदाश्च दोषा दूष्याणि हेतवः ।
आश्रयो मार्गतश्चैव विसर्पगुरुलाघवम् ॥ १४१ ॥
लिङ्गान्युपद्रवा ये च यल्लक्षणउपद्रवाः ।
साध्यत्वं न च साध्यानां साधनंच यथाक्रमम् ॥ १४२ ॥
इति पिप्रक्षवे सिद्धिमग्निवेशाय धीमते ।
उक्तं भगवता ह्येतद्विसर्पाणां चिकित्सिते ॥ १४३ ॥

विसर्प शब्दाचें निर्वचन, नामभेद, यांतील दोष, दूष्यें, निदान, आश्रयभूत मार्ग, गौरव–लाघव, लक्षणें, उपद्रव, त्यांचें लक्षण, साध्यासाध्यनिर्णय व साध्यांची चिकित्सा इतके विषय या विसर्पचिकित्सित नांवाच्या अध्यायांत आत्रेय महर्षींनीं आपला बुद्धिमान् शिष्य अग्निवेश याच्या प्रश्नावरून निरूपण केले आहेत.

एकादशोऽध्यायः समाप्तः ॥ ११ ॥

समाप्त

SRI JAGADGURU VISHWARADHYA
JNANA SIMHASAN JNANAMANDIR
LIBRARY
Jangamawadi Math, Varanasi
Acc. No. 3587

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आमचेकडे विक्रीस असलेल्या वैद्यक पुस्तकांची यादी.

# वनौषधि गुणादर्श.

(भाग १ ते ७).

वनस्पतींचीं औषधें मोठ्या चमत्कारिक रीतीनें गुण देणारीं व सौम्य असतात, अशी सर्वत्र ख्याती आहे, ह्मणूनच तीं औषधें आबालवृद्धांना घेण्यास प्रिय व बिनधोक वाटतात. वनस्पतींचा संपूर्ण शोध मिळणे फार कठीण, तथापि पदेशास्त्री यांनीं फार खटपट करून जंगली लोकांच्या साहा-य्यानें ही माहिती मिळून एकत्र केली आहे, प्रत्येक वनस्पतीची खूणखाण मिळण्याचे ठिकाण, निरनिराळे भाषेंतील नांवें, शास्त्रतः गुणदोष व त्या वनस्पतींना जंगली व वैद्यक जाणणारे कोणत्या रोगावर कसकसा उप-योग करतात ही माहिती सविस्तर दिली आहे. वनस्पतींचे उपयोगासंबं-धानें आजपर्यंत असें कोणतेही पुस्तक नाहीं! या पुस्तकाचे सात भाग असून सर्व भागांची मिळून किंमत ७॥ रुपये होत आहे. तथापि सर्वांस हीं पस्तकें घेतां यावींत ह्मणून आम्ही सातही भाग फक्त २॥ रुपयांस देणार आहोंत. टपालखर्च ८६ आणे निराळा.

यज्ञेश्वर गोपाळ दीक्षित, बुकसेलर, बुधवार पेठ, पुणें-सिटी.

अनेक डॉक्टर व वैद्य यांनीं अनुभवलेलें

## शस्त्र प्रयोगावर ताण!

# डोळ्याचें औषध.

सारा, लाली, गळ, खुपरी, फुलें इत्यादि साधारण रोग तर फारच लौकर बरे होतात इतकेंच नाहीं तर शस्त्रक्रियेनें देखोल जे असाध्य ठरलेले असे मोतीबिंदु, वडस, कांचबिंदु हेही रोग कोणत्याही अवस्थेंतले व कितीही जुने असले तरी खात्रीनें बरे होतात. किं. १ रु. ट. ख. निराळा.

मिळण्याचें ठिकाण,

यज्ञेश्वर गोपाळ दीक्षित, बुकसेलर, बुधवार पेठ, पुणें सिटी.

वामन विनायक करमरकर, शनवार पेठ, नं. ४४९, पुणें सिटी.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri